श्रीसयाजी साहित्यमाला-पुष्प १२७ वें. ( चरित्र गुच्छ )

# पंडित जगन्नाथराय चरित्र

आणि



# संगीत गंगालहरी

( सचित्र गद्यपद्यात्मक )


संपादक व प्रकाशक

**रामराव मार्तंड भांबुरकर.**



" बुलढाणामित्र " विद्युत्प्रचोदित मुद्रणालयांत श्रीयुत अंबालाल वि. टक्कर यांनीं संपादकासाठीं छापिलें.

दशहरा ज्येष्ठ शु. २ सोमवार.

प्रथमावृत्ति प्रति एक हजार
( सर्व हक्क स्वाधीन )

ता. २१ मे १९२८
शके १८५०

किं. रु. १-०-०

श्री.

# जाहिरात.

आपल्या देशी भाषेच्या साहित्याची अभिवृद्धि करण्याच्या हेतूनें पतितपावन श्री. सरकार महाराजसाहेब श्री सयाजीराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बहादूर, जी. सी. एस्. आय्., जी. सी. आय्. ई., एल्एल्. डी., यांनीं कृपावंत होऊन दोन लक्ष रुपयांची जी रक्कम अलाहिदा ठेविली आहे तिच्या व्याजांतून "श्रीसयाजी-साहित्यमालेंतून" विविध विषयांवर पुस्तकें तयार करविण्यांत येत असतात.

तदनुसार पंडित जगन्नाथराय चरित्र आणि संगीत गंगालहरी हा गद्यपद्यात्मक, रंजन, पतितपावनविषयक असा ग्रंथ रा. रा. रामराव मार्तंड पांडुरंग यांचेकडून तयार करवून उक्त मालेंतील पुष्पगुच्छांत १२७ वें पुष्प म्हणून प्रसिद्ध करण्यांत येत आहे.

भाषांतर शाखा,
विद्याधिकारी कचेरी,
बडोदें ता. ५-४-२८.

म. भा. महेता
भा. क.
(अ)

नं. के. दीक्षित
विद्याधिकारी,
बडोदें-राज्य.


मुकुंदराज
ज्ञानेश्वर
एकनाथ
तुकाराम
समर्थ रामदास
।। निसर्ग भिन्नास्पद-
मेकसंस्थमस्मिन्द्वयं
श्रीश्च सरस्वतीच ।।
कालिदास

## श्री. राजदंपतीच्या ठायीं लक्ष्मीसरस्वतींचा एकत्र वास.

पद्य. ( राग मिश्रकाफी. ता. धुमाळी. )

निशिदिनिं शिवचरणीं ॥ विनवूं, दीर्घायू करुनी, सुखवी,
नृपति सयाजिस ॥ ध्रु० ॥
॥ श्री शारदासुसंहति, वसत सतत जथिं मत्सर विसरुनि,
निसर्गभिन्नचि हें द्युतिमान ॥ प्रजातात जगिं धन्य सयाजी
नृपवर आयुष्यमान् ॥ गाऊं, ध्याऊं पावन नाम सुविहित ॥ १ ॥
राज्ञीपतीपरायण, गौरीहर जणु राजदंपती, प्रजानिष्ठ
म्हणविति गुणवान् ॥ राजकार्य दृढ करिति धरुनि मनिं
देशाचा अभिमान ॥ कीर्ती गाजो आचंद्रार्क त्रिभुवनिं ॥ २ ॥
निशिदिनि० ॥ ० ॥

श्री.

## —समर्पण—



माझी परमप्रिय मातुश्री कै. गं. भागीरथीबाई ( द्वारकाबाई ) भ्रतार मार्तंड खंडेराव भांबुरकर इच्या पवित्र चरणारविंदीं मातुश्रींच्या अनेक सद्गुणांचा द्योतक असा हा सचित्र. गद्यपद्यात्मक ग्रंथ, पंडित जगन्नाथराव चरित्र आणि संगीत गंगालहरी, पुत्रकर्तव्य समजून मातृप्रेमादरविनयपुरस्सर अर्पण करीत आहे,

बडोदें, उंचीपोळ झापा
राधाकृष्ण गल्ली.
अक्षय्यतृतीया शके १८५०
ता. २२ एप्रिल १९२८

आज्ञांकित नम्र
रामराव मार्तंड भांबुरकर

कै. गं. मातुश्री भागीरथीबाई भांबुरकर.





जन्म शके १७७४.

निधन शके १८४२. आषाढ वद्य १ शुक्रवार. ता. २-७-१९२०.

M. PRESS, BARODA.

**Vasudeo Vinayak Joshi** B. A. LL. B.,
*High Court Pleader.*

*Baroda, Dandya Bazar,*

Dated 7th October 1927.

*To,*

*The Secretary,*
Sahavicharini Sabha,
BARODA.

Dear Sir,

I have gone carefully through the manuscript of Sangit Gangalahari composed by Mr. Ramrao M. Bhamburker from the Gangalahari in Sanskrit and am glad to note the very able rendering the writer has made of that well-known classical poetical composition of the famous Jagannath Pandit. The songs are couched in different popular modes of singing to suit the pathos runnig through the poems and the very faithful, artistic and exquisite rendering of Gangalahari has brought in easy reach the grandure and sublimity of the original Sanskrit piece. Generally, the original suffers somewhat in the process of transformation but on a careful perusal of the manuscript submitted to me for opinion, I found that it has not only preserved in tact its inherent beauty but where occasion required added something which has heightened the sense. The original Sanskrit verse is accompanied with the poetical rendering in Marathi by the famous Scholar and Poet Waman Pandit and the songs of Mr. Ramrao Bhamburker would no doubt stand able comparison with it. This shows an

amount of pain the poet has bestowed upon it, the felicity of diction which he commands and the surpassing excellence he has achieved. Prof. B. C. Lele a member of the Sahitya Samiti Sahavicharini Sabha, has also written highly about this composition. I had an occasion to read it and I fully concur in his opinion.

The original poem Gangalahari in Sanskrit, is being read in every house and a very successful attempt to bring home the meaning of that classical composition must, in my opinion, be amply rewarded considering the exertions he has taken in making it an ideal production. Mr. Ramrao Bhamburker has made Pandit Jagannath his life long study and it would be but meet to expect this beautiful rendering prefaced with the life sketch of that famous poet which but very few people knew of. The fame of Jagannath as a poet of a very high order is unquestioned still the very uncommon life he lived in is of absorbing interest and therefore a life sketch would be of immense value. No one has, I suppose, tried it in Marathi and I hope Mr. Bhamburker would oblige the readers by utilising his life long study of Pandit Jagannath in composing his life sketch.

In short the manuscript submitted to me is of high literary merit and deserves ample remuneration and encouragement.

*Yours truly*

**V. V. Joshi.**

Member Sahitya Samiti of the

Sabavicharini Sabha, Baroda.

श्री.

**श्रीयुत रा. रा. दाजी नागेश आपटे, बी. ए. एल्एल् बी. हायकोर्ट वकील, यांचा अभिप्राय.**

विख्यात पंडित जगन्नाथराय यांची कीर्ति कोणाला अपरिचित आहे ? एका क्षणीं मदमलिनगंड करिकुंजरांचा गर्वभार उतरणाऱ्या, तर दुसऱ्या क्षणीं हरिणाक्षीच्या दृग्विलासांत मग्न होणाऱ्या, कचित्, दैव पराङ्मुख झाल्यानें स्वतःची कष्टावस्था कोणास सांगूं असें दीनवदन काढणाऱ्या, तर केव्हां आपल्या स्वर्णीयार्थप्रतिपादक शब्दांनीं ज्यांचें चैतन्यहरण झालें होत नाहीं ते जीवंत असूनहि मृतक आहेत असें प्रतिपादणाऱ्या, कधीं व्याकरणाच्या तत्त्व विषयावरील अनेकांच्या कीं तरी मतांचें खंडन करून कौमुदीखंडन ( पंडितराजकृत ग्रंथाचें नांव ) करणाऱ्या, तर कधीं भामिनीविलासानें ( पंचलहरींमार्फत ) स्वतःला चिरंजीव तुल्य करून घेणाऱ्या, अशा इंद्रधनुष्याप्रमाणें चमकणाऱ्या सप्तरंगी देदीप्यमान मयूरपिच्छांतील विविधरंगांनीं शोभणाऱ्या कविश्रेष्ठाला कोण जाणीत नाहीं ? तथापि केवळ संस्कृतांत असलेला हा पंडितरायांचा काव्यरस आमच्या मराठीला अशक्य साध्य होता, यासाठीं त्यांतील कांहीं कांहीं चपखल संस्कृताच्या सुवर्ण पात्रा ऐवजीं मराठीच्या रजतपात्रांत येणें अवश्यच होतें, व तेंच कार्य रा. रामराव भांबुरकर यांनीं सुंदर रीतीनें केलें आहे, हें म्हणण्यास मला आनंद होत आहे.

रा. भांबुरकरांच्या रचनेंत शब्दसौष्ठव नेहमींच आढळतें, व पंडित जगन्नाथरायांच्या सर्वोत्तम काव्यांच्या रूपांतरांतहि तें प्रतीतीस

येत आहे. त्यांत त्यांच्या सांप्रतच्या कृतीचा याहूनहि एक विशेष आहे; तो हा कीं ती कृति पद्यांतरित असल्यानें नेहमीं गुणगुणतां व म्हणतां येऊन चिरपरिचयाची होण्याचा मार्ग त्यानें मोकळा झाला आहे.

पंडितांचें चरित्र आजपर्यंत अपरिचितच होतें; तें रा. भांबुरकरांनीं खुद्द त्यांच्या जन्मभूमीस जाऊन तेथून त्यांच्या वंशजांकडून माहिती मिळवून, व शिवाय फारशी व संस्कृत ग्रंथांचे संदर्भ परीक्षून अत्यंत मेहनतीनें तयार करून वाचकांपुढें मांडलें आहे; त्यानें तेहि फार लोकप्रिय होईल अशी खात्री वाटते.

एकंदरींत रा. भांबुरकरांची कृति सुंदर वठली आहे यांत शंका नाहीं. उत्तरोत्तर त्यांचे हातून आणखी प्राचीन संस्कृत कवींच्या कृतीला मराठी वेषांतर मिळावें अशीच इच्छा त्यांची ही सांप्रतची कृति पाहून दरेकास वाटल्या वाचून राहणार नाहीं.

बडोदें, रावपुरा
तारीख १९ मार्च १९२८. } **दाजी नागेश आपटे.**

# प्रस्तावना.

सुप्रसिद्ध कविश्रेष्ठ पण्डित जगन्नाथराय यांचें नांव गंगालहरी व भामिनी विलास या दोन काव्यांच्या योगानें सर्व साधारण लोकांस परिचितच आहे. गंगालहरींतील कित्येक भक्तिरसपूर्ण पद्यें पुष्कळांच्या मुखोद्गत असतात व अनेक भाविक लोक सर्व गंगालहरीचें रोज पारायण केल्याखेरीज अन्नग्रहण करीत नाहींत. सुंदर कविकल्पना व रमणीय भाषाविन्यास या दोन गुणांमुळें सहृदयहृदयांना आल्हाद देणारीं भामिनी विलासांतील शृंगारिक व करुणरसपूर्ण पद्यें हीं अनेक रसिक जनांचें मनोरंजन करून त्यांचें संस्कृत वाङ्मयाबद्दलचें प्रेम द्विगुणित करितात; परंतु या दोन प्रसिद्ध काव्यांचे जनक म्हणून परिचित असलेले जगन्नाथ पण्डित व अलंकार शास्त्रावरील प्रमाणभूत समजला जाणारा व विद्वन्मान्य असा जो रसगंगाधर ग्रंथ त्याचे जनक जगन्नाथपंडित हे दोघेहि एकच होत, ही माहिती मात्र पुष्कळ लोकांस नसते. प्राचीन संस्कृत कवींमध्यें ऐतिहासिक दृष्टीचा अभाव असल्यामुळें, त्यांच्याबद्दल प्रमाणभूत विश्वसनीय माहिती फारच थोडी मिळते. यामुळें निरनिराळ्या मतांना अवसर सांपडतो व वादविवादाच्या तडाक्यांत सांपडल्यामुळें लपून बसलेलें सत्य बाहेर येण्यास अतिशय वेळ लागतो; म्हणून अशा कवींचा काल ठरविणें अगर त्यांचें चरित्र लिहिणें हें काम अत्यंत कठिण होऊन बसतें. परंतु अशा रीतीनें प्राचीन कवींच्या अंगींच दोषारोप करून स्वतःवरच्या जबाबदारींतून आपण

आपणांस मोडवून घेतलें, तरी त्यामुळें निदान अलीकडील तीनशें चारशें वर्षांतील संस्कृत कवींबद्दल व पण्डितांबद्दल आपण दाखवीत असलेली उदासीनता मात्र क्षम्य ठरत नाहीं अशा अनेक कवींचीं संपूर्ण विश्वसनीय माहिती मिळवून त्यांचीं कितिशीं चरित्रें लिहिलीं गेलीं आहेत? अर्थात् आमचा आळस व एकच विषयावर परिश्रम करण्यास लागणाऱ्या चिकाटीचा अभाव, हींच कारणें या गोष्टींच्या आड येत आहेत, यांत शंका नाहीं; व जगन्नाथ पण्डित यांचेंच ठळक उदाहरण या बाबतींत दाखवितां येईल. जगन्नाथ पण्डितांचें एकहि चरित्र अद्यापि व्यवस्थित रीतिनें प्रसिद्ध झालेलें नाहीं ! येवढेंच नव्हे, तर त्यांच्या रसगंगाधर ग्रंथाचें भाषांतर मराठींत तर नाहींच, परंतु इंग्रजी आदिकरून युरोपियन् भाषांतहि झालेलें नाहीं, ही मोठी आश्चर्याची गोष्ट होय.

जगन्नाथपण्डिताविषयींची ही अनास्था दूर करण्याचा प्रयत्न ×रा. रा. रामराव मार्तंड भांबुरकर यांनीं केला आहे. "सयाजी प्रशस्ति इत्यादि काव्यांवरून रा. भांबुरकर यांची कवी म्हणून प्रसिद्धि आहेच. या शिवाय ते सहृदय रसिक असून मार्मिक व बहुश्रुत विद्वान आहेत, हें त्यांनीं लिहिलेल्या या चरित्रावरून दिसून येईल जगन्नाथ पंडितां-

× रा. भांबुरकर यांनीं कांहीं सरकारी व कांहीं स्वतंत्र पुस्तकें लिहिलीं तीं:—दीर्घायू कसें व्हावें ?, लिंकनचरित्र, श्रीसयाजीवैभवानंदलहरी ( मराठी गायनाचा महिमा ) श्री सयाजीप्रशस्ति, श्री सयाजीराज्यशासनपद्धति, श्रीसयाजीसूक्तरत्न-मंजूषा ( सं. बाल्यचरित्र ), गायकवाडी ऐतिहासिक पोवाडे, सरदारदरकदारांचे इतिहास, इत्यादि.

च्या ग्रंथावरील रा. भांबुरकर यांचा व्यासंग दहा वर्षांपासून चालू आहे. या दहा वर्षांत त्यांनीं जगन्नाथ पंडिताबद्दलची माहिती अनेक ठिकाणाहून परिश्रमपूर्वक गोळा केलेली आहे, हें पुस्तकास जोडलेल्या परिशिष्टांवरून दिसून येईल. हें चरित्र लिहितांना रा. भांबुरकर यांनीं एका नवीन पद्धतीचा अंगीकार केला आहे. नुसत्या ऐतिहासिक व साधार माहितीवरूनच लिहिलेलें जगन्नाथ पंडितांचें चरित्र अगदींच त्रोटक व कदाचित् थोडेंसें नीरसहि झालें असतें व फक्त वाङ्मय संशोधक अशा कांहीं विद्वान लोकांचेंच लक्ष त्याकडे गेलें असतें. परंतु जगन्नाथ पंडितांचें चरित्र सर्व साधारण लोकांस समजावें व सामान्य लोकां कडून भक्तीनें व प्रेमानें तें वाचलें जावें, अशी रा. भांबुरकर यांची इच्छा असल्यामुळें, त्यांनीं हें चरित्र नवलकथेच्या रूपानें लिहिलें आहे. या योगानें रसपरिपोषाला अवसर सांपडून वाचकांच्या मनोरंजनास मदत होते व त्याचे बरोबर या महान् पण्डिताच्या चरित्रांतील विशेष गोष्टींचा परिचय वाचकांस चांगल्या रीतीनें होतो. अर्थात् या पद्धतीचा अवलंब केल्यामुळें चरित्रांत कांहीं गौण प्रसंग व पात्रें काल्पनिक योजावीं लागलीं आहेत. परंतु मुख्य जगन्नाथ पण्डिता-बद्दल ज्या ज्या गोष्टींविषयीं ऐतिहासिक पुरावा, दाखले, आख्या-यिका, माहिती इत्यादिकांचा आधार मिळाला, तो तो त्यांनीं निरनिराळ्या ठिकाणीं नमुद केलेला आहे.

जगन्नाथ पण्डितांचें गंगालहरी हें काव्य भक्तिरसानें ओथंबलेलें आहे. परंतु मूळ काव्य संस्कृतामध्यें असल्यामुळें पुष्कळांस त्याचा अर्थ कळत नाहीं. या कारणामुळें व शिवाय त्यास संगीताची जोड मिळा-

त्यास भक्तिरस अधिक खुलून दिसतो या हेतूनें, रा. भांबुरकर यांनीं गंगालहरी या काव्याचें मराठींत संगीत रूपांतर करून तें या चरित्रास जोडलें आहे. रूपांतर अतिशय प्रसादयुक्त व सोप्या भाषेत वठलें आहे; व त्यांत मूळांतील पण्डितांचा भक्तिरस यत्किंचित्‌हि कमी होऊं दिलेला नाहीं. शिवाय पद्यें निरनिराळ्या चालींवर व भिन्न भिन्न रागांत दिलेलीं असल्यामुळें लहान मुलांमुलींपासून भाविक थोर स्त्री-पुरुषांपर्यंत सर्वांनीं भक्तीनें व प्रेमानें म्हणण्यालायक हीं पद्यें झालीं आहेत यांत शंका नाहीं. त्यांतूनहि मूळ संस्कृत श्लोक, वामनी टीका, संगीत मराठी रूपांतर व गद्य भावार्थ, इतकी सामग्री असल्यामुळें संस्कृत न जाणणाऱ्या लोकांसहि पण्डितांच्या काव्याचा अर्थ पूर्णपणें समजण्यास मुळींच अडचण पडणार नाहीं.

जगन्नाथ पण्डितांच्या चरित्रांतून " यवनीपरिणय " हें कथानक घेऊन रा. भांबुरकर यांनीं एक नाटकहि लिहिलेलें आहे. हिंदु मुसलमानांच्या ऐक्याचा प्रश्न या नाटकांत गोंवलेला आहे; व यथा प्रसंग हास्यरसाची योजनाहि केलेली असल्यामुळें हें नाटक रंगभूमिवर आल्यास बरेंच परिणामकारक होईल असें वाटतें.

रा. रा. भांबुरकर यांच्या वाङ्मयविषयक या परिश्रमांचें रसिक व भाविक वाचकांकडून चीज व्हावें अशी इच्छा प्रदर्शित करून हा लहानसा प्रस्तावनालेख संपवितो.

बडोदें कॉलेज, ता. २४–२–२८ | भालचंद्र चिंतामण लेले. ( संस्कृत विषयाचे प्रोफेसर )

॥ श्री ॥

# हृद्‌गत.

॥ जयंति ते सुकृतिनो रससिद्धाः कवीश्वराः ॥
॥ नास्ति येषां यशः काये जरामरणजं भयम् ॥ १ ॥

पंडित जगन्नाथराय यांचें सर्वांगसुंदर चरित्र निराळें छापून प्रसिद्ध करण्याचें मी योजिलें होतें; परंतु येथील सहविचारिणी सभेच्या या सोबत असलेल्या अभिप्रायांत सूचना झाल्या—अन्वयें तें सांप्रतच्या साग्रसंगीत गंगालहरीकाव्याला प्रारंभींच जोडण्यांत आलें आहे. या चरित्रासंबंधांत आणि साग्रसंगीत गंगालहरीकाव्याविषयीं श्रीयुत डॉ. भालचंद्रराव चिंतामण लेले, एम. ए. पी. एच. डी. बडोदें कॉलेजचे संस्कृत विषयाचे प्रोफेसर, यांनीं लिहिलेल्या प्रस्तावनेंत विवेचन झालेंच आहे; तरी पण पंडित जगन्नाथराय यांच्या हृदयंगम चरित्रासंबंधांत माझें हृद्‌गत व साग्रसंगीत गंगालहरीकाव्याविषयीं थोडी अधिक माहिती येथें वाचकांपुढें मोकळ्या मनानें मांडणें अप्रयोजक होणार नाहीं, असें वाटल्यावरून ती या खालीं देण्यांत येत आहे.

२. वाणीच्या प्रकाशाची किंमत सूर्यप्रकाशा—इतकीच अमोल आहे; किंबहुना त्याहून कांहीं अंशीं ती जास्तहि आहे; कारण,

सूर्यप्रकाशाचें अस्तित्व दररोज बारा तासच असतें आणि वाणीच्या प्रकाशाचें अस्तित्व अहोरात्र चालू असतें. अशा प्रकारची वाणीचा प्रकाश पाडण्याची सत्ता प्राचीन कविरत्नांना होती; आणि अशा कविरत्नांच्या मालिकेचे पंडित जगन्नाथराय महाकवि हे मेरूच होत. पंडित जगन्नाथराय यांचें नांव ऐकतांच आबालवृद्धांच्या अंतःकरणांत त्यांच्याविषयीं पूज्यबुद्धीच उत्पन्न होते. याचें कारण, विश्वविद्यालयांत व पाठशाळांत त्यांचेविषयीं व त्यांच्या लोकमान्य ग्रंथांविषयीं असलेला अत्यंत आदर, हें होय; तसेंच बहुतेक भाविक लोक दररोजच्या प्रातः-स्नानाच्या वेळीं त्यांच्या भक्तिरसपूर्ण गंगालहरीकाव्याचें पठण करीत असतात. त्यांत विशेषेंकरून दरसालच्या ज्येष्ठ शु. १ पासून शु. १० पावेतोंच्या दशहरांत त्यांच्या गंगालहरीकाव्याचीं घरोघर पारायणें चालू असतात. यावरून जुन्या मतांचे वृद्ध, नव्या मतांचे तरुण, विद्वान व भाविक वगैरे सर्व लोक पंडित जगन्नाथराय यांना परमपूज्य अशी एक थोर विभूतीच मानतात हें उघड आहे.

३. पंडित जगन्नाथराय यांचें साग्र चरित्र अलौकिक व हृदयंगम आहे. या कामीं बडोदें कॉलेजचे प्रोफेसर मे. नबाबअलीसाहेब यांनीं फारसी, उर्दू, वगैरे ग्रंथांतून बरीच माहीती दिली आहे तसेंच पंडित जगन्नाथराय यांचे वंशज कौण्डिन्य गोत्रज श्रीवेदमूर्ती ब्रह्मश्री उपद्रष्टा सुब्रह्मण्य शास्त्री महाकवि आंध्रवेंगिनाडि, गोदावरी प्रांत, पोस्ट अंबाजी, गांव मुंगुंडा ( पंडितरायांची जन्मभूमि ) येथील राहणार यांनीं तैलंगी भाषेच्या जीर्ण हस्तलिखित पोथींतून पुष्कळ

माहिती दिली आहे. अक्षरें गळलेली, छिद्रें पडलेली, अशी ही जीर्ण पोथी कांहीं मोबदला देऊन मिळविण्याचा मी भगीरथ प्रयत्न करून पाहिला, परंतु त्यांत यश आलें नाहीं. या जीर्ण पोथींतील कित्येक दुर्बोध संस्कृत श्लोक जे थोडे बहुत समजले, ते पद्यें व संवाद या रूपानें सांप्रतच्या चरित्रांत दिले आहेत. पंडितरायांचे ग्रंथ व त्यांच्या संबंधांत प्रचलित दंतकथा वगैरे, यांच्याशीं सदरहू माहिती मिळवून पाहतां तंतोतंत जुळते. यावरून अकबर बादशाहाची अखेरची कारकीर्द, जाहंगीर बादशाहाची सबंद कारकीर्द आणि शाहाजहां बादशाहाची प्रारंभीची कारकीर्द, या तीनहि कारकीर्दींत पंडितरायांचा जयजयकार, संस्कृत वाङ्मयाचा उत्कर्ष आणि हिंदुधर्माविषयीं आदर हे तीन मुद्दे विशेष लक्षांत ठेवण्यासारखे आहेत; आणि ज्याप्रमाणें दोन स्त्रिया आपआपल्या मस्तकावर पाण्यानें भरलेल्या घागरी एकावर एक ठेवून वाटेनें जात असतांना करमणुकीस्तव नानाप्रकारच्या गोष्टी सांगत असतात; परंतु त्यांचें खरें लक्ष आपआपल्या मस्तकावरील घागरी खालच्या चुंबळीकडे वेधलेलें असतें; त्याचप्रमाणें पंडितरायावर नानाप्रकारचे प्रसंग आले व त्यांत त्यांनीं अनेकप्रकारचे अनुभवही घेतले, तरी पण त्यांचें खरें लक्ष मुक्ति मिळविण्याकडे लागलें होतें, असें त्यांच्या चरित्रावरून सहज दिसून येईल.

४. पंडित जगन्नाथराय यांनीं १ सुधालहरी. २ अमृतलहरी. ३ करुणालहरी. ४ लक्ष्मीलहरी आणि ५ पीयूषलहरी ( गंगालहरी ), अशा पांच लहरी निरनिराळ्या देवतांना उद्देशून केल्या आहेत. ज्या-

प्रमाणें दंडीचें पदलालित्य, भारवीचें अर्थगौरव आणि कालिदासाची उपमा याविषयीं प्रसिद्धि आहे, त्याचप्रमाणें पंडितरायांच्या काव्यांत प्रसाद व माधुरी हे दोन गुण ओतप्रोत भरलेले असल्याविषयीं त्यांची मोठी ख्याति आहे; आणि त्यांच्या पांचहि लहरी या गुणद्वयांनीं परिपूर्ण आहेत. मग इतर लहरींपेक्षां ही एक पीयूषलहरीच (गंगालहरी) अधिक प्रसिद्धीला येऊन लोकप्रिय कां झाली हा प्रश्न सहजच उद्भवतो. याचें कारण माझ्या मतें असें आहे कीं, श्रीक्षेत्र काशी येथें दशहरांत *आत्मवीरेश्वराच्या घाटावर बसून पंडित जगन्नाथराय यांनीं स्वतः रचलेल्या पीयूषलहरीचीं पारायणें केलीं; तेव्हां दशहरासमाप्तीच्या दिवशीं दरेक श्लोकाला या बावन्न पायऱ्यांच्या घाटाची एकेक पायरी याप्रमाणें पीयूषलहरीच्या बावन्न श्लोकांला बावन्न पायऱ्या श्रीगंगेचें पवित्रोदक चढत गेलें आणि अखेर श्रीगंगेनें प्रकट होऊन पंडितरायांचा यवनीसह उद्धार केला, हा अलौकिक दिव्य चमत्कार अवलोकन करून या पीयूषलहरीला त्या दिवसापासून लोक गंगालहरी म्हणूं लागले व प्रतिवर्षीं दशहरांत या काव्याचीं भाविक लोक अद्याप पारायणें करीत आहेत. श्रीगंगेच्या या अलौकिक प्रभावामुळेंच गंगालहरी हें काव्य विशेष प्रसिद्धीला येऊन लोकांच्या श्रद्धेला अधिक पात्र झालें आहे.

९. पंडितरायांच्या काव्यांत प्रसाद व माधुरी हे दोन गुण ओतप्रोत भरले आहेत हें जसें निर्विवाद आहे, तसें तीं काव्यें इतर कवींच्या

---

* याला जगन्नाथ पंडिताचा घाट असेंहि अद्याप म्हणत आहेत.

काव्यांपेक्षां समजण्यास कठिण आहेत हेंहि निर्विवाद आहे. दशहरांत व इतर पर्वकाळांत गंगालहरीचीं पारायणें भाविक लोक भक्तिपुरस्सर करतात, परंतु संस्कृत श्लोक समजण्यास कठिण असल्यानें त्यांतील खरें रहस्य फारच थोड्या लोकांस, म्हणजे जे संस्कृत भाषेंत उत्तम निपुण असतील त्यांसच, कळतें; इतरांस म्हणजे असंस्कृत अशा प्राकृत स्त्री-पुरुषांना त्यांचा अर्थ मुळींच कळत नाहीं. पुराणिक व हरदास त्या श्लोकांचा अर्थ गद्यांत प्रतिपादन करण्याचा प्रयत्न करतात, परंतु गद्यापेक्षां पद्यांचा ठसा श्रोतृसमाजांच्या अंतःकरणावर चांगला वठून तो कायम राहतो हें कोणीहि कबूल करील; म्हणून या लोकप्रिय संस्कृत काव्याचें मी मराठींत संगीत रूपांतर केलें आहे. त्यामुळें आबाल-वृद्धांचें मनोरंजन होऊन त्यांना बोधही उत्तम होईल अशी खात्री आहे. त्याशिवाय, पंडितरायांनीं श्रीगंगेला स्वतःची मातुश्री समजून ही काव्यरूपानें तिची प्रेमळ स्तुति केली आहे; तशीच व तीच स्तुति प्राकृत भाषेंत संगीतरूपानें सर्वांनीं केली असतां स्वार्थ व परमार्थ दोन्हीही साध्य करतां येतील, हा सुद्धां विशेष लाभ सर्वांना मिळेल.

६. प्रथम मूळ संस्कृत श्लोक, त्याचेच खालीं वामन पंडितांची समश्लोकी देऊन नंतर मराठी संगीत आणि शेवटीं श्लोकाचा थोडक्यांत भावार्थ, अशा क्रमानें या पुस्तकांत रचना करण्यांत आली आहे. यांतील संगीतांच्या चाली भिन्न भिन्न रागांत अगदीं साध्या व लोक-प्रिय अशाच योजिल्या असल्यामुळें तीं रसिक व भाविक आबालवृद्ध-स्त्रीपुरुषांना भजनाच्या सरळ व परिचयांतल्या चालीवरही म्हणतां

येतील. रात्रीच्या उपाधिरहित शांत वेळीं श्रीगंगामातेची प्रेमळ स्तुति एकाग्र चित्तानें करावयाची ज्यांची इच्छा असेल, त्यांना समंद रात्र हीं पद्यें म्हणावयास पुरून पहांटेस शेवटलें भैरवी रागांतलें पद्य गावयास उरेल असें मला वाटतें. यांतील प्रत्येक संगीत पद्याचें नोटेशनही होण्यासारखें आहे. या संगीत गंगालहरीचें जे सज्जन अथवा दुर्जन एकनिष्ठेनें नित्य पाठ करतील, ते इह आणि परत्र उत्तम प्रकारचें सौख्य भोगून अंतीं मोक्षपदाला पावतील.

७. या पुस्तकांत जीं मुख्य दोन चित्रें दिलीं आहेत त्यांची समजूत येणेंप्रमाणें—

(१) पंडित जगन्नाथराय यांनीं अकबर बादशाहाजवळ, बादशाहाच्या रजपूत राणीपासून झालेली कन्या भामिनी (लवंगी,यवनी) इची मागणी केली आहे; आणि (२) पंडित जगन्नाथराय भामिनीचा ( यवनीचा ) हात धरून घाटावर गंगालहरीचें पारायण करीत आहेत. श्रीगंगेच्या प्रवाहांतून मकरारूढ अशी श्रीगंगामाता प्रकट होऊन स्वतःचे दोनहि कर पंडितराय व यवनी यांना सन्निध घेण्यासाठीं पुढें करीत आहे. घाटावर पंडितरायांचे प्रतिस्पर्धी वे. हरदीक्षित वगैरे आपल्या अनुयायांसह हा दिव्य चमत्कार पाहून पश्चात्तापयुक्त होत्साते आश्चर्य करीत उभे आहेत. तसेंच आसपास जमलेले आबालवृद्ध नरनारी जयघोषयुक्त श्रीगंगामातेला नमस्कार करीत आहेत.

८. बडोदें कॉलेजचे संस्कृत विषयाचे प्रोफेसर श्री. भालचंद्रराव

चिंतामण लेले यांनीं या पुस्तकाची हस्तलिखित प्रत सूक्ष्म रीतीनें वाचून प्रस्तावना लिहून दिली; त्याचप्रमाणें सहविचारिणी सभेच्या साहित्य समितीचे सभासद श्री. रा. रा. वासुदेवराव वि. जोशी, बी. ए. एल्‌एल्. बी., व श्री. रा. रा. दाजी ना. आपटे, बी. ए. एल्‌एल् बी. यांनीं या पुस्तकाची हस्तलिखित प्रत मजकडून वाचून घेऊन व प्रतिपादन केलेल्या विषयाचें मनन करून आपआपले अभिप्राय लिहून दिले, याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहे.

९. वस्तु व्यवस्थितपणानें, जीर्ण इमारत जीर्णोद्धारानें, रूप अलंकारानें व रत्न शाणोल्लेखनानें पूर्ण शोभेला व महतीला पावतें; त्याप्रमाणें कालबाहुल्यमलानें मलिन झालेल्या पंडित जगन्नाथराय कविरत्नास, अनेक ऐतिहासिक वगैरे शोधात्मक घर्षणानें सोज्ज्वळ करून व चित्रचरित्रनाटकसंगीत वगैरे रूपानें रंगवून आबालवृद्धांच्या दृष्टिपथांत मांडण्याच्या माझ्या या प्रयत्नास यश मिळो आणि हें पुस्तक लोकादरास पात्र होवो अशी आशा करून आणि श्रीमंत सरकार परमकृपाळु **सयाजीराव महाराजसाहेब गायकवाड** यांच्याच आश्रयानें हें पुस्तक आज छापलें जाऊन प्रसिद्ध होत आहे त्याबद्दल श्रीमंतांचें अभीष्टचिंतन करून व **श्री. महाराज साहेबांना** मार्कंडेयाचें दीर्घायु चिंतून, हा प्रास्ताविक लेख संपवितों.

**बडोदें**—उंचीपोळ झापा,
राधाकृष्ण गल्ली.
रामनवमी शके १८५०
ता. २९ मार्च १९२८

**रामराव मार्तंड भांबुरकर.**

# पंडित जगन्नाथराय चरित्र

## परिच्छेदसूची.

क्रमांक. पृष्ठांक.

# पंडित जगन्नाथराय चरित्र

## परिच्छेदसूची.

१६. आत्महत्त्येच्या सिद्धतेनें भामिनीचें पंडितरायांकडे गमन. साहसकर्में करतांना तरुण अबला सबला होतात. काळोखांत एक विलक्षण प्रसंग. शारदालयांत पंडितांचें अहंकारयुक्त भाषण. भामिनीचें तें लपून ऐकणें. उभयतांचा हृदयद्रावक संवाद. भामिनीचें मूर्छित पडणें. पंडितांची अस्वस्थ वृत्ति. देवीचा साक्षात्कार. यवन वेषधारी ब्राम्हणांचा फुकट प्रयत्न. पंडितरायांनीं भामिनीस दिलेली मान्यता, [ ३३-४१ ]

१७. रहिमाचें कृष्णकारस्थान, भामिनी नजर कैदेंत. तारा व सोमदेव यांची आचाट बुद्धि. रहीम तळघरांत.[४२-४४]

१८ चंद्रिकेचें रामाचार्यांच्या मताशीं मिळणें. गुलाबचें दुःख. भामिनीची नजरकैदेंत विपन्नावस्था. चंद्रिकेची व तिची भेट. राणीचा कन्येला बोध. भामिनीचा दृढ निश्चय. गवाक्षाचा शोध. भामिनीचें दुःखांत सुख. [ ४४-४६ ]

१९. दिरंगखानाचा "तारेलाच वरीन" असा कबुली जबाब. गुलाबकडून ढवळाढवळ. तारेचें कारस्थान व दिरंगखानाची फजीती. दिरंगखानाचा करारनामा. तारेनें दिरंगखान हाच वर कां पसंत केला? [ ४६-४८ ]

२०. पंडितांची विरहावस्था. भामिनीकडील आनंदाचें पत्र. पंडितांची मोठ्या उमेदीनें बादशाहकडे जाण्याची सिद्धता. [ ४८-४९ ]

२१. अकबराची मानसिक स्थिति. लवंगीचा (भामिनीचा) निश्चय अमलांत आणण्याविषयीं त्याच्या योजना. "नीमे दरूं नीमे बरू" या उक्तीबद्दल त्याचे विचारतरंग. [४९-५२]

२२. अकबराच्या विद्यमानें पंडितांचें शीघ्रकवित्व. पंडितांचें कवनपंचक (परिशिष्ठ अ.). पंडिताकडून लवंगीचें श्लोकबद्ध वर्णन ("इयं सुस्तनी..." पहा चित्र अं. ४ ). अकबराचें अत्यंत खुष होणें. पंडितरायांस चोर दृष्टीनें लवंगीची

खूण ( पहा चित्र अं. ४. ). पंडितांची स्पष्ट मागणी ( " न याचे गजालि......" ). अकबर व पंडितराय यांचा चटकदार संवाद. भानुमतीची सूचना. मागणी मंजूर. तिथीनिश्चय.
[ ५२-६१ ]

२३. लग्नांत विघ्न करण्याचा रहिमाकडून प्रयत्न. चंडिकेश्वराच्या देउळांत ब्राह्मणांची एकादसनी. रहीम ब्राह्मणांना चिडवितो. ब्राम्हणांत फुटाफूट. उभयतांचें जोरदार भाषण. रहीमाकडून सांकेतिक अक्षरें ब्राह्मणांना मिळाल्यानें लग्नमंडपांत घुसण्याचा त्यांचा निश्चय. [ ६२-६६ ]

२४. लग्नांत गोंधळ. बादशाहाकडून ब्राह्मणांचें समाधान. राजदंपतीला आशीर्वाद (पद्य). राजदंपतीचा स्वतंत्र सुखनिवास. [ ६६-६९ ]

२५. जाहांगिराच्या कारकीर्दींत पंडितांची स्थिति, ब्रह्मवृंदाची सभा. वादविवादाचे मुद्दे. प्रायश्चित्ताची खरी व्याख्या. पंडिताला बहिष्कार. " ज्योतिष्मती " ह्या दिव्य वनस्पतीचे अलौकिक गुणधर्म. औदासिन्यामुळें राजदंपतीचें विश्रांतीस्तव राधानगरास ( राढापुरीस ) प्रयाण. [ ७०-७२ ]

२६ पुष्पवाटिकेंतील जलमंदिरांत पुष्पशय्येवर भामिनीविलास ( उच्चमनोवृत्तीचा पूर्णशृंगार ). हृदयंगम संवाद. पंडितांची सत्याभिमानयुक्त प्रतिज्ञा. विवाहाचें रहस्य. प्राणाभरण व जगदाभरण या काव्यांचें समर्पण. शाहाजहांकडून पंडितांना सन्मानानें दिल्लीस पाचारण. [ ७२-८० ]

२७ हरदीक्षिताचे विचारतरंग. रहीम व दिरंगखान यांस हाताशीं धरून पंडितराय व भामिनी यांचा छळ करण्याचा त्याचा निश्चय. [ ८०-८२ ]

२८. दिरंगखान व तारा यांची स्थिति. हरदीक्षिताजवळ ताईत व दोरा. दरबारांत पंडितांचा अपमान करण्याचा हरदीक्षिताचा विचार. [८२-८३]

२९. शाहाजहांकडून पंडितास कविराज व दिरंगखानास गुणसमुद्र अशा पदव्या दरबारांत मिळतात. उभयतांची रौप्य-तुला. कुमंराज उर्फ खुर्रम्. हरदीक्षिताचा अपमान. दाराशुकोची श्रद्धा. आसफविलास-काव्यसमर्पण. [८३-८६]

३०. प्रवासाचा कार्यक्रम. यमुनातटाकीं आनंदोद्यानांत पंडितांचा मुक्काम. हरदीक्षिताचें छिन्नमस्तादेवीपुढें अनुष्ठान. [८६-८७]

३१. पंडितांच्या गर्वपरिहार्थ दैविक योजना. पंडितराय व भामिनी यांच्या हृदयांत मोहमायेचा प्रवेश. दिरंगखान व रहीम हे तारा व भामिनी यांना कपटानें धरून घेऊन पळाले. [८७-८८]

३२. पंडितरायांचें मथुरेस रायमुकुंदाकडे आगमन. पंडितांचा क्रोध. भामिनीच्या शोधार्थ त्यांचें व इतर मंडळींचें निरनिराळया मार्गानें प्रयाण. [८९-९०]

३३. डोंगरीकिल्यांत भामिनी व तारा नजरकैदेंत. दिरंगखान व रहीम यांच्याकडून त्यांचा अत्यंत छळ. [९०-९१]

३४. छिन्नमस्तादेवीचें विकाळ स्वरूप. हरदीक्षिताला छिन्नमस्तादेवीकडून पंडित व भामिनी यांचीं मायावी मुदतबंदी मिळालेलीं शिरकमळें. शिरकमळांची विलक्षण योजना. भामिनीला स्वप्नांत अकबर व भानुमती यांचें पिशाच्चयोनींत दर्शन व त्यांचा उपदेश. सुरापान करून भामिनीचा छळ करणाऱ्या दिरंगखानाला भामिनीविलासाऐवजीं सुराविलासाचे भोगावे लागलेले परिणाम. त्यानें पापवासनेनें दाखविलेलें पंडिताचें शिरकमळ भामिनीनें जपून जवळ ठेविलें. [९२-९४]

३५. सोमदेव व रामाचार्य यांची भेट. त्यांनीं हरदीक्षिताच्या त्रिकुटांत हलक्या प्रतीचीं कामें वेष बदलून पत्करलीं.

रामाचार्यांकडून भामिनीची सुटका. शाल पांघरून निजलेल्या रामाचार्यास भामिनीच समजून धुंद झालेल्या दिरंगखानानें त्याला आवळलें. दिरंगखानास भामिनीविलास व ताराविलास या ऐवजीं सुराविलासांत लाथाबुक्क्यांचा मार. रामाचार्यांचें श्रीक्षेत्रकाशीस प्रयाण. सोमदेवाकडून तारेची पुरूषवेषांत सुटका व त्यांचें निरनिराळ्या मार्गानें काशीस प्रयाण.[९४-९८]

३६. पंडितांचा श्रीक्षेत्र काशीकडील प्रवास. भामिनीचें शिरकमळ पाहतांच त्यांचा दुःखातिरेक. वृद्धस्त्रीच्या रूपानें देवीचा साक्षात्कार व त्यांना आशीर्वाद. पंडिताचे दुःखोद्गार. भामिनीचें शिरकमळ मस्तकावर घेऊन पंडितरायांचें श्रीक्षेत्रकाशीस प्रयाण.

[ ९८-१०१ ]

३७. पंडितांच्या शिरकमळासहित सहगमनार्थ भामिनीचें जोगिणीच्या वेषांत श्रीक्षेत्रकाशीकडे प्रयाण. हरदीक्षित, दिरंगखान व रहीम हेहि काशीस येऊन पोंहचले. [ १०१-१०२ ]

३८. वडिल, मुलगा व सून यांचें निधनवृत्त पंडितास कळलें. नातू रामचंद्र याची भेट. पुत्रशोकांत पंडिताचे दुःखोद्गार. त्यांचा काशीक्षेत्रांत प्रवेश. रामाचार्याची भेट. भामिनीचें मायावी शिरकमळ दहनाच्या ऐनवेळीं अदृश्य झालें. गंगातीरावर रामाचार्यांचे झोंपडींत नातवासह त्यांचा निवास. आत्मवीरेश्वराच्या घाटावर त्यांचें गंगास्नान, गंगा पान व ध्यान.

[ १०२-१०४ ]

३९. जोगिणीच्या वेषांत गंगातीरावर भामिनीची सहगमनाविषयीं सिद्धता. ऐनवेळीं पंडितांचें मायावी शिर अदृश्य झालें. भामिनी, सोमदेव व तारा यांच्या भेटी. मुदत संपतांच पंडित व भामिनी यांचेवरील मायामोहाचें पटल नष्ट झालें. हरदीक्षितपक्षाकडील निराशा. रामाचार्यांच्या झोंपडींत एकंदर मंडळीच्या भेटी. महदानंद. [ १०५-१०६ ]

---



॥ श्री ॥

# पंडित जगन्नाथराय

## चरित्र.



श्रीशैलपर्वताच्या पश्चिमेस असणाऱ्या आंध्रदेशाचे वेंगिनाडी, वेलुनाडी, इत्यादि दहा विभाग प्रसिद्ध आहेत; त्यापैकीं वेंगिनाडी विभागाच्या मुंगुंडा गांवीं ( पेरमभट्ट ) या नांवाचा तैलंग ब्राह्मण राहत असे. त्याचें गोत्र कौण्डिन्य असून शाखा आश्वलायन ऋग्वेदी होती. तो गीर्वाण भाषेचा मोठा ज्ञाता, भोक्ता असून कर्तव्यदक्ष असल्याकारणानें अत्यंत लोकप्रिय झाला होता. त्याच्या स्त्रीचें माहेरचें नांव गंगुमाई होतें आणि सासरचें नांव लक्ष्मी होतें. स्वतःच्या सहधर्मचारिणीच्या सत्समागमानें मोठ्या सुखाचा प्रपंच चालवीत असतां पेरुभट्टाला गृहस्थाश्रमरूपी वृक्षाचें सत्फल मिळण्याचा सुसमय प्राप्त झाला: श्रीमती सौ. लक्ष्मीबाईला पेरुभट्टासारख्या विद्वान पतीचें अखंड सान्निध्य असल्यामुळें तिची बुद्धि तीव्र व सुसंस्कृत झालेली होती. तिला दोहदावस्था प्राप्त होऊन ॥प्रसादचिन्हानि पुरःफलानि॥ या उक्तीस अनुसरून वेदविषयक चर्चा करावी, शास्त्रीय ग्रंथावलोकन करावें, अशा प्रकारचे उच्चमनोवृत्तीचे डोहाळे होऊं लागले. अखेर सौ.

लक्ष्मीबाईचे नऊमास पूर्ण भरून शके १४७२ च्या ( इ. स. १५५० चा ऑगष्ट ) श्रावण मासांत ती पुत्ररत्नाला प्रसवली. पेरुभट्टानें पुत्राचा जातकर्म, नामकर्मादि संस्कारांसहित जन्मोत्सव मोठ्या थाटानें साजरा केला; आणि पुत्राचें नामाभिधान **जगन्नाथ** असें ठेविलें. हाच सांप्रतचा चरित्रनायक **पंडित जगन्नाथराय महाकवि** अशा लोकमान्य नांवारूपाला चढून अजरामर झाला.

२. **पंडितरायांचा** बुद्धिप्रभाव बाल्यावस्थेंत विशेषसा दिसला नाहीं. पेरुभट्टानें ८ व्या वर्षी त्यांचा व्रतबंध करून सरस्वतीचा प्रसाद होण्यास्तव त्यांच्याकडून क्रमाक्रमानें गायत्रीपुरश्चरण करविलें आणि वेदशास्त्राध्ययनास प्रारंभ करविला. पंडितरायांनीं आपल्या " रसगंगाधर " या नांवाच्या ग्रंथाच्या प्रारंभीं पेरुभट्टाला "लक्ष्मीकांतं महागुरुम् " असें म्हटलें आहे; कारण पेरुभट्टाची योग्यताच तशी होती. पेरुभट्ट हा ज्ञानेंद्रयतीपासून वेदांत, महेन्द्रापासून काणाद व गौतम यांच्या तत्वज्ञानपद्धती, खण्डदेवापासून जैमिनीची मीमांसा, आणि शेषवीरेश्वरपंडितापासून पातंजलीचें महाभाष्य शिकला होता. पंडितराय यांची मातृपितृभक्ति अत्युत्कट होती. त्यांत " **मातृदेवो भव** " या तत्वाला अनुसरून मातृभक्ति तर अवर्णनीय होती. त्यांच्या ब्रह्मचर्यव्रतावर वडिलांची सक्त देखरेख असल्या कारणानें ते सूर्याप्रमाणें तेजस्वी दिसत होते. कांहीं दिवसानंतर पंडितरायांची मातुश्री सौ. लक्ष्मीबाई ज्वरादिकाच्या निमित्तानें इहलोकाची मर्त्ययात्रा संपवून परलोकवासी झाली. अद्वितीय मातृसेवा अवलोकन करून पंडितरायांच्या मातेनें

अंतःकाळसमयीं त्यांना उत्तम आशीर्वाद दिला होता आणि त्याचा अनुभव त्यांनीं अखेरपावेतों घेतला. कित्येक सद्गृहस्थांनीं पंडितरायांची बुद्धिमत्ता व विद्वत्ता पाहून त्यांचा विवाह करण्याविषयीं पेरुभट्टास विनंती केली त्याप्रमाणें मोठ्या थाटानें व कौतुकानें पंडितरायांचा विवाह झाला; आणि सुनेचें नांव भामिनी असें ठेविलें. मुलगा व सून ऐक्यभावानें व मोठ्या प्रेमानें वागत असलेले पाहून पेरुभट्टास अत्यंत समाधान वाटलें. पंडितरायांचा विद्याव्यासंग दांडगा असल्यामुळें सत्समागमानें त्यांची स्त्री भामिनी हीसुद्धां पतिपरायण व मोठी विदुषी निवडली. कांहीं दिवसांनंतर पंडितरायाला "विनायक" या नांवाचा पुत्र झाला. नातवाला आजोबाचा विशेष लळा असल्या कारणानें तो नेहमीं आजोबा जवळच राहत असे.

२. वडिलांची आज्ञा घेऊन पंडितराय प्रथम कर्नाटकांत गेले. तेथील राजेलोकांच्या त्यांनीं भेटी घेतल्या, परंतु त्यांची चहा झाली नाहीं. त्यानंतर ते मराठी दरबारांत राजाकडे गेले, परंतु हलक्या प्रतीचे कपडे त्यांच्या अंगावर असलेले पाहून राजदूतांनीं तेथें त्यांचा प्रवेश होऊ दिला नाहीं. आपल्या गुणांची येथेंहि कोणी किंमत करण्याचा रंग दिसत नाहीं असें पाहून ते अतिशय त्रासले व मोठ्यानें कांहीं संस्कृत श्लोक म्हणून त्यांत त्यांनीं मराठी दरबारांतील कवींच्या नीच बुद्धीला उद्देशून बरीच निंदा केली. हा प्रकार मराठी राजाच्या कानावर जातांच राजानें पंडितरायाला जवळ बोलावून चांगल्या देणग्या

दिल्या व त्यांची यथायोग्य संभावना करून रवानगी केली. त्यानंतर पंडितराय परत आपल्या गांवीं आले.

४. पंडितरायांची पत्नी सौ. भामिनी इला क्षयाची भावना होऊन ती लवकरच निवर्तली. ऐन तारुण्याच्या भरांत पत्नीं गत झाल्यामुळें पंडितरायास अत्यंत दुःख झालें; आणि ह्या असह्य दुःखामुळें त्यांना चित्तभ्रम होईल किंवा काय अशा विषयीं त्यांच्या वडिलांस मोठी चिंता उत्पन्न झाली. त्यांचें दुसरें लग्न करण्यासंबंधांत वडिलांनीं प्रयत्न पुष्कळ करून पाहिला व पुष्कळ मुलीहि चालून आल्या पण गत पत्नी सारखी विदुषी आणि सर्वांगसुंदर एकहि मुलगी न आढळल्यानें पंडितरायांकडून संमति मिळाली नाहीं. म्हणून तशी स्त्री मिळे पावेतों अविवाहित राहण्याचें पंडितरायांनीं ठरविलें. नियमित वेळीं त्रिकालस्नानसंध्या, शास्त्राध्ययन आणि कडकडीत ब्रह्मचर्य यांवर वडिलांची सख्त देखरेख असल्यामुळें पंडितरायांचें तेजोबळ उत्तरोत्तर वाढत चाललें हें खरें; परंतु पत्नीवियोगाच्या मोठ्या आघातामुळें अखेर ते भ्रमिष्टासारखें करूं लागले. अशा त्यांच्या बिकट स्थितींत पेरुभट्टानें दूरवर विचारकरून पंडितरायांना बालात्रिपुरसुंदरीच्या षडक्षरी महामंत्राचा गुरूपदेश केला व या महामंत्राची एक हजार पुरश्चरणें त्यांच्याकडून विधिपूर्वक करविलीं. श्रवण, मनन, निजध्यास आणि साक्षात्कार या क्रमाप्रमाणें बालात्रिपुरसुंदरीनें पंडितरायाला स्वप्नांत आपल्या मोहमायेचा चमत्कार लागलींच दाखविला तो येणें प्रमाणें:—

" एका स्त्रीराज्यांतील रमणीय उद्यानांत नवतारुण्यभरानें रसरसलेल्या अवयवांच्या शेंकडो तरुणी, जणूं काय यौवनमदाच्या मुग्धमधुश्रीचा अनुभव घेण्यासाठींच किं काय, इकडून तिकडे, आनंदांत निमग्न होऊन फिरत होत्या. अशा तरुण स्त्रीसमूहांत, पंडितराय भ्रमिष्टासारखे इतस्ततः भटकत असतांना, सांपडले. मग काय विचारतां ? " आधींच उल्हास आणि त्यांत आला फाल्गुन मास " या रूढ म्हणीप्रमाणें बऱ्याच स्त्रिया त्यांच्या सभोंवतीं भराभर गोळा झाल्या आणि त्यांना आपल्या महाराणीकडे जलमंदिरांत घेऊन गेल्या. सुवर्णमंचकावरील पुष्पशय्येवर सुवर्णकेतकीवर्णाची कुसुंभारुणचारुचैल परिधान केलेली प्रसन्नवदना सोळावर्षांची एक दिव्य रूपवती तरुणी बसली होती. पंडितरायाला पाहतांच ती दिव्य तरुणी उठून उभी राहिली आणि त्यांना आपल्यासन्निध असलेल्या सुवर्णासनावर तिनें बसविलें. अशी सौंदर्याची खाण पाहिल्यावर कोण भुलणार नाहीं ? तीं दिव्य तरुणी पंडितरायांच्या दृष्टीस पडतांच मोहानें ते अगदीं गांगरून गेले, त्यांच्या सर्वांगाला डवडवून घाम सुटला, सर्वांगावर रोमांच थरथरून उभे राहिले आणि कंपित स्वरानें " तूं कोण ? " असें विचारतांना त्यांची बोबडीच बळली. दिव्य तरुणी ती बालात्रिपुरसुंदरीच होय ! बालात्रिपुरसुंदरीनें पंडितराय अशा रीतीनें गोंधळून जाण्याचें कारण ताडलें, तेव्हां ती म्हणाली—"मला उद्देशून तूं जीं पुरश्चरणें केलीस त्यायोगानें मी प्रसन्न होऊन तुला दर्शन दिलें. आतां तुला काय पाहिजे असेल ते बेलाशक मागून घे." " अगदीं तुझ्या सारखीच रूपगुणादि सकल-

श्वर्यसंपन्न आणि माझ्या गतपत्नीसारखी विदुषी अशी स्त्री मला मिळावी " याप्रमाणें पंडितरायांनीं मागणें मागतांच बालात्रिपुरसुंदरीनें पंडितरायांना प्रसन्न चित्तानें *वरप्रदान दिलें. " हे वत्सा ! तूं कुरुदेशांत गमन कर. तेथें तुझे सर्व मनोरथ पूर्ण होतील. तूं वेदशास्त्रसंपन्न होशील आणि प्रतिस्पर्ध्याशीं वादविवाद करतांना विजयश्री तुलाच माळ घालील. " याप्रमाणें वरप्रदान देऊन त्या देवीनें स्वतःच्या मुखांतला अर्धा तांबूल पंडितरायांच्या मुखांत घातला आणि पंडितरायांच्या मस्तकावर वरदहस्त ठेवून नंतर आपल्या ऐश्वर्यासहित ती गुप्त झाली. "

८. पंडितरायांनीं स्वप्नांत पाहिलेला सर्व प्रकार आपल्या वडिलांस निवेदन केला; त्यामुळ त्यांना आनंद झाला. देवीची आज्ञा झाल्याप्रमाणें पेरुभट्टानें लागलींच पंडितरायाला उत्तर हिंदुस्थानांत ( कुरुदेशांत ) जाण्यास परवानगी दिली. देवीच्या प्रसादानें पंडितरायांचा बुद्धिप्रभाव उत्तरोत्तर वाढत चालला; लवकरच ते प्रवास करण्यास निघाले आणि **मारवाड (मरु)** देशाच्या वाटेनें ते प्रथम जयपुरास येऊन पोंहचले. जयपुरपति राजा भगवानदास यानें पंडितरायांस उत्तम आश्रय दिला; त्यायोगानें पंडितरायांनीं तेथें एक मोठी पाठशाळा ( College ) स्थापन केली; आणि पुष्कळ विद्यार्थी न्याय, व्याकर-

* हें वरप्रदान तीन श्लोकांत दिलें. त्यापैकीं एक श्लोक प्रसिद्ध आहे तो परिशिष्टांत दिला आहे; आणि तिन्ही श्लोकांचा सारांश जो आढळला तो वर दिला आहे.

णादि विषयांत चांगले तयार केले. याच पाठशाळेंत सोमदेव या नांवाचा एक विद्यार्थी उत्तम तयार झाला होता व तो पंडितरायांचा पट्टशिष्य होऊन अखेरपावेतों एकनिष्ठेनें त्यांच्याच जवळ राहिला. पंडितरायांना अनेक विषयांवर वादविवाद करण्याची मोठी हौस असल्याकारणानें त्यांनीं पुष्कळ विद्वानांना वादविवादांत जिंकिले. त्यांचें अलौकिक पांडित्य निदर्शनाला आल्यामुळें राजा भगवानदासाची पंडितरायावर अढळ श्रद्धा बसली, आणि तो वेळोवेळीं त्यांना चांगलें उत्तेजन देऊं लागला. याप्रमाणें पंडितरायांची कीर्ति उत्तर हिंदुस्थानांत सर्वत्र पसरत चालली व लवकरच ते एक मोठे नामांकित पंडित अशा श्रेष्ठ पदवीनें प्रसिद्धीला आले. जे स्वतःच्या अंगीं असलेल्या गुणांच्या बळावर प्रसिद्धीला येतात तेच उत्तम पुरुष समजावेत.

६. दिल्लीच्या तख्तावर त्यावेळीं अकबर बादशाहा होता; जयपूरपति राजा भगवानदास हा अकबराचा मांडलिक असून तो बादशाहाला खंडणी देत असे. बादशाहाला सर्व धर्मांचीं तत्वें समजून घेण्याचा फार नाद असे व तो पूर्ण होण्यासाठीं त्यानें कित्येक पंडित आपल्या पदरीं बाळगिले होते. त्याच्या कारकीर्दीत एक विद्वान काजी हिंदूधर्माचें खंडन व इसलामी ( मुसलमानी ) धर्माचें मंडन करणारा निपजला होता. त्यानें हिंदूधर्मांतील तत्त्वें चांगलीं समजून घेतलीं होतीं. हा काजी देशोदेशीं फिरून विद्वान ब्राह्मण पंडितांस धर्मविषयक वादांत जिंकून मुसलमानी धर्माचा थोरपणा सिद्ध करून दाखवीत असे. अकबर बादशाहाचा या काजीला चांगला आश्रय असल्यामुळें सर्व लोक याला

फार भीत असत; आणि उगाच वितंडवादाची अधिक चर्चा न वाढवितां काजीला मुकाट्यानें ते जयपत्रें लिहून देत असत. अशीं बरींचशीं जयपत्रें गोळा करून त्यानें बादशाहाची मर्जी चांगली संपादन केली होती. अशा रीतीनें गर्वानें फुगून उन्मत्त झालेल्या या काजीनें बादशाहाकडून एक जाहिरनामा प्रसिद्ध करविला होता तो येणें प्रमाणें:—
"आमच्या दरबारांत एक विद्वान काजी आले आहेत; त्यांनीं हिंदूधर्माचें रहस्य चांगलें समजून घेतलें आहे. हिंदूधर्म हा अनादि सिद्ध नसून तो मुसलमानी धर्मानंतरचा आहे असें हे काजी सिद्ध करून दाखविणार आहेत. तरी सर्व ठिकाणच्या विद्वान पंडितांनीं दिल्लीस येऊन काजीशीं वादविवाद करावा आणि कोणता धर्म अनादि सिद्ध आहे हें ठरवून घ्यावें." ह्या जाहिरनाम्याची बातमी हां हां म्हणतां सर्वत्र पसरली; त्यामुळें सर्वलोक "हिंदूधर्म आतां रसातळाला जातो किंवा काय" अशा काळजींत पडले. पंडित जगन्नाथराय यांची कीर्ति चहूंकडे पसरली होतीच; त्यांना दिल्लींतील हिंदूधर्माभिमानी विद्वान मंडळींनीं "सनातन वैदिक धर्मावर बिकट प्रसंग आला आहे." वगैरे मजकूर लिहून एक विनंतिपत्र पाठविलें. त्याचप्रमाणें जयपूरपतीकडे सुद्धां विनंतिपत्रें रवाना झालीं होतीं. जयपूरपती हा अकबर बादशाहाचा मांडलीक असल्यानें आणि त्याची स्वतःची बहीण भानुमती हिचा अकबराशीं हिंदूधर्मप्रमाणें विधीपूर्वक शरीरसंबंध झाला असल्या कारणानें मोठ्या संकटांत पडला; परंतु पंडित जगन्नाथराय हें नररत्न पदरीं असल्यामुळें त्याची काळजी लवकरच निवारण होऊन त्याला

मोठें धैर्य प्राप्त झालें. त्यांनें या संबंधांत पंडितरायांशीं वाटाघाट केली त्यावेळीं पंडितरायांनीं स्पष्ट सांगितलें कीं—“ महाराज ! मी आपल्या सन्निध आहे त्या अर्थीं आपण तिळमात्रहि चिंता करूं नये. मला ६ महिन्यांची मुदत द्यावी म्हणजे मी फकीराचा वेष घेऊन त्या काजीकडे जातो आणि मोठ्या चातुर्यानें त्याच्याकडून कुरान वगैरे ग्रंथ काढवून इसलामी धर्माचीं मूळ तत्त्वें व त्याचें रहस्य चांगलें समजून घेतों. त्यानंतर दिल्लीस जाऊन वादविवादांत “हिंदुधर्म हा अनादिसिद्ध आहे” असें ठरवून येतों.”याप्रमाणें प्रतिज्ञा करून त्यांनीं जयपूरपतीची परवानगी घेतली व फकीर वेष घेऊन त्या काजीकडे जाण्याची सिद्धता केली.

७. पंडितरायाला उर्दूभाषा उत्तमच अवगत होती, त्यामुळें फकीराच्या (मुसलमानी) वेषाची त्यांना सर्वोत्तम संपादणी करतां आली. ते दिल्लीच्या आसपास फकीराच्या वेषानें फिरले आणि लवकरच त्या काजीचा मुक्काम त्यांनीं हुडकून काढून त्याची भेट घेतली. उभयतांच्या प्रथम भेटींतच फकीराचें ( पंडितरायांचें ) दिव्यतेज पाहून काजीला मोह उत्पन्न होऊन मोठा आनंद झाला. “ तुम्हाला पाहिजे त्या विषयाची चांगली माहिती देईन; मात्र दररोज तुम्ही आमच्या सहवासाला राहिलें पाहिजे. ” असें काजीनें संतोषानें आग्रहपूर्वक फकिराला कळविलें. फकीर म्हणाला:—

“ आपण मला मुख्यत्वेंकरून कुरानाचें खरें रहस्य समजावून सांगावें. मी दररोज आपल्याला जी अनुकूळ वेळ असेल त्यावेळीं येत जाईन. माझें आपल्याजवळ राहणें होऊं शकेल असें नाहीं; कारण,

मी परान्न घेत नाहीं. शुद्धभिक्षान्नाची खिचडी चार घरीं मागून आणून कोठें तरी मशिदीजवळ शिजवून खातो व तेथेंच पडून असतो. असा माझा नियम अव्याहत चालू आहे. " काजीनें " फार उत्तम आहे " असें म्हणून फकीराचें म्हणणें कबूल केलें. त्याप्रमाणें फकीर दररोज नित्य नेमानें काजीजवळ येऊन इसलामी धर्माचें रहस्य समजून घेऊं लागला. सतत दृढाभ्यासानें षण्मासाचे आंतच पंडितराय (फकीर) इसलामी धर्माची पूर्ण माहिती मिळवून तयार झाले आणि काजीचे बहुत आभार मानून परत जयपुरास मुदतींत येऊन पोंहचले.

८. पंडितरायांची कीर्ति अकबर बादशाहाच्या कानावर गेली तेव्हां हुजूर हुकुमाप्रमाणें पंडितरायांस घेऊन येण्यासाठीं जयपूरच्या राजा भगवानदास यांजकडे तीन चार पत्रें मोगल दरबारांतून रवाना झालीं तीं जयपूरच्या दफ्तरांत आहेत. बादशाहाच्या हुकुमाप्रमाणें जयपूरपति पंडितरायांना घेऊन निघाले व लवकरच दिल्लीस येऊन पोंहचले. पंडितरायांचा ज्यादिवशीं दिल्ली शहरांत प्रवेश झाला त्यादिवशीं खास बादशाहाकडून त्याचप्रमाणें लोकांकडून बरींच प्रमुख मंडळी व ब्रह्मवृंद वगैरे त्यांना सन्मानानें आणावयास सामोरा रवाना झालीं होतीं. दिल्ली शहराच्या बाहेर मोठमोठाले तंबू देऊन काशीपासून रामेश्वरापावेतोंचे सर्व विद्वान शास्त्री व पंडित आले होते. त्यांची राहण्याची व वर्णाश्रम धर्माप्रमाणें आहारविहारांची उत्तम व्यवस्था बादशाहाकडून ठेवण्यांत आली होती. हा प्रकार काजीला व मुसलमान लोकांना आवडला नाहीं; पण बादशाहापुढें कोणाचेच कांहीं चालेना, म्हणून सर्वांना मुकाट्यानें बसावें

लागले. या वादविवादासाठीं दिल्लीशहराबाहेर जवळच एक विस्तीर्ण मंडप उभारण्यांत आला होता आणि त्यांत पांच सहा हजार लोक बसतील अशी सवड करण्यांत आली होती. बादशाहाच्या सिंहासना शेजारींच वामभागीं काजीसाठीं आणि वामेतर भागीं पंडितरायासाठीं त्यांच्या योग्यतेप्रमाणें सिंहासनें ठेवण्यांत आलीं होतीं. पंडितरायांच्या बाजूला सर्व हिंदुसमाज आणि काजीच्या बाजूला सर्व इसलामी समाज याप्रमाणें सर्व जागा ठरवून देण्यांत आल्या होत्या. बादशाहा आदिकरून सर्वमंडळी आपआपल्या जागीं बसल्यानंतर दररोज मध्यान्ह कालापासून सायंकाळपावेतों, याप्रमाणें नऊ दिवस वादविवादाचें काम मोठ्या कडाक्यानें चाललें. प्रथम तीनदिवस काजीनें स्वतःच्या इसलामी धर्माची थोरवी आणि हिंदूधर्माची निंदा या मुद्यावर प्रतिपादन केलें. त्यांत मुख्यत्वेंकरून इसलामी धर्म हाच अनादि सिद्ध असून हिंदु धर्म त्यानंतर निघाला असें सिद्ध करण्याचा त्यानें प्रयत्न केला. काजी आपल्या भाषणांत इसलामी धर्माची थोरवी वर्णन करतांना पदोपदीं आवेशयुक्त या खालीं दिलेलीं वाक्यें मोठ्या ऐटीनें व गमतीनें उच्चारीत असें:—

**॥ इसलामही[1] मजहबे[2] सही[3] है ॥ इसलामही मजहबे कवी[4] है ॥**
**॥ इसलामही मजहबे इब्तेदाई[5] है ॥ इसलामही मजहबे आखरी[6] है ॥**
**॥ इसलामही मजहबे आम[7] है ॥ इसलामही मजहबे काम[8] है ॥**

१. मुसलमानांचा. २. धर्म. ३ खरा. ४. मजबूत; शुद्धपाया असलेला. ५ सनातन. ६. निर्वाणीचा. ७. सर्वसामान्य. ८. व्यवहार्य; उपयोगी.

त्यानंतर तीन दिवस पंडितरायांनीं अस्खलित व श्रवणरमणीय भाषण केलें. त्यांनीं प्रारंभींच असें जाहिर केलें कीं–" या ठिकाणीं मी जें विवेचन करणार आहे तें केवळ धर्मविषयक आहे. मी जातीनें ब्राह्मण आहे म्हणून उगाच वितंडवाद वाढवून स्वधर्माची स्तुति आणि परधर्माची निंदा करण्याचा माझा विचार नाहीं. जें कांहीं खरें व सप्रमाण असेल तेंच मी या ठिकाणीं सिद्ध करून दाखविणार आहे पंडितराय प्रथमतः संस्कृत भाषेंत विवेचन करूं लागले व त्यांत त्यांनीं हिंदुधर्मांतील उदात्त व सर्वसामान्यतत्त्वें लोकांच्या मनांत चांगलींच बिंबवून दिलीं. यासंबंधांत काजीनें बरेंच आक्षेप उपस्थित केले परंतु ते सर्व पंडितरायांनीं कागदोपत्रीं सिद्धांत दाखवून खोडून काढले. बादशाहा अकबर याच्या मनांतून हिंदूधर्म आणि इसलामी धर्म यांचा चांगला खल करवून त्यांतून एक सर्व सामान्य नवीन धर्म स्थापन करावयाचा असल्यानें बादशाहाला त्यासंबंधांत पंडितरायांचें धोरण पुष्कळ अनुकूळ दिसलें. त्यावेळीं दिल्ली शहरांत व त्याच्या आसपास सर्वत्र उडदू भाषा प्रचलित होती; पंडितरायांची उदात्त तत्वें तेथील सर्व समाजास साररूया-रीतीनें कळावींत म्हणून बादशाहानें पंडितरायांना उडदू भाषेंत विवेचन करण्यास विनंति केली. पंडितरायाला उडदू भाषा चांगली अवगत होतीच. त्यांनीं उडदू भाषण करण्यास प्रारंभ करून म्लेच्छयवनादींची मूळ उत्पत्ति ऐतिहासिक दृष्टीनें कथन केली. त्यांतील तात्पर्य असें होतें कीं—" जसे यदूपासून यादव झाले तसेच अनुपासून म्लेच्छ आणि तुर्वसूपासून यवन उत्पन्न झाले. सगरानें आपल्या पित्याचें राज्य

हरण करणाऱ्या यवनांस ठार मारून त्याचा सूड घेईन अशी प्रतिज्ञा केली त्यावेळीं शक, यवन, कांबोज, पारद, पल्लव असे सर्व एकत्र जमून कुलगुरू वसिष्ठांस शरण गेले. तेव्हां वसिष्ठांनीं सगरास आज्ञा केली कीं—"तुझी प्रतिज्ञा खरी करण्यासाठीं मीं या यवनापासून क्षात्र धर्माचा परित्याग करवून त्यांना स्वतंत्र धर्म स्थापन करून दिला आहे. अशा रीतीनें ब्राह्मणांचा किंबहुना सर्व हिंदूंचा व यवनादींचा सहवास अगदीं तोडून टाकला आहे सबब त्यांना ठार मारू नको." सगरानें वसिष्ठांची आज्ञा मान्य केली तेव्हांपासून यवनांनीं इसलामी धर्म स्थापून आपआपलीं धर्मबंधनें स्वतंत्र ठरवून घेतलीं; आणि मनांतला वैरभाव काढून टाकला. तो वैरभाव स्मरून हिंदू मुसलमानांनीं आज आपसांत भांडत बसणें केव्हां-ही रास्त होणार नाहीं. त्यां काळांतले हैहय, तालजंघादि यवनांचें सामर्थ्य केवढें होतें ? त्यांनींसुद्धां कुलगुरू वसिष्ठांची आज्ञा मान्य करून ते सगराशीं ऐक्यभावानें वागू लागले; मग आपणसुद्धां असा धर्माचा कलह न वाढवितां ऐक्य भावानेंच वागलें पाहिजे हें मीं सांगितलें पाहिजे असें नाहीं." याप्रमाणें काजीनें काढलेले सर्वमुद्दे पंडितरायांनीं स्पष्ट करून एकंदर शंकांचें निराकरण केलें. पंडितरायांनीं सयुक्तिक कारणें दाखवून काजीस निरुत्तर केलें तेव्हां बादशाहानें वाद करण्याचें संपवून नवव्यादिवशीं भरलेल्या दरबारांत पंडितरायांस बहुमोल वस्त्रें व अलंकार देऊन त्यांचा गौरव केला. त्याचप्रमाणें मंडपांत जमलेल्या कांहीं विद्वान मंडळींस वस्त्रालंकारांनीं गौरविलें. बादशाहा

अकबर यानें स्वतःच्या जातभाई मुसलमान वर्गास गौरविलें असेल यांत मोठेसें नवल नाहीं; परंतु ब्राह्मण वगैरे हिंदुसमाजाची वाहवा केली हें मात्र महदाश्चर्य होय ! ! मोगलांच्या भरदरबारांत ब्राह्मणपंडिताचा असा जयजयकार होऊन संस्कृत वाङ्मयाचा उत्कर्ष कधींहि झाला नव्हता. अबुल्फझल् व असोफ् यांनीं या वादविवादासंबंधांत दोन मोठे लेख लिहून ठेवले आहेत. अशा रीतीनें धर्मविषयक वादांत पंडितरायांचा दिग्विजय जाहिर झाला आणि सभेचें काम संपविण्यांत आलें.

९. पंडितरायांच्या दिग्विजयामुळें काजी व थोडी बहुत त्याची अनुयायी मंडळी यांना बरें वाटलें नाहीं. हिंदुलोकांच्या शेंड्याकाढून त्यांना यावनी दीक्षा देण्याचा जो त्याचा उपक्रम पुष्कळ दिवसपावेतों चालू होता तो मात्र आतां मंदावत जाऊन अखेर बंद झाला. झालेला अपमान सहन न झाल्यामुळें काजी कंटाळून गेला, हताश झाला आणि लवकरच गाशागुंडाळून स्वदेशीं परत चालता झाला. त्याचा अल्पवयी मुलगा रहीम यानें मात्र खवळून जाऊन बापाजवळ अशी प्रतिज्ञा केली कीं-" मी स्वदेशीं येणार नाहीं. येथेंच राहून झालेल्या अपमानाबद्दल सूड घेईन. " बापानें या कामीं अनुकूळ मत दिलें नाहीं. तरी पण दुराग्रहाला पेटून आपली प्रतिज्ञा खरी करण्यासाठीं रहीम हा दिल्लीसच राहिला; आणि पंडिताला कोणत्या रीतीनें छळावें याचा विचार करूं लागला.

१०. जयपूरपति राजा बिहारीमल्लाचा पुत्र राजा भगवानदास यांस भानुमती नांवाची कनिष्ठ बहीण होती. तिचा बादशाहा अकबराशीं हिंदूधर्मशास्त्राप्रमाणें विवाह झाला होता. या भानुमती राणीला अकबरापासून झालेली भामिनी नांवाची सर्वांगसुंदर जी कन्या होती, तीच सांप्रतची चरित्रनायिका होय. अकबराची ती फारच लाडकी लेक असल्यामुळें तो तिला लवंगी असें म्हणत असे. या मुलीला लहानपणापासून संस्कृत शिकण्याचा फार नाद होता म्हणून अकबर बादशाहानें आपल्या पदरच्या रामाचार्य या नांवाच्या एका विद्वान शास्त्र्याची तिच्या संस्कृत शिक्षणासाठीं नेमणूक केली होती. एके दिवशीं राजबागेंत ही सोळा वर्षांची नवयौवना भामिनी आपली सखी तारा हिच्यासह खेळत होती, अशांत एका ब्राह्मण कुमाराची ओरड तिला ऐकूं आली. लागलींच आपल्या सखीसहित भामिनी तेथें धांवत गेली, तों एक तरुण यवन त्या ब्राह्मणकुमाराला शिखानष्ट करण्याच्या बेतांत आहे असें तिला दिसलें. राजकन्या भामिनी इला पाहतांच त्या यवनानें ब्राह्मणकुमाराला सोडून दिलें. रहीम (तरुण यवन) हा काजीचा मुलगा होता व मुकाट्यानें असलीं नीच कर्में करीतच होता. ब्राह्मणकुमाराला आपल्या ताब्यांत घेऊन त्याला विचारतांच—" पंडित जगन्नाथराय गुरुजींचा सोमदेव नांवाचा मी पट्टशिष्य आहे. गुरुजींच्या प्रदोषपूजेसाठीं फुलें निवडून येत होतो, अशांत हा शिखानष्ट मजकडे धांवत आला आणि मला शिखानष्ट करण्याच्या बेतांत होता या संकटांतून आपण कृपाकरून मला सोडविलें हे मजवर अनंत उपकार केले. याची फेड गुरुजींच्या

२

कृपेनें उत्तम झाल्याशिवाय राहणार नाहीं "–याप्रमाणें त्याची हकीकत ऐकून घेऊन, भामिनीनें रहिमाला मोठा दोष दिला. अशांत राजगुरू रामाचार्य, पंडित जगन्नाथराय यांचा वादांत दिग्विजय ऐकून, त्या मार्गानें घराकडे चाल्ले होते; त्यांनीं रहिमाकडून होत असलेला हा अत्याचार पाहून त्याला फजीत केलें व भामिनीला पंडित जगन्नाथराय यांच्या दिग्विजयाची थोडक्यांत हकीकत सांगून सर्व आपआपल्या ठिकाणीं निघून गेले. रहिमाला हा अपमान सहन न होऊन तो अत्यन्त खवळला, आणि त्यानें निश्चय केला कीं रामाचार्या-च्या पोटांत शिरून राजवाड्यांत एखादी नोकरी पत्करावी व गुप्तरीतीनें या काफरांचे बेत ढासळून पाडून त्यांना पायमाल करण्याच्या उद्यो-गास लागावें.

११. पंडित जगन्नाथराय यांचा वादांत दिग्विजय झाल्याचें वर्त-मान ऐकल्यापासून अशा सत्पुरुषाला केव्हां पाहीन असें भामिनीला झालें होतें. रामाचार्यांनींसुद्धां पंडितरायांच्या विद्वत्तेविषयीं तिच्याजवळ पुष्कळ स्तुति केली होती. ती पंडितरायांकडे नेहमीं पूजासाहित्य पाठवीत असे, हें पाहून त्यांना मोठें कौतुक व आश्चर्य वाटत असे. त्यांत स्वतः चा शिष्य सोमदेव याला भामिनीनें संकटमुक्त केल्याचें समजतांच तर त्यांना महदाश्चर्य वाटलें. 'राजनंदिनी ही यवनी असून भामिनी हें नांव तिला चंद्रलांछनाप्रमाणें अधिक शोभवितें' असें ते नेहमीं म्हणत असत. अकबर बादशाहाला असें वाटलें कीं, पंडित जगन्नाथराय हें

एक नररत्नच आपणाला लाभलें; म्हणून, अशा नररत्नाचा वादांत दिग्विजय झाला, त्याप्रीत्यर्थ एक हिंदूचालीचा मोठा दरबार भरवून त्यांत पंडितरायांचा मोठा बहुमान व गौरव करावा, आणि राजकन्या-लवंगीला (भामिनीला) संस्कृत विषयांत ज्ञानसंपन्न करवून, तिचा लग्न-समारंभ पाहण्यास पंडितरायाला जवळ ठेवून घ्यावें, असाहि त्यानें निश्चय केला. त्याप्रमाणें बादशाहानें एक मोठा हिंदूचालीचा दरबार भरविला; त्यांत मोगलाई तख्ताचे दिवाण *अबुल् फझल्, त्यांचे वडील बंधू सर्व मुसलमान जातींत पहिले संस्कृत पंडित व कवि × फैझी, संस्कृत ग्रंथांचे फारसींत तरजुमे करणारे सुप्रसिद्ध ग्रंथकार बदायुनी, सुविख्यात गवई तानसेन व त्याचा पुत्र बिलास, बिलासाचे सासरे लालखान, संस्कृत व फारसी या भाषांचे मिश्रश्लोक करून बाद-शाहाला नेहमी ऐकविणारे कवि दिरंगखान, राजगुरू रामाचार्य, आणि जयपूरपति राजे भगवानदासजी; अशीं मोठमोठीं विद्वान मंडळी होतीं. ह्या दरबारचा समारंभ पाहण्यास हिंदूचालीप्रमाणें चिकाच्या पडद्यांत बादशाहाच्या रजपूत राण्या व इतर स्त्रिया बसल्या होत्या. त्यांतच भामिनी ( लवंगी ) ही होती. दरबारांत पंडितरायांचें श्रवणरमणीय व प्रसादयुक्त झालेलें भाषण ऐकून भामिनीनें निश्चय केला कीं—" जर वरीन तर या ब्राह्मण पंडितरायालाच वरीन." कवि कुलगुरु कालिदा-

---

*यांनीं उर्दू भाषेंतील महाभारताच्या भाषांतराची प्रस्तावना लिहिली आहे.

×यांचा किताबखाना सर्व हिंदुस्थानांत सुप्रसिद्ध व प्रेक्षणीय आहे.

साच्या शाकुंतल नाटकाचें कै. अण्णाकिर्लोस्करांनीं जें संगीत रूपांतर केलें आहे त्याच्या पांचव्या अंकांत—" ॥ सुंदर वस्तू पाहुनि ऐकुनि अतिरमणीया वाणी ॥ उत्सुक होतो मनुज तयाला कारण नाहीं कोणी॥ ॥*स्मृति जननांतरिंची ॥ होते न कळत मनिं साची ॥१॥ ही साकी आहे, यांतील तत्वाला अनुसरूनच भामिनीनें असा निश्चय केला असला पाहिजे. दरबारांत अकबर बादशाहाच्या अनुकरणीय राजनीतीस अनुकूल अशीं संभाषणें झाल्यानंतर बादशाहानें पंडितरायांचे मूळ आश्रयदाते राजे भगवानदास यांचेकडून " भेट " म्हणून नररत्न पंडितरायास मागून घेतले, आणि त्यांचे संमतीनेंच पंडितरायांनीं बादशाहचें मागणें कबूल केलें. हिंदूधर्माचें खरें रहस्य आणि संस्कृत वाङ्मय यांची उत्तम समजूत करून घेऊन लाडक्या लवंगीला ज्ञानसंपन्न करणें हाच बादशाहाचा उद्देश पंडितरायास जवळ ठेवून घेण्याचा होता. त्याचप्रमाणें पंडितरायांच्या सहवासानें एक नवीन सामान्य धर्म स्थापन करण्याच्या कामीं त्यांचा आपल्याला मोठा उपयोग होईल अशी बादशाहाची समजूत होती. कांहीं दिवसानंतर शूर रजपूत राजे भगवानदास यांस बादशाहाच्या हुकुमानें काश्मिरच्या मोहिमेवर जावें लागलें. जातांना " पंडितराय हे ज्ञानी स्वभावाचे आहेत, त्यांना सांभाळावें " अशी विनंती त्यांनीं बादशाहाला केल्यावरून, बादशाहानें " पंडितरायांच्या संबंधांत अगदीं चिंता करण्याचें कारण नाहीं "

*॥ रम्याणि वीक्ष्य......॥ तच्चेतसा स्मरति नूनमबोधपूर्वम् ॥ भावस्थिराणि जननांतरसौहृदानि ॥ ( अभि. शाकुंतल अंक ५ ).

असें म्हणून त्यांची पूर्ण खात्री केली. बादशाहाच्या हुकुमाप्रमाणें राजवाड्यांतच अबुलफझल यांनीं पंडितरायांस राहवयास स्वतंत्र जागा देऊन त्या जागेचें नांव सुखनिवास महाल असें ठेविलें होतें; आणि तैनातींत माणसें देऊन त्यांची सर्व प्रकारें उत्तम तजवीज ठेविली होती.

१२ " भामिनीचें प्राथमिक संस्कृत शिक्षण रामाचार्यांच्या देखरेखीनें झालें असल्यामुळें तिला आतां गुरुशिष्य या नात्यानें शिकविण्याचें कारण नाहीं; संस्कृत काव्यालंकार वगैरे वांचतांना ज्या तिला शंका येतील त्यांचें केवळ स्नेहबुद्धीनें निवारण करीत जाईन." असें पंडितरायांनीं बादशाहाला प्रथमपासूनच सांगून ठेविलें होतें. त्याप्रमभाणें भामिनीचें दररोज संस्कृतवाचन पंडितरायांच्या विद्यमानें चालत असे. कवि दिरंगखान याची भानुमती राणीच्या तैनातींत खानगी कारभाऱ्याच्या जागीं नेमणूक झाली होती; आणि रहीम यानें स्वतःचा डाव साधण्यासाठीं दिरंगखानाच्या ताब्यांत नोकरी पत्करली होती. पंडितरायांच्या नित्यसहवासानें बादशाहाला हिंदूधर्माचें रहस्य व संस्कृत वाङ्मय यांचें चांगलें ज्ञान झालें होतें; त्यामुळें त्याची स्थिति धड हिंदू नाहीं व धड मुसलमानही नाहीं अशी झाली होती. मग " यथा राजा तथा प्रजा " या म्हणीप्रमाणें प्रजाजनांचीसुद्धां तशी स्थिति व्हावयाचीच यांत नवल तें काय* ? बादशाहानें नवमाला

* न सन्ध्यां संधत्ते नियमित निमाजं न कुरुते ॥ न वा मौञ्जी बन्धं कलयति न वा सुंनतविधिम् ॥ न रोजां जानीते व्रतमपि हरेर्नैव कुरुते ॥ न काशी मक्का वा शिवशिव न हिंदुर्न यवनः ॥ ( स. प. मा. पान ३६. )

पावणें, त्याच्यापुढें नारळ फुटणें, तीर्थ घेणें, कधीं कधीं तर गंधही लावणें, मिराबाईचीं पद्यें ऐकणें, तोडरमलाकडून सूरदासाला अटकेतून सोडविणें, हिंदूदेवता, सप्तग्रही वगैरेंची पूजा करणें, दानधर्म करणें, पंडित साधूसंत ब्राह्मणादिकांचा सत्कार करणें, हे सर्व प्रकार अव्याहत चालू झाले होते; आणि गोहत्या, गोमांसभक्षण, दाढी ठेवणें, चुलत बहिणीशीं लग्न करणें, निमाज पढणें, मक्केची जत्रा, हे प्रकार अगदीं बंद झाले होते.

१२. राजवाड्यांतील सुखनिवास महालांत पंडितराय सुखानें कालक्रमण करीत होते. ते आपल्या मनाशीं विचार करीत असत कीं—“ श्रीगंगामाउलीच्या आशीर्वादानेंच आज मी या योग्यतेला चढलों. आतां धड ऐहिक सुखसाधन नाहीं आणि धड आमुष्मिकही नाहीं अशा स्थितीपेक्षां ऐहिकसुखसाधन व तेंच पुढें आमुष्मिक परम-सुखाचें साधन म्हणजे सत्स्त्रीरत्न वरणें हेंच उत्तम होय. मनुष्यानें कोणत्याहि आश्रमावाचून राहणें इष्ट नाहीं यासाठीं पुनः सर्वोत्तम वस्तुलाभ दृष्टोत्पत्तीला आल्यास विवाह करावा हेंच उचित होय. कारण, ज्याप्रमाणें रासक्रीडावर्णनाचा हेतू भक्ति असून त्याचें रहस्य अध्यात्मिक आहे आणि ज्याप्रमाणें ज्ञानाचा हेतु जीवनमुक्तिसुख असून त्याचें रहस्य मोक्ष आहे; त्याचप्रमाणें विवाहाचा हेतू प्रजो-त्पादनाचा असला तरी त्याचें खरें रहस्य म्हणजे यज्ञादिकर्मानुष्ठानाची सिद्धि हेंच होय. ”—याप्रमाणें त्यांचें मानसिक चिंतन चालूं अस-

तांना एके दिवशीं दिरंगखान कवि तेथें आले आणि पंडितरायाला सांगू लागले कीं—" संस्कृत व उडदू या दोन्ही भाषांचे सुभाषित मिश्रश्लोक ऐकण्याची बादशाहा अकबर याला फार गोडी लागली आहे म्हणून तसे श्लोक दररोज करून मी हुजुराला ऐकवीत असतो " यावरून " असा एखादा मिश्र श्लोक ऐकवावा " असें पंडितरायांनीं त्यांना दर्शविल्यावरून दिरंगखानानें भामिनीला ( लवंगीला ) उद्देशून श्लोकार्ध म्हणून दाखविला तो येणेंप्रमाणें:—॥ **द्रष्टुं पुष्पवतीं नवां तरुलतां मैं तो गया बागमो ॥ कौमारी मम जीवनप्रियसुधा गुल् तोडतीथी खडी ॥** त्यानंतर अवशिष्ट श्लोकार्ध पंडितरायांनीं पूर्ण करावा अशी विनंति दिरंगखानानें केल्यावरून पंडितरायांनीं त्याचें उत्तर म्हणून त्याच तोडीचा श्लोकार्ध म्हणून श्लोक पूर्ण केला तो येणें-प्रमाणें:—॥ **वृक्षस्थद्विजराजरूपगुणवान् आपक् हुई देखके ॥ सा पुष्पागममंडिताऽपि विमला औरत् हुई गइ चली ॥१॥** याप्रमाणें अलंकारिक उत्तर ऐकून तो फारच खुष् झाला व निघून गेला. दिरंग-खान हा तरुण व देखणा होता; त्यांत त्याला संस्कृत चांगलें अवगत असल्यामुळें त्याच्याशींच भामिनीचा विवाह व्हावा अशी बादशाहाची इच्छा होती आणि बादशाहाचा तसा कल पाहून राणी भानुमतीलाहि तसेंच वाटणें हें योग्यच होतें. म्हणून कधीं कधीं ती भामिनीला दिरंग-खानाच्या समक्ष उडदू वाचावयास सांगत असे. दिरंगखानानें मोठ्या उमेदीनें भामिनीला म्हणावें:—" चला आपण **करीमा** वाचूं " मग तिनें कपाळ उठल्यासारखें दाखवून उत्तर द्यावें—" नाहीं जा ! मला

या वेळीं **रुक्मिणीस्वयंवर** वाचायचं आहे. " अशा प्रकारचे विनोदी झगडे त्या दोघांत नेहमीं चालू राहत असत. भामिनीचा निश्चय मूळ-पासूनच हिंदूजातीच्या सुसंस्कृत पतीला वरण्याचा असल्यानें तिचें दिरंगखानावर मुळींच प्रेम नव्हतें; परंतु तो मात्र सदैव तिच्यामागें लाळ घोटीत फिरत असे. लहानपणापासून भामिनीचें प्राथमिक शिक्षण रामाचार्यांच्या देखरेखीनें झालें होतें; त्यामुळें रामाचार्यांच्या मनांत भामिनीला पूर्ण मदत करावी असें वाटत असे; म्हणून अखेर त्यांनीं असेंहि ठरविलें कीं भगीरथ प्रयत्न करून भामिनीचा विवाह पंडित जगन्नाथराय यांच्याशींच व्हावा, असाच पाया रचून ठेवावा. अकबर बादशाहाला आपल्या अखेरच्या कारकीर्दीत हिंदूधर्माविषयीं जो इतका आदर वाटूं लागला त्याचें कारण सांईनाथकथाकरंडक नांवाच्या पुस्तकांत असें दिलें आहे कीं—'पूर्वीं मुकुंदबुवा नांवाचा मोठा तपस्वी होऊन गेला. त्यानें कांहीं अपरिहार्य कारणास्तव होमकुंडांत उडी घेऊन देह सोडला. त्याचाच अवतार हा अकबर बादशाहा होय.' पंडितरायांच्या नित्य सहवासानें अकबर बादशाहाची त्यांच्यावर अढळ श्रद्धा बसत चालली ती येथपावेतों कीं पंडितराय पाजतील तेवढेंच पाणी बादशाहा पीत असे. भामिनीविषयीं तर पंडितरायाला वरचेवर असें वाटत असे कीं—" पूर्वजन्मीं ही कोणी तरी माझी नातेवाईकच असली पाहिजे." कोणताहि विषय ग्रहण करण्याच्या कामीं तिची कुशाग्रबुद्धि पाहून पंडितरायाला मोठा विस्मय वाटत असे. एकेदिवशीं पंडितरायांनीं स्वतःच्या भामिनीविलासांतील श्लोकावर टीका लिहून दाखविण्यास

तिला सांगितलें. तो श्लोक येणें प्रमाणें:—

**॥ वंशभवो गुणवानपि सङ्गविशेषेण पूज्यते पुरुषः ॥**
**॥ नहि तुम्बीफलविकलो वीणादण्डः प्रयाति महिमानम् ॥ १ ॥**

यावर भामिनीनें साग्र टीका लिहून दाखविली. त्यांतील रहस्य येणें प्रमाणें:—"वीणादण्डाची तुंबडी जर फुटली तर त्याला सङ्गविशेष म्हणजे नवी लाविल्याशिवाय तो वीणादण्ड जसा आपलें काम करण्यास असमर्थ होतो; त्याप्रमाणें पंडितरायांची पहिली विवाहित स्त्री निवर्तली याकरितां आतां दुसरी नवी विवाहित स्त्री केल्याशिवाय ते आपला महिमा वाढवून पुढील कार्यक्रम सिद्धीस नेण्यास असमर्थ आहेत." स्वतःच्या श्लोकाचें असें रहस्य वाचून पंडितरायाला आश्चर्य वाटलें आणि ते मोठ्या घोटाळ्यांतहि पडले. तसेंच तिनें एकदां पंडितरायाला विषमालंकाराचें लक्षण उदाहरणासह विचारलें, तेव्हां त्यांनीं ॥ **विषमं वर्ण्यते यत्र घटना नानुरूपयोः** ॥ येवढें मात्र स्पष्ट उलगडून सांगितलें; परंतु त्याच्या पुढील ॥ **क्वेयं शिरीषमृद्वङ्गी क्व तावन्मदनज्वरः** ॥ हें त्याचें उदाहरण उच्चारण्याची वेळ आली तेव्हां ते मोठ्या विचारांत पडले. नुकतेंच विकास पावूं लागलेलें गुलाबाचें पुष्प आपल्या सान्निध्याला कोठेंहि असलें म्हणजे चहूंकडे सुगंध पसरण्याचा तें आपला जातीधर्म जसें सोडीत नाहीं, तद्वत् या सोळाव्या वर्षाच्या नवतारुण्यानें रसरसलेल्या अवयवांच्या राजनंदिनीचें यौवनपुष्प नित्य पंडितरायांच्या सान्निध्याला अस-

त्यामुळें, त्याचा सुगंध त्यांच्या शरीराच्या रन्ध्रारन्ध्रांतुन पसरेल यांत नवल तें काय ? रंभा तर शुक्राचार्यांकडे एकवेळाच गेली होती; पण ही विजेसारख्या कांतीची नवयौवना तर ॥ अरं भासमाना अरंभा समाना ॥ अशी असून तिचा त्यांना अखंड सहवास होता म्हणून ते मनाशीं नित्य विचार करीत असत कीं--॥ राजसेवा मनुष्यानां असिधारावलेहनम् ॥ या न्यायानें या तलवारीच्या धारेवर मी किती दिवस टिकणार ? ? असा प्रकार बरेच दिवस चालू राहिला, त्यामुळें भामिनीचें पंडितरायावरील प्रेम उत्तरोत्तर वाढत चाललें. कधीं कधीं रात्रीं झोंप न आल्याकारणानें भामिनी आपल्या सख्यासहित " नीमे दरूं नीमे बरूं " म्हणजे अर्धे ( धर्माच्या ) आंत आणि अर्धे ( धर्माच्या ) बाहेर [ धड हिंदू नाहीं आणि धड मुसलमानहि नाहीं ] अशी जी लोकांची स्थिति सर्वत्र दिसत होती त्यास उद्देशून गाणें म्हणून करमणूक करीत असे. तें गाणें येणेंप्रमाणें:—

( चाल फटक्याची. )

॥ निमे दरूं ही निमे बरूं बाई, धर्मविषयिं अकबरशाई ॥
॥ सर्वच ऐशी स्थिति पहा गे, विचित्र दिसते मज कांहीं ॥
॥ निमे दरूं ह्या अधिक शोभती, निमे बरूं सुंदर ललना ॥
॥ निमे दरूं हा निमे बरूं तो, पुरुषवर्ग सर्वच जाणा ॥ १ ॥

एकदां तर भामिनी हें गाणें म्हणत असतांना अकबराने आपल्या महलांतून ऐकिलें; व लागलींच तो अत्यंत रागावला; तेव्हां भामिनीनें

" नीमे दरुं नीमे बरुं" ह्यावर एक समयसूचक बयत रचून वेदांताच्या दृष्टीनें अकबराला उलगडून सांगितली. ( बयत ) ॥ अज् हैबतें शाहेजहां ॥ लरजद जमीनो आसमां ॥ अंगुस्ते हैरत दर्देहां ॥ नीमे दरुं नीमे बरुं ॥ 'परमेश्वराच्या कोपानें पृथ्वी व आकाश थरथर कांपतात; तीं नीमे आंत दिसतात व नीमे बाहेर दिसतात.' हा भावार्थ ऐकून अकबराचा राग शांत झाला; आणि लहान मुलींनीं अशा वेदांताकडे तूर्त लक्ष न देतां पंडितरायाला गुरु मानून ते सांगतील त्याप्रमाणें वागावें असें बादशाहानें भामिनीला सुचविलें.

१४. **भा**मिनीचा विवाह दिरंगखानाशीं होणार अशी बातमी सर्वत्र पसरत चालल्यानें ती अत्यंत चिंताग्रस्त झाली. पंडितरायांची श्यामसुंदर मूर्ति तिच्या हृदयमंदिरांत कायमची वसली होतीच; म्हणून पंडितरायांचें अलौकिक पांडित्य, सुरगुरुसारखी त्यांची विद्वत्ता व कविताशक्ति, प्रसाद व माधुर्य यांनीं ओतप्रोत भरलेली त्यांची वाणी, पंडितराय दृष्टीसमोर दिसतांच " हे कुणी तरी पूर्वजन्मींचे माझे निकट संबंधीच असावेत " अशी तिच्यामनाची वरचेवर होत असलेली भावना, या सर्व गोष्टींचा तिनें आपल्या मनाशीं पूर्ण विचार करून एकदां रात्रींच्या शांतवेळीं चोर वाटेनें पंडितरायांच्या सुखनिवासांत प्रवेश करण्याचें धाडस केलें; आणि पंडितराय निद्रावश असतांनाच त्यांचे चरण घट्ट धरून त्यांना जागृत करावयास ती गेली. सुखनिवासांत श्रीवाग्देवीची दिव्यमूर्ति होती तिला प्रथम " ( कामदा )

॥ भवतु मे सदा मंगलप्रदम् ॥ नाथदर्शनं सर्वसिद्धिदम् ॥ या प्रमाणें विनवून वंदन केलें. त्यानंतर पंडितरायांच्या शय्येजवळ पोथीचीं पानें पडलीं होतीं त्यापैकीं एक पान उचलून तिनें पाहिलें तो " अन्योक्ति प्रकरणम् " लिहितां लिहितांच पंडितराय निद्रावश झाले असावेत असें तिनें ताडलें. भामिनीनें पंडितरायांचे चरण घट्ट धरतांच ते खडबडून उठले आणि सखेदाश्चर्यवृत्तीनें त्यांनीं तिला उद्देशून संस्कृत श्लोक म्हटला. हा श्लोक व भामिनीनें उत्तराऐवजीं उच्चारलेले श्लोक जीर्ण पोथींत अस्पष्ट दिसल्यानें त्यांतील तात्पर्य ओळखून सर्वांना बोध व्हावयासाठीं त्यावर मराठी पद्यें रचिलीं आहेत तीं येणें प्रमाणें:—

पंडितजगन्नाथराय:—

( पद्य:—" ते कपटि कुटिल काकजातिचे " चाल. )

॥ हें खचित उचित तुज न सुंदरी ॥ रात्र फार तिमिर घोर, समयिं अशा कार्य काय वृत्ति बावरी ॥ ध्रु. ॥ नृपवर तव तात थोर ॥ परम धीर शूर वीर ॥ कळतां कीं करिल वैर ॥ मारक हें नकरी ॥१॥

भामिनी:—

( पद्य:—अंजनि. )

॥ रूप मनोरम वरेण्य अपुलें ॥ विद्याविनयें भूषित केलें ॥
॥ वादविवादीं यश मिळविलें ॥ ऐसे श्रेष्ठ कवी ॥ १ ॥

॥ उत्तम शिक्षण मजला दिधलें ॥ परम नीतिचें तत्त्व शिकविलें॥
॥ तन मन धन कीं मी अर्पियलें ॥ नाथा ! पद्कमलीं ॥२॥

( पद्य:—" कुणी कांहिं नका शिकवुं आतां " चाल. )

॥ अंगिकार करा प्रिय नाथा ॥ जगिं नाहि तुम्हांविण त्राता ॥
॥ आजि झाले अपुली कांता ॥ मान्य होईल हें मम ताता ॥१॥
॥ भुक्ति मुक्तिहि साधुनि लोकीं ॥ कीर्तिदुंदुभि गाजवुं नाकीं ॥
॥ वन्हि सोडिल अपुल्या दाहा ॥ निश्चय न ढळे तरि माझा हा ॥२॥

असा तिचा निश्चय ऐकून पंडितराय मोठ्या विचारांतच पडले. धर्मशास्त्राचीं तीव्रबंधनें आड येत असल्यानें त्यांनीं तिचें म्हणणें अखेर कबूल केलें नाहींच; त्यामुळें ती निराश होऊन परत गेली. भा'मनी तेथून निघून जातांच पंडितरायांच्या मनाला मोठी हुरहुर लागली; ती येथपावेतों कीं तिला परत बोलावण्यासाठीं ते द्वाराजवळ जाऊन डोकावूनसुद्धां आले; परंतु ती दिसली नाहीं तेथें त्यांचा इलाज खुंटला. विषयसुखानें तुडुंब भरलेली महानदी मोठा पूर येऊन सागराला वरण्यासाठीं आल्यावर सागराच्या लहरी अधिक वेगानें उसळूं लागतील यांत नवल तें काय ? अशी स्थिति पंडितरायांची होणें यांतही नवल नाहीं. अखेर त्यांना आत्मसंयमन करून स्वस्थ बसणें भाग पडलें. माघ काव्यांत श्रीकृष्णाच्या अंत:करणावर नारदाच्या दर्शनकाळीं परिणाम होत गेले, तशीच पंडितरायांच्या अंत:करणाची स्थिति झाली होती. म्हणजे नारदमुनि स्वर्गांतून उतरतांना एक तेजोमय पुंजच

खालीं येत आहे असें प्रथम श्रीकृष्णाला वाटलें. त्यानंतर जसजसा तो जवळ येत गेला तसतसें आकृति, स्पष्ट अवयव, तेजस्वी दिव्य पुरुष असे फरक क्रमानें दिसत जाऊन शेवटीं अगदीं जवळ आल्यावर हे नारदमुनिच, असें श्रीकृष्णानें स्पष्ट ओळखलें. त्याप्रमाणें भामिनीचें प्रथम दर्शन होतांच केवळ रसमय व अव्यक्त असा निर्मळ प्रेमातिशय पंडितरायांच्या अंतःकरणांत उद्भवला; आणि ही कोणी तरी पूर्वजन्मींची त्यांची अति निकट ऋणानुबंधी असावी असें त्यांना खास वाटलें. त्यानंतर जसजसा सहवास वाढत गेला तसतसा तोच प्रेमभाव नायक व नायिका यांच्या आजन्म बंधनावस्थेच्या रूपानें परिणत झाला. पंडितरायांच्या अशा स्थितींत रामाचार्यांनीं भामिनीच्या जन्मकुंडली वरून " इला विद्वान असा ब्राह्मणपति मिळून ही स्वतःच्या पतिसह बेचाळीस कुळांचा उद्धार करील " असा अपूर्व योग असल्याविषयीं पंडितरायांची खात्री केली तेव्हां पंडितरायांना मोठें आश्चर्य वाटलें.

१९. सूर्य व अग्नि हे पृथ्वीचे पार्थिव अंश आहेत, जीवात्मा हा देहांतर कोणत्या वेळीं करतो,तो मूळ प्रकृतींत केव्हां मिळून जातो, प्राणी मरणकाळीं वासनावश झाल्यानें पुनः त्याच योनींत तो जन्म कसा घेतो, अशा वेदांतिक विषयांची चांगली समजूत पंडितरायांनीं अकबर बादशाहाला दिली होती. त्याचप्रमाणें जातिभेद, स्पर्शास्पर्श वगैरे सामाजिक विषयांचीही उत्तम माहिती बादशाहाला त्यांनीं दिली होती. त्यामुळें बादशाहा पंडितरायांकडे सदैव प्रसन्नवृत्तीनें पाहत असे.

एकदां बादशाहानें पंडितरायांना अशी इच्छा दर्शविली कीं–" संस्कृत ग्रंथांचे फारशींत आणि फारशीचे संस्कृतांत तरजुमे झाले आहेत; त्या पैकीं कोण कोणते ग्रंथ लवंगीनें वाचले त्याची माहिती सांगावी " " लवंगीला समक्ष बोलावूनच ही माहिती विचारली असतां फार उत्तम होईल. " असें पंडितरायांनीं समर्पक उत्तर दिल्यावरून बादशाहानें लवंगीला लागलीच बोलावून आणून प्रश्न केला आणि लवंगीनें पंडितरायांच्या विद्यमानें जे जे ग्रंथ वाचले त्यांचीं +नांवें सांगितलीं तीं येणें प्रमाणें:–१. देविब्रह्मन, अब्दुल कादर, बदायुनी, व शेख सुलतान थानेसुरीकृत महाभारत.–२. हाजी इब्राहिम सरहिंदीकृत अथर्वणवेद. ३. फैझी ( अबुलफजलचा वडील भाऊ ) कृत लीलावती व नलदमयंती. ४. मुल्लाबलखान गुजराती कृत ताजक ५. मौलाना शिरीन शिराजकृत हरिवंश. ६. महमद गिझनीच्या वेळचे ×अबुरेहान बेरोनीकृत श्रीमद्भगवद्गोता, सामिका, पतंजली, ब्रह्मसिद्धान्त, लाजू आणि ७. अब्दुल्ला इहिनेअल्लीकृत चरक व ८. यहिआकृत सुश्रुत. ९. झिच्मिरजाई नांवाच्या ज्योतिष विषयक फारशी ग्रंथाचे संस्कृतांत तरजुमे फतहुल्ला, अबुल्फजल्, किसन ज्योतिषी, गंगाधर, महेश व महानंद यांनीं केले आहेत. आपल्या कन्येला संस्कृत विषयांत ज्ञानसंपन्न झालेली पाहून बादशाहाला वरचेवर आनंद होत असे. या

---

+ अंक १ ते ९ पावेतोंच्या सर्व ग्रंथांचीं भाषांतरें झालीं. × यानें संस्कृत ग्रंथांचीं अरेबिक मध्यें भाषांतरें केलीं.

संबंधांत पंडितरायांचे आभार मानून बादशाहानें त्यांना विशेष असें सुचविलें कीं—" काश्मिरचा बादशाहा जैजुल आबादीन व दिल्लीचा फिरोजशाहा तुघलख हे दोघे एकदां एका मंदिरांत ज्वालामुखी पाहाण्यास गेले होते; त्यावेळीं त्यांनीं तेथील १३०० संस्कृत उपयुक्त ग्रंथांचा जीर्णोद्धार केला*. त्या सर्व ग्रंथांचीं फारसींत भाषांतरें झालीं आहेत व ते सर्व ग्रंथ लाहोरास आम्ही प्रत्यक्ष पाहिले. ते सर्व ग्रंथ आपण वाचूच त्यांतील रहस्य समजावून सांगावें. " अकबर बादशाहाची ही सूचना पंडितरायांनीं मोठ्या आनंदानें मान्य केली आणि मोगलाईंत संस्कृत वाङ्मयाचा असा उत्कर्ष अवलोकन करून त्यांना अत्यन्त समाधान वाटलें. रामाचार्य व राणी भानुमती यांनीं " भामिनीला दिरंगखान हा वर पसंत नाहीं, तिचा निश्चय हिंदूपतीसच वरण्याचा दिसतो " वगैरे बादशाहाला कळविलें त्यावेळीं त्याला मोठा राग आला व त्यानें दर्शविलें कीं—" दिरंगखान हा रूपगुणसंपन्न असून संस्कृत ज्ञाता आहे, कोणाहि हिंदूवर असा जुलूम करतां येत नाहीं; सबब राणी व रामाचार्याची स्त्री चंद्रिका यांनीं लवंगीचें ( भामिनीच ) मन वळवावें, आणि तशा रीतीनें कार्य न झाल्यास मुलीचें कल्याण ज्यांत दिसेल तोच मार्ग अनुसरणें योग्य होईल. " या कामीं बादशाहानें पंडितरायांचें अनुमोदन घेतलें तेव्हां ते म्हणाले

---

* हिजरीसन ७७२. बदायुनीच्या इतिहासांत ही हकीकत आहे. बडोदे कॉलेजचे प्रोफेसर नबाबअली यांनीं इतिहासवेत्ता शिबिलीकृत उडदूनिबंध यांतून अं. १ ते ९ ची हकीकत दिली.

" वर्णाश्रम धर्मप्रमाणें **नग्निका** व **अनग्निका** अशा दोन्ही स्थितींतल्या मुलींचा विवाह होऊ शकतो. नग्निका म्हणजे ऋतुमती होण्याच्या पूर्वी मुलीचा विवाह करणें झाल्यास वधुवरांच्या जन्मकुंडल्या ज्योतिष शास्त्राप्रमाणें जमवून, व इतर व्यावहारिक गोष्टींचा आईबापांनीं चांगला शोध घेऊन, तिच्यासाठीं वर पसंत करावा; आणि **अनग्निका** म्हणजे ऋतुमती झाल्यानंतर मुलीचें मंगलकार्य करणें झाल्यास, मुलीनें मर्यादा व विवेक संभाळून स्वतःच वर पसंत करावा. त्यानंतर आईबापांनीं इतर व्यावहारिक बाबतींचा चांगला शोध घेऊन मुलीच्या संमतीनें तिचें मंगलकार्य करावें. म्हणजे निर्मळ प्रेमाच्या प्रभावानें दंपती चिरायू होऊन अंतीं त्यांस परमसुख प्राप्त होईल. सांप्रत भामिनी ही ऋतुमती आहे; म्हणून तिनेंहि याच तत्त्वांस अनुसरून स्वतः वर पसंत करावा. " याप्रमाणें पंडितरायांचें म्हणणें बादशाहाला चांगलें पटलें आणि त्याला मोठें समाधान वाटलें.

१६. **निराश** झालेल्या भामिनीनें पुनः एकदां मध्यरात्रींच्या वेळीं पंडितरायांची एकांतीं भेट घेण्याचें ठरवून ती त्यासाठीं सुखनिवासाकडे जाण्यास निघाली. कार्य झालें तर उत्तम, नाहींपेक्षां आत्महत्या करण्याच्या निश्चयानेंच तिनें गुप्त शस्त्र ( खंजिर ) जवळ बाळगलें होतें. चोरवाटेनें काळोखांतून ती जात असतांना तिला जवळच माणसाची चाहूल एकूं आली; त्यामुळें ती दचकून एकदम थांबली. तरुण अबला आईबापांच्या अगर इतर वडील माणसांच्या कितीहि धाकांत असल्या

तरी एकदां साहसकर्म करण्यास प्रवृत्त झाल्या म्हणजे संकटकाळीं त्यांच्या अंगीं शौर्य, धैर्य, मोठा धीटपणा हे गुण स्वाभाविक रीतीनें उत्पन्न होऊन त्या सबला होत असतात. या न्यायानें माणसाची चाहूल जिकडून ऐकूं आली, तिकडे ती त्वरेनें गेली व कमळांत लपविलेला खंजीर एकदम बाहेर काढून, काळोखांत संचार करीत असलेल्या स्त्रीचे केस तिनें धरले व तिला ठार मारणार अशांत ती स्त्री भयभीत होऊन म्हणाली:-" ताईसाहेब ! मी आपली अत्यन्त प्रिय तारा ! मला मारूं नका. आपण जातांना कोणतेंहि विघ्न उत्पन्न होऊं नये म्हणून मी या काळोखांतून इकडून तिकडे संचार करीत आहे." आपली ताराच आहे असें ओळखून भामिनी मनांत अतिशय ओशाळली आणि तिच्या स्वामिनिष्ठेबद्दल गौरव करून तिचें यथा योग्य समाधान केल्यानंतर भामिनी पुढें चालूं लागली. लवकरच सज्जाच्या वाटेनें जिना चढून सुखनिवासाच्या गच्चीवर येऊन ती पोहोंचली. मध्यरात्रीचा समय, घोर अंधःकार, अकालीं झिमझिम पाऊस, मेघांचा गडगडाट, विजेचा क्षणिक लखलखाट, अशा प्रतिकूळ स्थितींत सुखनिवासाचीं द्वारें व खिडक्या बंद असलेल्या पाहून प्रथम तिच्या मनाचा थोडा विरस झाला खरा, परंतु एक खिडकी उघडी असलेली पाहून तिला जो आनंद झाला त्या आनंदाच्या भरांत तिनें चट्कन् गच्चीच्या पाळीवर चढण्याचें धाडस केलें, आणि उघड्या असलेल्या खिडकींतून मोठ्या अडचणीनें सुखनिवासांत प्रवेश केला. तेथें असलेल्या श्रीगंगामाउलीच्या दिव्य मूर्तीचें दर्शन होतांच " हे श्रीधर-

चरणक्षालनशीले मातुश्री ! प्रियपत्नीच्या नात्यानें मजकडे अवलोकन करण्यास माझे नाथ ! जगन्नाथ ! यांची दृष्टि सदय कर ! " याप्रमाणें स्तुति करून तिनें सर्वत्र अवलोकन केलें, तों त्यावेळीं पंडितराय निद्रावश झालेले नसून त्यांचें काव्य लिहिण्याचें काम जवळच्या शारदालयांत चालू असलेलें पाहिलें. काव्याचा कांहीं भाग लिहिला कीं, तो मोठ्यानें एकदां वाचून पाहण्याची त्यांना संवय असल्याचें तिला माहीत होतेंच, म्हणून शारदालयाच्या द्वाराच्या आड लपून त्यांचें वाचन ऐकण्याचा तिनें विचार केला, त्याप्रमाणें वाचनास प्रारंभ होतांच ती लपून सावधान ऐकूं लागली. पंडितरायांनीं काव्याचा जो भाग * वाचला तो येणें प्रमाणें:—

" मेरूपासून थेट सागराच्या तटापावेतों जे ज्ञाते, पंडित व कवी असतील त्या सर्वांना मी स्पष्ट विचारतो कीं, एक फक्त माझ्या कवितेशिवाय द्राक्षाच्या गोडीप्रमाणें माधुरी तुमच्यापैकीं कोणा एकाच्या तरी कवितेंत दाखवून द्याल काय? आणि या वाणीचा अधिपति एक फक्त माझ्या शिवाय दुसरा असा या अवनीतलावरील नामांकित कविजनांत कोण धन्य कवि श्रेष्ठ आहे ? हें तुम्ही अगदीं निस्पृहपणानें सांगूं शकाल काय ?

या जगन्नाथाचे काव्यमधुरालाप कानावर आले असतां प्रत्यक्ष सरस्वतीसुद्धां मोठ्या प्रेमानें व कौतुकानें आपला वीणा वाज-

* पहा भामिनीविलासांतील शांतविलास श्लोक २६; २७; २८; २९.

विण्यास प्रारंभ करितें; त्या या कवीन्द्राच्या सुंदर कविता वाचून जे डोलत नाहींत, अथवा ज्यांचें चित्त तल्लीन होऊन द्रवत नाहीं, ते नर-पशूच समजावेत.

त्याचप्रमाणें मधु, द्राक्षें, साक्षात् अमृत आणि तरुणीचें अधरामृत, हीं द्रव्यें पुढें आलीं असतां जो मोहित होत नाहीं किंवा ज्याचें चित्तरंजनहि होत नाहीं तो जसा जीवंत असून मृताप्रमाणें समजावा, त्याचप्रमाणें या रससिद्ध जगन्नाथाच्या कवितेनें ज्याचें चित्त मोहित होत नाहीं तो प्राणी जीवंत असला तरी जड प्रेताप्रमाणेंच समजावा.

या काव्याला माझी प्रिया भामिनी हिचेंच नांव दिलें असतां तें खरोखरच चिरस्मरणीय होईल म्हणून या काव्याला भामिनीविलास हेंच सर्वांगसुंदर नांव देण्याचें आजन्म मी निश्चित करतो. ”

याप्रमाणें पंडितरायांचें वाचन संपतांच ते शय्येकडे यावयास निघाले. पंडितरायांचे खऱ्या स्वाभिमानाचे उद्‌गार ऐकून भामिनीला मोठें कौतुक वाटलें; त्यांत काव्याला स्वतःचेंच नांव दिलेलें ऐकून तिला महदानंद झाला. वास्तवीक रीतीनें पाहतां पंडितरायांनीं सांप्रतच्या भामिनीशीं कधींच विलास केले नव्हते; म्हणून भामिनीविलास हें नांव सांप्रतच्या भामिनीला उद्देशून नव्हतें. तें नांव त्यांच्या दिवंगत झालेल्या पहिल्या भामिनीला अनुलक्षून दिलेलें होतें. शारदालयाच्या

बाहेर शय्येजवळ येऊन पंडितरायांनीं भामिनीला साध्या पोषाकांत मुक्तकेशा अशी सलज्ज उभी असलेली पाहिली तेव्हां ते अतिशय गोंधळून गेले. " पुनः आज तूं कां येथें आलीस ? " असा प्रश्न निघतांच, " आपल्या काव्याच्या मधुरालापानें माझें चित्त मोहीत होऊन *गुरुनाथांच्या प्रियदर्शनाविषयीं मी फार आतुर झाले म्हणून येथें आले; नसते आले तर नरपशूंच्या उपमेला पात्र झाले असतें; तसेंच तरुणीचें अधरामृत प्रत्यक्ष पुढें आलें असतां जो मोहीत होऊन त्याचें पान करीत नाहीं तो पुरुष जीवंत असून जड प्रेताप्रमाणें समजावा, हें सुचविण्यास येथें आले " याप्रमाणें स्पष्ट उत्तर भामिनी-कडून मिळालें. याप्रमाणें उभयतांचा मोठा चटकदार व हृदयंगम संवाद झाला; त्याचें वर्णन करावें तेवढें थोडेंच होईल. मधून मधून पंडितरायांच्या मार्मिक प्रश्नांना समर्पक उत्तरें देतांना तिनें दर्शविलें कीं:—" प्रियगुरु-नाथा ! माझ्या गुणकर्मांकडे व स्वरूपाकडे पुनः एकदां सूक्ष्मदृष्टीनें पहा, म्हणजे आपली पूर्ण खात्री होईल कीं, आपल्या गत झालेल्या पहिल्या भामिनींत व या आपल्या सांप्रतच्या भामिनींत मुळींच अंतर नाहीं. नीरक्षीरविवेचनांत जसा हंस आळस न करतां स्वतःचें कुलव्रतच पाळतो, तसें आपण राजहंसच आहांत, स्वतःचें कुलव्रत पाळा व माझा अंगी-कार करा. माझें गुणकर्म हेंच क्षीर आणि हा माझा यावनी जड देह नीर समजा. ॥ पतिरेको गुरुःस्त्रीणां ॥ या भावनेनें आपण माझे

* येथें " **पतिरेको गुरुःस्त्रीणाम्** " ही तिची भावना तिनें प्रदर्शित केली.

गुरू आहांत. श्रीगुरुचरित्राचा महिमा मी एक निष्ठेनें श्रवण केला, भक्तिभावानें त्याचें चांगलें मनन केलें आणि त्याच्याच निजध्यासानें आज हा मला साक्षात्कार होऊन दिव्य दृष्टि प्राप्त झाली; म्हणून आपली अर्धांगी या नात्यानें माझा अंगीकार करून अंतीं मला सायुज्य मुक्तिप्रत न्यावें, म्हणजे आपल्या सत्समागमानें माझा उद्धार होईल." याच्या प्रत्युत्तरांतः—" केवळ कामांध होऊन स्वार्थ साधण्याच्या कृत्रिम प्रेमानें कांहींतरी तूं प्रतिपादन करतेस." असें पंडितरायांचें म्हणणें ऐकतांच भामिनीनें कमळांतून तेजस्वी खंजीर बाहेर काढला. हें पाहून पंडितराय घाबरले व त्यांनीं तिचा सशस्त्र हात बळकट धरून ठेवला. ते म्हणाले:—" भामिनी ! तूं म्हणतेस तसा मी पूर्ण ज्ञानी नाहीं व सत्ताधीशाही नाहीं. तशी उत्तमोत्तम स्थिति संपादन होण्यास अद्याप एकच शेवटली पायरी चढावयाची उरली आहे. तोंपावेतों सनातन धर्माच्या तीव्र बंधनांचा मला कसा उच्छेद करतां येईल ? तुझें गुणकर्म हें जरी सत्य आहे तरीपण तें तुझ्या या यावनी जडदेहांत कोंडलेलें आहे, म्हणून त्याचा स्वीकार मला कसा करतां येईल ? हें तूंच सांग." हें ऐकून भामिनी (यवनी) सावधान म्हणाली:—" या माझ्या यावनी जडदेहांत कोंडलेले निर्गुण निराकार असे माझे अत्यंत प्रिय पंचप्राण म्हणजे क्षीरच त्यांचा आपण राजहंसांनीं स्वीकार करून आपल्या हृदयमंदिरांत कायमचें वास्तव्य करण्यास जागा द्यावी, या हेतूनें हा जो माझा जड यावनी देह म्हणजे केवळ नीरच त्याचा हा पाहा मी त्याग करते." असें म्हणून खंजीर स्वतःच्या

उरांत मारून घेणार तोंच पंडितरायांनीं त्वरेनें तिच्या हातांतून खंजीर हिसकावून घेतला, आणि भामिनी मुक्तकेशा अशी निचेष्टित भूमीवर मुर्छित पडली. यावेळीं पंडितरायांची वृत्ति एकाएकी फारच अस्वस्थ झाली. लागलींच तेथें असलेल्या वाग्देवीच्या मूर्तीकडे ते गेले तों वाग्देवीची मूर्ति दिव्य व अधिक तेजःपुंज दिसूं लागलेली पाहून त्यांनीं मातुश्रींचें स्मरण केलें आणि त्या आपल्या कुलदेवतेचें चरण घट्ट धरून त्यावर मस्तक ठेवतांच त्यांनीं एक ध्वनि ऐकला तो येणेंप्रमाणें:— " जगन्नाथा ! ही यवनी नव्हे ! तुझी गतपत्नी भामिनी पतिपरायण होती. अंतःकाळीं ती वासनावश झाल्यानें तुझ्यासाठीं पुनः अवतरली आहे. ती सुसंस्कृत अशी आर्य असून अंतर्बाह्य शुद्धवर्णाची मूर्ति आहे. आतां इचा अंगीकार न करशील तर सर्वस्वी घात होईल. म्हणून अंतः-करणद्वयाची ऐक्यता कर, ज्ञानदृष्टीनें सूक्ष्म विचार कर म्हणजे धर्मा-भिमान जात्त्याभिमान इत्यादि पटलें नाहिशीं होतील. तुला पूर्वीं दिलेलें वरप्रदान हें आज मी पूर्ण केलें आहे. " अशा प्रकारची दिव्य वाणी श्रवण करतांच पंडितरायांनीं इष्ट देवतेला साष्टांग नमस्कार घातला. त्यानंतर त्यांना त्यांच्या गतपत्नी भामिनीचा सूक्ष्मदेह दिसला. त्या सूक्ष्मदेहाला भेटण्यास ते मोठ्या त्वरेनें गेले पण तो एकाएकीं अदृश्य झाला. त्यांचें अंतःकरण प्रेमातिशयानें सद्गदित झालें. त्यांनीं जवळ असलेल्या गंगाजळींतून गंगोदक घेतलें आणि तें मूर्छित झालेल्या भामिनीवर शिंपडून तिला सावध करण्यास जाणार तोंच दोघे धटिंगण यवन राजदूत " दीन्‌दीन् " असा भयंकर ध्वनि करीत तेथें आले

आणि हातांत असलेल्या दोरखंडानें पंडितरायाला बांधण्याची सिद्धता करून म्हणाले " बोलो, दीन् दीन् दीन्—पकडो और बांधो पंडितकू-ए शहाजादीका खून किया ! अफसोस् !!!" हा प्रकार पाहून पंडितराय आश्चर्यचकित होऊन छाती ठोकून म्हणाले—" अहो, अंधांनो ! नीट पहातर खरे ! राजकन्या मूर्छित झाली आहे. पहा, आतांच तिला सावध करतो "—असें म्हणून पंडितरायांनीं गंगोदक शिंपडतांच ती सावध होऊन " खंजीर ! खंजीर आणा; नाहींपेक्षां रुकार द्या. " या-प्रमाणें ओरडली. नंतर त्या धटिंगण राजदूतांकडे पाहतांच भामिनीनें पंडितरायांच्या हातांतून खंजीर हिसकावून घेतला आणि तशीच ती राजदूतांकडे धांवत गेली. राजकन्येला संतापलेली, मुक्तकेशा व सशस्त्र अशी पाहून राजदूत भयभीत होऊन थरथर कांपू लागले; अशांत भामिनीनें एकाला लत्ताप्रहार करून खालीं पाडलें, आणि त्याच्या उरावर बसून खंजीर उगारला. दुसरा राजदूत हात जोडून थरथर कांपत उभा राहिला व लागलींच घेरी येऊन खालीं पडला. राजनंदिनी खंजीर उरांत मारून प्राण घेणार असें पाहून पहिल्या राजदूतानें अडखळतः—॥" कृष्णाय वासुदेवाय हरये परमात्मने ॥ प्रणतः क्लेश-नाशाय गोविंदाय नमो नमः" ॥१॥ या प्रमाणें उद्गार काढले. हें पाहून भामिनी साशंक झाली व राजदूताच्या उरावरील वस्त्र बाजूला सारून पाहतांच तिला आंत त्याचीं *ब्रह्मचिन्हें दिसलीं. तिनें लाग-लींच पंडितरायांना सन्निध बोलावून तो प्रकार दाखविला. तसेंच दुसऱ्या

* भस्म, जानवीं वगैरे.

राजदूताचें वस्त्र बाजूला सारून पाहतांच तोहि खरा यवन नसून वेषधारी आहे असें त्यांना आढळलें. ते दोघेही ब्राह्मण चांगले सावध झाल्यानंतर त्यांना पंडितरायांनीं वेषांतराचें कारण विचारलें. " यवनीशीं होत असलेला आपला शरीरसंबंध मोडावा या हेतूनें आम्ही एका यवन शिपायाच्या मदतीनें भगीरथ प्रयत्न करून येथें प्रवेश केला; आणि आपल्याला पकडून घेऊन जावें, ब्राह्मणमंडळींत ठेवावें आणि सदुपदेश करून प्रायश्चित्त द्यावें, असा आमचा बेत होता पण तो फसला. " असें उत्तर त्या ब्राह्मणांकडून मिळाल्यावर पंडितरायांनीं त्यांना क्षमा केली व त्यांची चांगली समजूत घालून त्यांना सुरक्षित तेथून रवाना केलें. भामिनीनें आपल्यास अर्धांगी म्हणून स्वीकारण्याविषयीं बोलणें लावतांच श्रीभगवतीच्या आज्ञेप्रमाणें पंडितरायांनीं आपली मान्यता दिली।। विषादप्यमृतं ग्राह्यं अमेध्यादपि कांचनम् ।। नीचादप्युत्तमां विद्यां स्त्रीरत्नं दुष्कुलादपि ॥१॥ या उक्तीला अनुसरून जर पंडितरायांनीं ही मान्यता दिली असली तर यांत नवल तें काय ? भामिनीचें प्रथम गांधर्वविधीनें पाणिग्रहण करून नंतर हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें तिच्याशीं विवाह करावा असा पंडितरायांचा विचार होता. त्याशिवाय दिरंगखानाला भामिनी देण्याचें निश्चित झालें होतें तें सर्व पारडें फिरवावयाचें होतें. पंडितरायांनीं भामिनीला अवशिष्ट राहिलेला कार्यभाग दुसऱ्या दिवशीं उरकण्याचें दर्शविलें. भामिनी परत स्वतःच्या महालांत जाण्यास सिद्ध झाली. जातांना तिनें पंडितरायास नम्र विनंति केली ती येणेंप्रमाणें:—

॥ साकी ॥ ताताज्ञेनें विधिपूर्वक मज स्वीकारावि विवाहीं ॥ हृदयमंदिरीं नित्य वसो कीं परमदिव्यमूर्ती ही ॥ येते मी आतां ॥ राहो स्मृति याची नाथा ॥ १ ॥

१७. पंडितराय व भामिनी यांच्या गुप्त भेटीच्या ऐन वेळीं सुखनिवास महालांत ब्राह्मणांना यावनी वेषांत सोडून रंगांत भंग करविणारा वर दर्शविलेला यवन शिपाई हा दुसरा कोणी नसून रहीमच्च होय. तो स्वतःच्या बापाच्या अपमानाबद्दल सूड उगविण्यासाठीं पंडितरायास पदोपदीं तोंडघशीं पाडण्याचा आडून प्रयत्न करीतच होता. पण काळ प्रतिकूळ असल्यामुळें त्याला या कृष्णकारस्थानांत यश मिळालें नाहीं. भानुमती राणीच्या तैनातींत गुलाब नांवाची एक चहाडखोर तोंत्री दासी त्याच्या कच्छपी असल्यामुळें रहिमाला अंतःपुरांतल्या सर्व हालचाली समजत असत. दिरंगखान हा जरी साधारण विद्वान होता तरी तो भोळा व चैनी असल्याकारणानें रहिमाच्या अगदीं मुठींत एखाद्या कळसूत्री बाहुल्याप्रमाणें होता. त्यानें गुलाबच्या मदतीनें भामिनीच्या विरुद्ध राणीचे कान चांगलेच भ्रष्ट केलें होतें. राणीला बादशाहाचा मोठा धाक असल्यानें तीसुद्धां बादशाहाचा कल पाहून त्याच्या धोरणाविरुद्ध वागत नसे. पंडितरायांचें गांधर्वविधीनें पाणिग्रहण करण्यासाठीं दुसऱ्या दिवशीं भामिनी शृंगारमहालांत अमुक मार्गानें जाणार अशी बातमी गुलाबच्या द्वारें रहिमाच्या कानावर आली होती. रहिमानें राणीचें

मन दूषित करून तिच्या हुकुमानें भामिनी शृंगार महालांत जातांना तिला कपटानें एका निराळ्या महालांत कोंडलें ( नजर कैदेंत ठेविलें ). तो त्या रात्रीं गुलाबच्या द्वारें शृंगार महाल कोठें आहे त्याची व इतर सर्व मार्गांची माहिती करून घेण्यास जनानखान्यांत फिरत होता; कारण तो नवीन नोकर असल्यानें व त्याला चोर वाटा माहीत नसल्यामुळें सर्वच महाल त्याला सारखे दिसत होते, म्हणून तो साधारण भांबावून गेला होता. भामिनीची अत्यंत प्रियसखी तारा ही मोठी दक्ष, स्वामिनिष्ठ व जीवाला जीव देणारी होती. रहीम व गुलाब आपल्या भामिनी ताईच्या विरुद्ध खटपटींत असून रात्रीच्या वेळीं चोर वाटा हुडकीत फिरत आहेत असा तारेला संशय आल्यावरून ती रहिमाला फसवून तोंडघशीं पाडावें या हेतूनें सोमदेवाला मदतीला घेऊन सर्वत्र संचार करीतच होती. अशांत भामिनी संपूर्ण थाटानें पंडितराय असलेल्या शृंगार महालाकडे जात असतांना रहिमानें तिला एका निराळ्या महालांत कपटानें कोंडल्याचा तारेला सुगावा लागतांच तिनें सोमदेवाशीं गुप्त मसलत करून रहीम परत जातांना त्याला गांठून फसवावें असें ठरविलें. भामिनीला ज्या महालांत कोंडलें होतें त्या महालापासून जनानखान्याच्या बाहेर पडावयाच्या द्वारापावेतों जी वाट होती त्या वाटेच्या एका बाजुला एक तळघर होतें. त्या तळ-घराला आंतून पक्या लोखंडी जाळ्या होत्या. तळघराचें तोंड उघडून त्यावरील झांकण तारेनें त्वरेनें जाऊन काढून ठेवलें व त्यावर चांगला गालीचा पसरून तेथें एक वालशिट लावून ठेविलें होतें. रहीम परत

जातांना तारेनें त्याला मोठ्या युक्तीनें गांठलें. "आपण मार्ग चुकलांत! सरळमार्ग सोडून आड मार्गानें आपण चाललांत! मी तुम्हाला सरळ मार्ग दाखविते" वगैरे त्याच्याशीं गोड गोड बोलून त्याला तिनें एक पत्र दाखविलें आणि गालीच्यावर बसून तें लक्षपूर्वक वाचण्यास सांगितलें. रहिमाला वाट चुकल्याबद्दल संशय पडला होताच. त्याला कोणीकडून तरी लवकर बाहेर पडावयाचें होतें. तारा कसलें पत्र दाखविते तें घेऊन तो गालीच्यावरील वाळशिटाकडे मोठ्या उत्सुकतेनें गेला. गालीच्यावर पाय ठेवतांच, तळघराचें तोंड थोडें अरुंद असल्यामुळें तो त्यांत कोंबकळतच राहिला. पूर्व संकेताप्रमाणें तिनें लागलींच सोमदेवाला बोलाविलें. लवकरच सोमदेव दोन मोठे थोरले बांबू घेऊन आला आणि त्या दोघांनीं दोहींकडून रहिमाला बांबूंनीं ढोसून ढोसून आंत कोंबलें व तळघराचें द्वार बंद करून ते दोघे आनंदानें चालते झाले.

यांत ॥ शठं प्रतिशठं ब्रूयादादरं प्रति चादरम ॥ तत्र दोषो न भवति दुष्टे दुष्टं समाचरेत् ॥ १ ॥ या न्यायाला अनुसरून तारेनें आणि ॥ त्वया मे लुञ्चिताः केशा मया च शिरदण्डनम् ॥ २ ॥ या न्यायाला अनुसरून सोमदेवानें राहिमाला त्याच्या कपटाचरणाबद्दल योग्य प्रायश्चित देऊन सूड उगविला.

१८. रहिमाला तळघरांत कोंडल्याची हकीकत तारेनें ताबडतोब जाऊन रामाचार्याला कळविली; त्यांत पंडितरायांनीं भामिनीचा अंगीकार करण्यासंबंधांत मान्यता दिल्याचें कळवितांच रामाचार्याला अत्या-

नंद झाला. रामाचार्यांनीं स्वतःच्या देवभोळ्या स्त्रीला ( चंद्रिकेला ) हें सांगून तिचें मन वळविलें आणि पंडितराय—भामिनींच्या विवाहकार्याला संपूर्ण मदत करण्याचें तिच्याकडून कबूल करवून घेतलें; तेव्हांपासून पंडितराय ही एक थोर विभूति आहे अशी चंद्रिकेची खात्री झाली. रहिमाच्या वियोगामुळें गुलाब अतिशय व्याकुळ झाली होती. तिनें रामाचार्याला गांठून रहिमाविषयीं पुष्कळ चौकशी केली; परंतु या कथानकाचे सूत्रधार व पंडितरायांचे परम शुभचिंतक रामाचार्य यांनीं तिला कांहीं एक दाद लागू न देतां—" रहीम रजेवर गेला असेल, लवकरच येईल " अशा थापा देऊन तिची कशी तरी समजूत घातली. तिकडे भामिनीनें नजरकैदेंत पुष्कळ कष्ट सोसले. तिला जळीं, काष्ठीं, पाषाणीं सर्वत्र एक त्या जगन्नाथ पंडितरायांच्या मूर्तिशिवाय कांहींएक दिसत नव्हतें. तिच्या पोटांत अन्नाचा लेशहि नव्हता. सोन्यासारखें अन्नानें भरलेलें ताट तिच्यासमोर येतांच तें विषतुल्य मानून ती झुगारून देत असे. अशा तिच्या त्रिपन्नावस्थेंत चंद्रिका तेथें आली व तिनें भामिनीला मोठा धीर दिला. जातांना चंद्रिकेजवळ भामिनीनें एक पत्र लिहून दिलें व तें पंडितरायांच्या हातोहात देण्यास सांगितलें. बादशाहानें राणीला व चंद्रिकेला फरमाविलें होतें कीं:—'भामिनीला बोध करून तिचें मन वळवावें.' परंतु चंद्रिका अलीकडे रामाचार्यांच्या उपदेशाप्रमाणेंच वागत होती म्हणून भामिनीला बोध करण्याविषयीं बाह्यात्कारें राणीला दर्शवून आणि पंडितरायाबद्दल व भामिनीविषयीं अंतस्थ सहानुभूति बाळगूनच ती

भामिनीकडे गेली होती. चंद्रिका तेथून गेल्यानंतर स्वतः राणी भामिनी-कडे आली आणि तिणें अनेक रीतीनें भामिनीला बोध करून पाहिला; पण पालथ्या घड्यावर पाणी ओतल्याप्रमाणें परिणाम झाला. राणीनें तरी बादशाहाच्या केवळ आग्रहास्तवच भामिनीला अनेक रीतीनें हा बोध करून पाहिला होता. वास्तवीक पाहिलें तर तिच्या मनांत पंडित-रायाविषयीं सहानुभूतीच असणें अधिक संभवनीय होतें. नजरकैदेच्या जागेंत एक गवाक्ष होतें; त्यांतून पंडितराय व बादशाहा नेहमीं बोलत बसण्याची जागा स्पष्ट दिसत होती. हा शोध चंद्रिकेनेंच लावून ती जागा तिणें तेथून जातांना भामिनीला दाखवून ठेविली होती. त्यामुळें भामिनीला मोठें समाधान वाटलें. त्या गवाक्षांतून तिला कधीं कधीं पंडितरायांचें दर्शन होत असे. भामिनीला दुःखांत सुख काय तें येवढेंच मिळत होतें.

१९. **पंडितरायांनीं** भामिनीला विवाहासंबंधांत मान्यता दिल्यानें, रामाचार्याला अत्यानंद झाला होता. त्यानें लागलींच दिरंग-खानाला गांठलें आणि भामिनी पाहिजे किंवा तारा पाहिजे असा स्पष्ट प्रश्न त्याला केला. दिरंगखानाला तर भामिनी व तारा अशा दोघी स्त्रिया पाहिजे होत्या. रामाचार्यानें त्याच्याशीं या संबंधांत पुष्कळ उहापोह केला; शेवटीं निर्मळप्रेम व मिश्रप्रेम यांत किती अंतर आहे तें स्पष्ट व सप्रमाण दाखवून सवतीमत्सराचा दुष्परिणाम कसा भोगावा लागतो याचा ठसा त्याच्या अंतःकरणावर चांगला वठविला. " भामिनी नको, ताराच पाहिजे " असें दिरंगखानाकडून

रामाचार्यांनें कबूल करविलें. पण रहीम जरी नव्हता तरी गुलाब इनें त्याचें मन पुनः वळविलें, आणि त्याप्रमाणें दिरंगखानानें पुनः एकदां नजरकैदेच्या जागेंत रात्रीच्या शांत वेळीं जाऊन भामिनीला वश करण्याचा निश्चय केला. त्या रात्रीं राणीकडे कांहीं नैमित्तिक असल्यानें भामिनीनें भोजनानंतर राणीकडेसच राहावें असें ठरलें होतें. या गडबडींत, दिरंगखान त्या रात्रीं भामिनीकडे नजरकैदेच्या जागेंत जाणार, अशी बातमी तारेला कळली होती. तिणें सोमदेवाला मुद्दाम बोलावून ही हकीकत कळविली आणि उभयतांच्या मसलतींत दिरंगखानास तोंडघशीं पाडण्याचें ठरलें. राणीच्या तैनातीच्या माणसाकडून नजरकैदेच्या जागेची किल्ली तारेनें मोठ्या युक्तिनें मिळविली आणि भामिनीचे ऐवजीं स्वतः नजरकैदेच्या जागेंत सबंद रात्र तिणें राहण्याचें ठरविलें. त्याप्रमाणे ती तेथें गेली आणि भामिनीच्या शय्येवर झोपेचें सोंग घेऊन शालू पांघरून निजली. इकडे दिरंगखानानें विचार केला कीं— " हिंदूपतीसच वरीन ' असा भामिनीचा निश्चय असल्यानें स्वतः हिंदुरिवाजाच्या पेहेरावानेंच भामिनीकडे गेले असतां कार्यभाग खात्रीनें होईल. " त्याप्रमाणे हिंदू रिवाजाच्या संपूर्ण थाटानें नटूनच तो नजरकैदेच्या जागेंत गेला आणि तारेला भामिनीच समजून आपल्या मनाशींच तिचें स्वरूप वर्णन करूं लागला. निजलेल्या स्त्रीला मुद्दाम जागृत करून पाहतांच ती भामिनी नसून तारा आहे असें समजतांच तो आश्चर्यचकित होऊन फार खजील झाला. तारेनें त्याला तेथें पुष्कळ फजीत केलें आणि अखेर त्याच्या पासून लेखी

करार करून घेतले ते येणप्रमाणें.–( १ ) भामिनीला मी मातुश्रीचे ठिकाणीं समजेन. ( २ ) आजपासून मी हिंदूधर्माच्या रिवाजाला अनुसरून सर्व वर्तन ठेवीन.–अशा प्रकारचे लेखी करार झाल्यानंतर " मी तारेला वरण्याला कबूल आहे, भामिनी मला नको, असें बादशाहा सन्निध जाऊन आतांच जाहिर करतों, " याप्रमाणें म्हणून दिरंगखान लागलींच बादशाहाकडे जाण्यास निघाला. दिरंगखानानें भामिनीला छळूं नये, तिचा नाद त्यानें अगदीं सोडावा, आणि हिंदु धर्माचा प्रसार व्हावा, अशासाठींच तारा ही दिरंगखानास वरण्यास कबूल झाली; नाहींपेक्षां दिरंगखानानें बादशाहाचे कान भरवून पंडित-रायांच्या चालु कार्यक्रमांत अनेक विघ्नें उत्पन्न केलीं असतीं आणि त्यामुळें भामिनीच्या सार्‍या जन्माचें मातेरें झालें असतें.

२०. सुखनिवास महालांत " ॥ यवनी रमणी विपदः शमनी ॥ कमनीयतमा नवनीतसमा॥ 'उहि ऊहि' वचोऽमृतपूर्णमुखी ससुखी जगतीह यदंकगता" ॥ या श्लोकाची पंडितरायांना वारंवार आठवण होत असे. याच कारण असें होतें कीं, प्रथमारंभीं जेव्हां पंडितरायाला राजवाड्यांत यवनीनें (भामिनीनें) पाहिलें त्यावेळेपासून पंडितराय बादशाहाकडे जात असतांना " उहिपंडित ", ऊहिपंडित " असे शब्द ती कधीं कधीं प्रियसखी तारेजवळ उच्चारितांना ते ऐकत असत. या वेळीं भामिनीच्या वियोगानें त्यांना सुखनिवास महाल एखाद्या निर्जन अरण्याप्रमाणें भासत होता. " दिरंगखान हा रूपगुणसंपन्न असा मोठा श्रीमान यवन असून संस्कृत जाणणारा, सत्ताधीश, बादशाहाच्या मर्जीतला असा

सर्वांगसुंदर प्रथमवर सोडून दंडकारण्यवासी या तैलंगब्राह्मण भिजरावर मोहित होऊन हे चारुगात्री ! सुहास्यवदने राजबाळे ! तूं संकटांत मात्र पडलीस; " याप्रमाणें पंडितराय आपल्या मनाशीं म्हणत असत; कारण, तिच्या नित्य सहवासानें त्यांना स्वतःची गतपत्नी भामिनीच त्यांच्याजवळ आहे, असें त्यांना वाटत असे. त्या नजरकैदेंतून ती केव्हां सुटणार व कशी पुनः भेटणार या विवंचनेंत ते होते. अशांत चंद्रिका तेथें आली व भामिनीनें दिलेलें पत्र पंडितरायांच्या चरणाजवळ ठेवून तिणें त्यांना साष्टांग नमस्कार घातला. " आपण बादशाहाजवळ नेहमीं आनंदानें बसतां बोलतां हें येथें असलेल्या गवाक्षांतून चांगलें दिसतें, त्यामुळें नित्य मला आपलें मंगलदायक दर्शन होंत असतें; आतां याबद्दल विशेष विचार न करतां उद्याच्या बैठकींत बादशाहाला आपल्या प्रसादवाणीनें खुष् करून माझी स्पष्ट मागणी करून घ्यावी म्हणजे कार्यभाग खात्रीनें होईल. " वगैरे त्या पत्रांतील मजकूर वाचून पंडितरायाला मोठा आनंद झाला आणि अवशिष्ट राहिलेला कार्यभाग उरकून घेण्यास मोठीच उमेद आली. यासंबंधांत पंडितरायांनी चंद्रिकेचे आभार मानले आणि " अष्टपुत्रा सौभाग्यवती पुत्रवती पौत्रवती भव " असा तिच्या मस्तकावर वरदहस्त ठेवून तिला आशीर्वाद दिला. दुसरे दिवशीं बादशाहाकडून नेहमींप्रमाणें पाचारण आल्याचें सोमदेवानें कळवितांच पंडितराय श्रीभगवतीचें स्मरण करून पूर्ण तयारीनें बादशाहाकडे जाण्यास निघाले.

२१. बादशाहा अकबर हा पंडितरायांच्या दृढ सहवासानें

हिंदुधर्मांतील उदात्त व परमोच्च तत्वांस अनुसरून एक सामान्य नवीन धर्म स्थापन करण्याच्या विचारांत निमग्न झाला होता. अशानें सामाजिक ऐक्य घडून आणि त्याच्या सर्वत्र समदृष्टि ठेवण्याच्या धोरणास चांगलें उत्तेजन मिळून राजा व प्रजा यांच्यांत सदैव संतोष व सहानुभूति वाढतील असें त्यास वाटत होतें. लवंगीनें ( भामिनीनें ) कांहीं दिवसांपूर्वीं "नीमेदरूं नीमेबरूं" या उक्तीची जी समजूत बादशाहाला दिली होती त्यास अनुसरून लोकस्थिति निमी धर्माच्या आंत व निमी धर्माच्या बाहेर अशीच सर्वत्र त्याला दिसूं लागली. लवंगीची साधक बाधक दृष्टीनें राणी व चंद्रिका यांनीं चांगली समजूत घालून पाहिली; पण "हिंदू–पतीस" त्यांतही चातुर्वण्यांतील श्रेष्ठ अशा विद्वान "ब्राह्मण–पतीसच वरीन" असा तिचा दृढ निश्चय ढळणें अशक्य होतें. ही बातमी बादशाहाच्या कानावर येतांच तो अहोरात्र मोठ्या चिंतेंत पडला. राजसत्तेच्या बळानें एखाद्या विद्वान ब्राह्मणावर जुलूम करून लवंगीला (भामीनीला)त्याच्या गळ्यांत बांधावी असली नीच कल्पना अकबरासारख्या समदृष्टीच्या तत्वास अनुसरून चालणाऱ्या नरशार्दूलास सुचली असेल असें कोणासहि वाटणार नाहीं; कारण अशा जुलुमानें लोकमत एकदम खवळून जाईल अशी त्याची बालंबाल खात्रीच असली पाहिजे. म्हणून युक्तीयुक्तीनें उदाहरणें घडवून आणून लोकांचीं मनें वळविणें हेंच त्याची योजना अमलांत येण्यास बळकटी आणणार आहे असें त्यांस वाटत होतें. लवंगीचा हट्ट तरी या तत्त्वाला अनुसरून होता असेंहि त्याला हळूं हळूं भासूं लागलें.

" नीमेदरूं नीमेबरूं " यांतील तत्त्वावर पांच संस्कृत कवनें करण्यास लवंगीनें एकदा सहज दिरंगखानाला सांगितलें होतें पण तीं त्याला करतां आलीं नाहींत; अशा कांहीं अनेक कारणांमुळें लवंगीला दिरंग-खान हा पती पसंत नाहीं आणि जुलूम करून हा शरीरसंबंध घडवून आणल्यास अशी विदुषी स्त्री त्याला डोईजड होईल म्हणून त्यानेंहि लवंगीचा नाद सोडला" असें रामाचार्यानें बादशाहाच्या मनांत पूर्ण भरवून दिलें होतें; त्यामुळें बादशाहाच्या अंतःकरणांत लवंगीच्या हट्टासंबंधांत हळूं हळूं चांगलाच प्रकाश पडत चालला होता. त्याच्या मनानें असें घेतलें होतें कीं लवंगीच्या एकंदर शीलाकडे व संस्काराकडे सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें तर तिचें वर्तन महा-संस्कारी व सर्व बाबतींत गंगोदकाप्रमाणें शुद्धतेचेंच दिसून येत आहे; यासाठीं अशा विदुषी व सुसंस्कृत मुलीला " ब्राह्मणजातीच्याच पतीस वरीन " हा आग्रह उत्पन्न होणें यांत कांहीं ईश्वरी संकल्पानें भवितव्यतेचाच अंश दिसत आहे. ब्राह्मणजातीला अल्पवयापासूनच संस्कृतभाषेचा संस्कार होत असल्यानें ब्राह्मणाची वाणी जशी शुद्ध व सुसंस्कारी असते तशी ब्राह्मणेतरांची नसते. हेंहि एक कारण बाद-शाहाच्या मनांत घोळत होतें. लवंगी ही अकबर बादशाहाची फार लाडकी कन्या होती. तिचें लालनपालन करून तिला रामाचार्य व पंडित जगन्नाथराय महाकवि यांचेकडून उत्तम प्रकारचें शिक्षण देववून सुसंस्कृत व ज्ञानसंपन्न केली होती; अशी जी केवळ सात्विक गुणांची खाणच, तिचें कल्याण ज्यांत दिसेल तोच मार्ग अनुसरणें त्याला योग्य

दिसत होतें. आतां भामिनीचें ( लवंगीचें ) कन्यादान त्यावेळेच्या परिस्थितीला अनुसरून पाहिलें तर " नीमेदरूं–नीमेबरूं " म्हणजे नीमें धर्माच्या आंत व नीमें धर्माच्या बाहेर या तत्वावर व्हावयाचें होतें; परंतु अशा प्रकारचें विचित्र व अलौकिक कन्यादान स्वीकारणारा विद्वान ब्राह्मण कोण मिळणार ? हा मोठाच प्रश्न होता. कदाचित् लवंगी ( भामिनी ) च्या मनांत पंडितराय हाच विद्वान ब्राह्मण भरला असेल असेंहि त्याला एकदां वाटलें. परंतु हें घडणें जरी त्याला अशक्य दिसलें तरी पंडितरायाकडून या कोड्याचा उलगडा करून घेतला तर ते यासंबंधांत कांहीं मार्ग सुचवितील असें त्याला निश्चयात्मक वाटल्यानें त्यानें असें ठरविलें कीं पंडितराय नित्यनेमाप्रमाणें आल्यावर त्यांना " निमे दरूं निमे बरूं " या तत्वावर पांच धार्मिक कवनें करण्यास सांगावें, म्हणजे पंडितरायांची शीघ्र कवित्वशक्ति अनायासें दृष्टोत्पत्तीला आल्यानें मोठा संतोष होईल आणि " जो कोणी ब्राह्मण ' निमे दरूं निमे बरूं ' या तत्वावर पांच कवनें तावडतोब करून दाखवील त्यांसच लवंगी देण्यांत येईल " असा एक पण प्रसिद्ध करून लवंगीचा विवाह करणें उचित दिसल्यास त्या कामीं त्या कवनांचा मोठा उपयोग होईल.

२२. पंडितजगन्नाथराय नित्यनेमाप्रमाणें बादशाहाकडे येऊन पोहोंचतांच बादशाहा एखाद्या गूढ विचारांत निमग्न असल्याचें त्यांनीं पाहिलें. त्याचप्रमाणें त्यांनीं सहज वर पाहिलें तों भामिनी नजरकैदेच्या जागेंत गवाक्षांतून आपल्याकडे टक लावून पाहात आहे असें त्यांना

दिसलें. “ आज कोणत्या विचारांत निमग्न आहांत ” असा प्रश्न पंडितरायांनीं बादशाहाला केला तेव्हां बादशाहा म्हणाले:— “ ॥ अज़् हैबते शाहेजहां ॥ लरज़द् जमीनो आसमां ॥ अंगुस्ते हैरत दरदहां ॥ नीमे दरूं नीमे बरूं ॥ ही एक उक्ती आहे. या उक्तीच्या तत्वास अनुसरून जर कांहीं दान करणें असेल तर त्याची फलश्रुति काय ? तसेंच या उक्तीचें इतर रीतीनें कांहीं महत्त्व असल्यास त्याचें हिंदुधर्माच्या तत्वाला अनुसरून पांच कवनांच्या रूपानें आतांच वर्णन करा; त्यांत प्रत्येक कवनाच्या शेवटीं ‘ नीमे दरूं नीमे बरूं ’ हीं पदें आलीं पाहिजेत; आणि ( जवळ असलेल्या वाद्याचा सूर धरून ) ॥ मफायलुन् मफायलुन् मफायलुन् मफायलुन् ॥ ही “बहैरेरमल् मुसंमन् ” एक चाल ( वृत्त ) आहे, या चालवर तीं पांच कवनें असावीत. ” याप्रमाणें बोलून अकबर बादशाहा वाद्याचा सूर लावण्यांत गुंतले. हें पाहून पंडितरायाला मोठा विस्मय वाटून ते मनांत म्हणाले:—“संस्कृत कवित्वाची इतकी अवघड परीक्षा कोणत्याहि राजानें घेतली नाहीं. यावरून अकबर बादशाहा साहित्याचा मोठा भोक्ता आहे असें म्हणतात तें अगदीं खरं आहे. ” त्यांनीं श्रीभगवतीचें स्मरण करून बादशाहाला लागलींच उत्तर दिलें तें येणेंप्रमाणें:—

**पंडित**:—( प्रसन्न ) हुजूरच्या फरमानाप्रमाणें कवनपंचक तयार झालें. **महाराजांनीं** जी चाल ( वृत्त ) आतां सुचविली ती संस्कृतांत **पंचचामर** या वृत्ताच्या चालीवर म्हणतां येते. ते वृत्त असें:— ॥ प्रमाणिका पदद्वयं वदंति पंचचामरम् ॥ या क्षुल्लक व एकच उदाह-

रणा वरून काव्याच्या दृष्टीनेंसुद्धां हिंदु व मुसलमान यांचें किती सख्य आहे हें उघड दिसून येतें.

याप्रमाणें सांगून पंडितरायांनीं बादशाहाच्या सूचनेप्रमाणें कवन-पंचक म्हणून दाखविलें ( पहा परिशिष्ठ अ ). ती श्रवणरमणीय पांच कवनें ऐकून बादशाहाला अत्यंत संतोष झाला. राष्ट्राची उन्नति करण्या-साठीं हिंदुधर्मांतील तत्वांस अनुसरून एक सर्व सामान्य धर्म स्थापन करणें व त्यायोगें सामाजिक ऐक्य घडवून राजा व प्रजा यांचें अन्योन्य प्रेम वाढविणें या कामीं पंडितराय सदैव उत्तेजन देत होते हें पाहून बादशाहानें त्यांचे आभार मानिले. उन्हाळ्याचे दिवस असल्या-मुळें अकस्मात बादशाहाला तृषा लागली. बादशाहाचा नित्य गंगास्नान व गंगापान करण्याचा क्रम इतिहास प्रसिद्ध आहे, त्यास अनुसरून लवंगीने सुवर्णाची झारी गंगोदकानें भरून आणावी अशी आज्ञा परि-चारिकेस झाली. नजरकैदेच्या जागेंतील गवाक्षांतून हा प्रकार लवंगीनें पाहिला आणि पंडितराय व बादशाहा यांचा मनोरंजक संवादहि ऐकला; त्यामुळें ती तयार होऊन बसलीच होती. गंगोदकानें भरलेली सुव-र्णाची झारी मस्तकावर धारण केलेली, कांहीं हिंदू व कांहीं यावनी अशा पोषाकाची, केशरी जरीकांठीं पातळ नेसलेली, नानालंकारांनीं भूषित अशी सर्वांग सुंदर सलज्ज षोडषवर्षा लवंगी ( भामिनी ) गजग-तीनें प्रवेश करून बादशाहा सन्निध येऊन उभी राहिली. तिची चोर-दृष्टि पंडितरायाकडे होती. गंगोदकानें मोठा प्याला भरून बादशाहापुढें ठेवून ती परत गवाक्षाकडे जाऊं लागली, अशांत बादशाहानें लागलींच

पंडितरायांना कळविलें कीं—" या माझ्या कन्येला संस्कृत विषयांत आपण ज्ञानसंपन्न केलेली पाहून मला मोठा आनंद झाला. तिचा आतां लवकरच विवाह व्हावयाचा आहे. त्यासंबंधांत मला एक मोठेंच गूढ पडलें आहे, त्याचा उलगडा आतांच आपल्याकडून करून घ्यावयाचा आहे. परंतु त्यापूर्वी, तिच्या सांप्रतच्या स्थितीच्या साग्र-वर्णनाचा एक श्लोक ऐकण्याची माझी इच्छा आहे" बादशाहाची आज्ञा होतांच राजकन्येच्या लावण्याला व गुणाला उद्देशून पंडितरायांनीं समयोचित श्लोक म्हटला तो येणेंप्रमाणें:—॥ इयं सुस्तनी मस्तकन्यस्तकुंभा ॥ कुसुंभारुणं चारुचैलं दधाना ( वसाना ) ॥ समस्तस्य लोकस्य चेतःप्रवृत्तिम् ॥ गृहीत्वा घटे स्थाप्य यातीव भाति ॥१॥ हा श्लोक व पूर्वीचें कवनपंचक ऐकून बादशाहा अत्यंत सुप्रसन्न झाले व म्हणाले:—

अकबरः—पंडितराज ! वाहवा ! आपलें शीघ्र कवित्व व प्रसाद-युक्त वाक्चातुर्य मला इतकें प्रिय झालें आहे कीं आपणास याच वेळीं उत्तमोत्तम देणगी द्यावी अशी मला उत्कटेच्छा झाली आहे; परंतु काय करूं ? आपण कविकुलमुकुटमणी प्रत्यक्ष सरस्वतीस्वरूपच आज माझ्यासमोर आहांत. आपण या माझ्या राष्ट्ररूपी विराटपुरुषाचें जीवनच आहांत; याचा विचार केला म्हणजे मी जरी सार्वभौम बादशाहा आहे तरी आपल्या अलौकिक पांडित्यास साजेल अशी मी आपल्याला कोणती देणगी द्यावी ? याचा मला मोठा विचार पडला आहे. या-साठीं मीच होऊन आपणास विनंतीपूर्वक सुप्रसन्नचित्तानें सांगतो कीं—

आपली जी इच्छा असेल ती मला कळवा ! आतांच कळवा ! मी ती मोठ्या संतोषानें पूर्ण करीन, अशी मला मोठी उमेद आहे.

( " माझी मागणी याच संधीस करून घ्यावी " अशी खूण भामिनी (लवंगी) गवाक्षाकडे जातानां करते व पंडित ती ओळखतात )

**पंडितः**—महाराजाधिराज ! आपण प्रथम हें गंगोदक प्राशन करा, कारण, आपण तृषित आहांत.

**अकबरः**—पंडितराज ! आपण प्रथम हें गंगोदक प्राशन करा. हें गंगोदक आहे, अर्थात याला बाध नाहीं.

**पंडितः**—गंगोदकाला बाध नाहींच. कारण, सूर्यवंशी बाहुराज्याचा पुत्र सगर याच्या साठ हजार पुत्रांचा ज्या श्रीगंगेनें उद्धार केला त्या मातुश्री श्रीगंगेच्या पवित्रोदकाचा महिमा वर्णन करावा तेवढा थोडाच. अशी जी जन्हुराजाची नंदिनी व शंतनुराजाची रमणी जान्हवी श्रीगंगामाउली, तिच्या पुण्योदकाचें प्राशन करण्यास बाध आहे असें कोण म्हणेल ? महाराजाधिराज ! मात्र, सांप्रत, पाण्याच्या ऐहिक तृषेनें मी व्याकुळ झालो नाहीं.

**अकबरः**—तर मग आपण कोणत्या तृषेनें व्याकुळ झाला आहांत तें मोकळ्या मनानें सांगा.

**पंडितः**—मला जर अभय वचन मिळेल तर मी माझी तृषा महाराजांच्या चरणाजवळ आतांच सादर करतो.

**अकबरः**—ओहो, पंडितराज ! हें काय ? आपल्या

अन्योन्य या अशा निकट ऋणानुबंधांत आपणांस माझ्या अभयवचनाची अपेक्षा असावी, हें खरोखर महदाश्चर्य होय ! आपण होऊन मजजवळ कोणतीच मागणी केली नाहीं. मी होऊनच पाहिजे तें मागून घ्या अशी विनंति आपणांस केली आहे, याचें स्मरण आहे ना ? असो, हें घ्या अभयवचन ! कोणताहि संकोच धरूं नका वाटेल तें मागा. आपल्यापेक्षां मला काय अधिक आहे ? आतां मात्र या वचनाची पूर्तता मजकडून झाल्यावाचून हें गंगोदक मी प्राशन करणार नाहीं.

पंडितः—हुजूर ! अभयवचन कां घेतलं याचं कारण व महत्व, माझी मागणी हुजुरांहि श्रवण करतांच ध्यानीं येईल. हुजूरच्या चरणकमलासन्निध माझी मागणी अशी आहे कीं:—॥ न याचे गजालिं न वा वाजिराजिम् ॥ न वित्तेषु चित्तं मदीयं कदाचित् ॥ इयं सुस्तनी मस्तकन्यकुंभा ॥ लवंगी कुरंगी दृगंगी करोतु ॥ २ ॥ महाराजाधिराज ! आपल्या ह्या कन्यकेच्या पाणिग्रहणाच्या तृषेनेंच मी व्याकुळ झालो आहे; याकरितां भार्यात्वासाठीं तिला आपण मला अर्पण कराल तेव्हांच माझें तृषाशमन होईल.

अकबरः—ओहोहोहो ! पंडितराज ! ही आपली विचित्र पण अनुकुळ मागणी ऐकून या वेळीं माझं हृदय आनंद व आश्चर्य यांनीं कसें अगदीं भरून गेलें आहे; व त्यामुळें मी स्वप्नांत आहे किंवा जागृतींत आहे याचीहि मला भ्रान्ति पडल्यासारखें वाटत आहे. हे प्रभो, तुझी लीला अगाध आहे ! !

पंडितः—महाराजांना येवढा आनंद कशामुळें झाला, व येवढें आश्चर्य कशाबद्दल वाटलें, तें जाणण्याची माझी इच्छा आहे.

अकबरः—" ब्राह्मणवर्णाच्या पतीसच वरीन " असाच आग्रह कन्येनें धरल्यामुळें मी भयंकर धर्मसंकटांत पडलों होतों, त्यांतून आज आपण मला मुक्त करून माझ्या सर्वसामान्य-धर्माच्या प्रसाराला उत्तेजन दिलें, त्यामुळें मला अत्यानंद झाला. त्याचप्रमाणें सूर्यासारखें हें आपलें अलौकिक ब्रह्मतेज ! अशा दिव्य तेजोबळानें स्वर्गांतल्या रंभाउर्वश्यादि अप्सरासुद्धां या भूमण्डलावर आपण आणूं शकाल—असें मोठें सामर्थ्य आपल्या अंगीं वास्तव्य करीत असून हिंदुधर्माचीं—त्यांत ब्राह्मणवर्णाचीं तीव्र बंधनें झुगारून देऊन ही माझी प्रियकन्या लवंगी ! अहो ! ही धडधडीत यवनी ! हिचीच मागणी करण्यांत आपण अधिक काय पाहिलें, याचें मला महदाश्चर्य वाटत आहे.

पंडितः—" वर्णानां ब्राह्मणो गुरुः " या उक्तीला अनुसरूनच राजकन्येचा ब्राह्मणवर्णाच्या पतीलाच वरण्याविषयीं आग्रह असला पाहिजे. महाराजाधिराज ! हिला यवनी कोण म्हणेल ? ही सुसंस्कृत अशी आर्य असून, अंतर्बाह्य शुद्धवर्णाची मूर्तीच आहे. गुणकर्माच्या दृष्टीनें पाहिलें असतां, बहुत वर्षांपूर्वीं दिवंगत झालेल्या माझ्या भामिनी-प्रमाणेंच ही श्रेष्ठ आहे; हें अनुभवसिद्ध आहे; आणि अंतःकाळीं ती माझ्या संबंधांत वासनावश झाल्यानें, मला वरण्यासाठीं अशा पुण्यक्षेत्रांत पुण्यश्लोक व अवतारी सार्वभौम बादशाहाच्या शुद्ध बीजापासून

पुनः अवतरली आहे, असें माझा अंतरात्मा मला सांगत आहे; व त्यामुळेंच हिचा अंगीकार करण्याविषयीं माझ्या शुद्धांतःकरणाची प्रवृत्ति झाली आहे. हें मी सत्य सांगतो. यामुळें हिंदूधर्मांतील उदात्त तत्त्वांना अनुसरून स्थापन होणाऱ्या सर्व सामान्य धर्माच्या प्रसाराला मोठी बळकटी येणार आहे, हें निर्विवाद होय. स्वर्गाहून रंभादि अप्सरा या भूमंडळावर आणण्यासाठीं स्वतःचें अलौकिक ब्रह्मतेज खर्ची घालणारा हा जगन्नाथ पंडित नव्हे! आपली कन्या ही "अरं भासमाना अरं-भासमाना" खरोखरच अनुपमेय आहे. ब्राह्मणवर्णाच्या तीव्र बंधनांविषयीं सुद्धां मी पूर्ण विचार केला आहे. जो कोणी माझ्या योग्यतेचा यासंबंधांत मला विचारणारा माझ्यासमोर येईल, त्याचें समाधान मी उत्तमरीतीनें करीन.

हें भाषण ऐकून अकबर बादशाहाला अत्यंत संतोष होऊन तो पंडितरायाची मागणी स्तुत्य व सर्वमान्य आहे असें म्हणून मंजूर करणार, अशांत भानुमती राणीनें येऊन "दिरंगखानाशीं वचनबद्ध झाल्यानें तो दोष माथ्यावर येणार म्हणून त्याचा बंदोबस्त केल्यावांचून पंडितरायाची मागणी मंजूर करतां येत नाहीं" असें स्पष्ट कळविलें. त्यावेळीं रामाचार्यानें येऊन "दिरंगखानावर भामिनीची प्रीति नाहीं म्हणून तोहि तिच्याशीं जुलमानें विवाह करण्यास कबूल नाहीं; त्याला तारा हीच वधू पसंत असून तो तिच्याशीं विवाह करण्यास कबूल आहे." असें उघड कळविलें. यासंबंधांत बादशाहानें दिरंगखानास समक्ष बोलावून आणून खात्री करून घेतली, तरीपण भामि-

नीचा पंडितरायाशीं होत असलेला शरीरसंबंध त्याला अंतर्धामीं पसंत नव्हता. भानुमतीराणीने संमति देण्यापूर्वीं पंडितरायाशीं भाषण केलें ते येणें प्रमाणें:—

भानुमतीः—पंडितराया! आमच्या मुलीचा अंगीकार करण्याविषयीं या पुण्यश्लोक नृपाळाजवळ स्पष्ट मागणी करण्याचें आपण जें धारिष्ट केलेंत, त्यामुळें आम्ही उभयतां आपले आजन्म ऋणीच राहू. आपणास श्रीलक्ष्मीनारायणस्वरूप समजून विनंति करते, त्याचा रोष नसावा. आपण आमच्या मुलीशीं शरीरसंबंध करूं इच्छितां खरे! पण सांभाळा हो! पुरता विचार करा. यामुळें तुमचेच लोक तुमच्याविरुद्ध उठतील. तुम्हांस बहिष्कार घालून अपंक्त ठेवतील. इतकेंच नव्हें; तुमचेवर नानातऱ्हेचीं कुभांडें रचून तुम्हांस दुःखसागरांत लोटतील. तुमचा अनेक प्रकारें छळ करतील. अशा संकटकाळीं अथवा मुलीचें तारुण्यमौक्तिक नष्ट झाल्यावर माझी लाडकी एकुलती एक पोर! तिचा त्याग मात्र करूं नका! तिचं सदैव उत्तम संगोपन करा! माझे दादा राजे भगवानदास यांचा आपल्याशीं कसा ऋणानुबंध आहे आणि महाराजांचा आपल्यावर केवढा विश्वास आहे, याचा विसर पडूं देऊं नका! ही माझी नम्र विनंति जर आपल्याला मान्य असेल तर पंडितराज! आपली मागणी आतांच मंजूर करण्याविषयीं अंतःकरणपूर्वक माझी पूर्ण संमति आहे.

पंडितः—मातुश्री! शास्त्रकारांनीं ज्या पंचमाता ठरवून ठेवल्या

गोरजमुहूर्तावर रामाचार्यांच्या विचारें निश्चित झाला. त्याचवेळेस दिरंगखान व तारा यांचाहि विवाह झाला पाहिजे असें ठरविण्यांत आलें होतें.

२३. अंतर्यामीं खवळलेल्या रहिमाला युक्तीप्रयुक्तीनें शोध लावून गुलाब इनें त्या तळघरांतून बाहेर काढिलें दिरंगखानाला व आणखी एखाद्या चांगल्या ब्राम्हणाला हाताशीं धरून पंडितराय व भामिनी यांचा अतिछळ करण्याचा त्याचा निश्चय होताच. "काळ अनुकूळ आला म्हणजे कुलटासुद्धां गरती स्त्रियांना अजिंक्य होतात, परंतु त्यांच्या पापाचा घडा भरून प्रतिकुळ काळ येतांच ज्याप्रमाणें त्यांना गळे फोडफोडून रडत बसावें लागतें, त्याप्रमाणें या भोंदू पंडिताची स्थिति होणार आहे" असें रहीम हा नेहमीं मनांत म्हणत असे. पंडितरायाला काळ अनुकूळ होता व रहिमाला काळ प्रतिकूळ होता; म्हणून त्याला त्यावेळीं बकवृत्ति धारण करून बसणें भाग पडलें. तळघरांतील चोरवाट गांवाबाहेर बऱ्याच अंतरावर बाहेर पडत असल्यामुळें, रहीम हा बाहेर पडून विचार करीत गांवाकडे जात होता. अशांत गुलाब धांवत येतांनां त्याला समोरून दिसली. उभयतांच्या भेटींत गुलाबनें त्याच दिवशीं सायंकाळीं गोरज मुहूर्तावर दोन मिश्रविवाह रामाचार्यांच्या विद्यमानें होणार असल्याबद्दल साद्यंत हकीकत रहिमाला कळविली. त्यांत कांहीं विघ्न करतां येईल किंवा कसें अशाविषयीं उभयतांची मसलत झाली. पुढें जवळच चंडिकेश्वर महादेवाच्या देवळांत कांहीं ब्राह्मण एकादसनी करीत असल्याचें त्यांना ऐकूं आलें. ब्राह्मणांना चिडवून पंडितांच्या लग्नांत कांहीं विघ्न करतां

येईल तर पाहावें असें रहीम व गुलाब या दुकलीनें ठरविलें. गुलाब एकीकडे उभी राहिली व रहीम देवळाच्या पायऱ्या एकदम चढून वर गेला. कांहीं ब्राह्मण आपआपसांत पंडितांच्या विवाहासंबंधांत चर्चा करीत होते. म्हणजे कित्येक "पंडितांच्या विवाहांत मिसळून भोजन करूं, दक्षिणा लाटूं व पूर्ण सहानुभूति दाखवूं" असं म्हणत होते आणि कित्येक 'हा विवाह धर्मविरुद्ध आहे' असें म्हणून त्यांची निंदा करीत होते. पायऱ्या चढतांना रहिमानें त्यांचा आपसांतला वादविवाद ऐकला आणि ब्राह्मणाब्राह्मणांत मतभेद व फूट पाहून तो त्यांच्या पुढें जाऊन उभा राहिला. केस फिंदारलेले, मळकट व फाटके कपडे अंगावर असलेलें असें या धिप्पाड मुसलमानाचें विक्राळरूप पाहून हा मुसलमान आतां देवाच्या गाभाऱ्यांतसुद्धां शिरण्यास कमी करणार नाहीं असा त्या ब्राह्मणांना धाक वाटून "यवन देवळांत घुसला, देऊळ विटाळलं! सर्व बाहेर या हो!!" असा मोठा आक्रोश करून सर्व ब्राह्मणांनीं एकादसनी बंद केली व एकदम बाहेर आले. त्यानंतर रहिमाचा त्यांच्याशीं मोठा कडाक्याचा धर्मविषयक वादविवाद झाला त्यांतील संक्षिप्त मुद्दे येणेंप्रमाणें:—

रहीमः—( सरोष मोठ्या ऐटींत ) कोण हो तुम्ही इथें? कसला बेत चालला आहे? चला, चालते व्हा आपआपल्या घरीं. हल्लीं राजवाड्यांत मोठ्या कडाक्याची धामधुम चालली असून राजगुरु रामाचार्य यांचा चालू मिश्रविवाहाविषयीं असा हुकूम सुटला आहे कीं— सार्वजनीक देवळांत एकापेक्षां अधिक ब्राह्मण जमून राजकीय विषयांचा

आहेत त्यांपैकींच आपण माझ्या मातुश्री आहांत ! मी जी मागणी केली आहे ती जर कदाचित् आपण नामंजूर केलीत, तर अखेर मी वासनावश होऊन मला पुनर्जन्म घ्यावा लागेल. माझा अंतिम विचार हिच्याशीं विवाह करून, विवाहाच्या मूळ रहस्याला अनुसरून हिच्या सहायानें यज्ञादि कर्मानुष्ठानसिद्धि प्राप्त करून घ्यावी आणि अशा क्रमानें उत्तम प्रकारचें ज्ञान संपादन करून अखेर हिच्यासहित सायुज्य-मुक्ति मिळवावी असा आहे. या मुलीचा अंगीकार केल्यावर कोण-त्याहि प्रसंगीं तिचा मी त्याग करीन हें स्वप्नींहि दिसणार नाहीं. या माझ्या वाणीच्या बळावर मी प्रसंगविशेषीं आकाशपाताळहि एक करून टाकीन. आपणास यासंबंधांत तिळमात्र काळजी नसावी.

यामप्रमाणें भाषणें झाल्यावर अकबर बादशाहानें, आपली अर्धांगी राणी भानुमती हिच्या संमतीनें रामाचार्यासमक्ष पंडितरायांचें अलौकिक पांडित्य व त्यांचा हेतु स्तुत्य जाणून स्वसंतोषानें अंतःकरणपूर्वक त्यांची मागणी मंजूर केली. “ आपण तृषित आहांत तेव्हां आतां प्रथम हें गंगोदक प्राशन करावें. ” अशी विनंति पंडितरायांनीं बादशाहाला केली. उदकप्राशन केल्यानंतर हा वचनसुपारीचाच समारंभ झाला असें मानून मुहूर्त ठरविण्याबद्दल रामाचार्यास बादशाहाची सूचना झाली. अकबर बादशाहा व भानुमती राणी यांचा विवाह सप्तपदीच्या विधीनें झाल्याचें इतिहास प्रसिद्ध आहे. त्यास अनुसरून पंडितराय व भामिनी यांचा विवाह सप्तपदीच्या विधीनें दुसऱ्याच दिवशीं म्हणजे माघ शु. १९ च्या शुभमुहूर्तावर सकाळीं वाङ्निश्चय आणि सायंकाळीं

खल करीत असलेले दिसले तर त्यांना मनाई करून हाकून लावावें.' चला निघा इथून ! आणखी कोण कोण....( आंत जाऊं लागतो )

**ब्राह्मणाचा पुढारी दीक्षित अय्या:**—( त्यास अडवून ) अरे, पण, हां हां ! हें हिंदूचं देऊळ आहे. चला व्हा खालीं. तुम्ही मुसलमान ! आम्ही ब्राह्मण ! असा अविचार करूं नका. सनातन धर्मास दडपून रसातळाला न्यावा आणि पवित्र हिंदूंचीं मंदिरें विटाळावींत अशी कांहीं राजाज्ञा नाहीं. इतकेंहि असून जर तुम्ही असा जुलूम करूं लागलांत तर आम्हीं हे ब्राह्मणभट ! असा पंचा नेसलेले दिसतों खरे ! पण तशीच वेळ आल्यास हे हातांतले दर्भ फेकून देऊन शस्त्रास्त्रें धरूं ! ( दर्भ फेकून दंड ठोकतो, काचा मारतो. ) आम्हीं कांहीं कमी आहोत कीं काय ? सिंह बालकें आहोत, सिंह बालकें ! ! समजलांत ! असे रागावून पाहतां कुणाकडे ? मुकाट्यानं होतां कीं नाहीं खालीं ?

**रहीम:**—आग लावा तुमच्या त्या सनातन धर्माला आणि पोकळ ब्राह्मण्याला; तुमच्या त्या सनातन धर्माची आणि पोकळ ब्राह्मण्याची तुमचेच लोक आज सायंकाळीं माघ शु. १५ ची फालगून शु. १५ करणार आहेत. म्हणजे गोरज मुहूर्तावर होळी पेटवून त्यांत पूर्णाहुती देणार आहेत; आणि सर्व राजवाड्यावर—सर्व दिल्ली शहरावर किंबहुना सर्व त्रैलोक्यांत आपल्या वाढलेल्या ज्ञानरवीचा प्रकाश पाडणार आहेत. तुमचें स्वतःवर स्वामित्व नाहीं. तुमचा एकोपा तर

मी केव्हांपासून पाहतच आहे, अर्धे भट दक्षिणा लाटण्याच्या लोभानं लग्नांत मिसळण्यास तयार झाले आणि तुम्हींच काय ते इथें कडु भोपळे राहिलांत. कशाला राहिलांत ? तुम्हीही जा दक्षिणेच्या मोहोरा लाटायला ? अंगांत नाहीं त्राण ! तोंडावर तर ब्रह्मतेजाचा लेश दिसत नाहीं; त्या ऐवजीं सर्वत्र प्रेतकळा मात्र पसरलेली दिसते; आणि ऐट केवढी ? 'आम्ही दर्भ टाकून शस्त्रास्त्रें धरूं' ! अहो ! मी जर खरोखर ब्राह्मण असतो, तर फक्त गायत्री मंत्रानं दर्भ मंत्रून फेकले असते आणि राजवाडाच काय, सबंद दिल्ली शहर पेटवून दिलं असतं पेटवून ! समजलांत ? असा धर्मछळ कधींहि सहन केला नसता. षंढानो ! घरांत भागूबाईसारखे बांगड्याभरून बसा बांगड्या ! धिःकार असो तुम्हाला आणि तुमच्या त्या पोकळ ब्राह्मण्याला. हिंदुधर्माचं जर प्राचीन वैभव स्मरत असेल आणि अंगांत जर खऱ्या जवानमर्द ब्राह्मणाच्या ब्रह्मतेजाचं वीर्य असेल तर उठा, सर्व जण एकत्र व्हा, जा आजच सायंकाळीं राजवाड्यांत ! आणि मागा दाद त्या पुण्यश्लोक अकबर बादशाहाजवळ ! म्हणजे तो मिश्रविवाह एकदम बंद करील.

रहिमाचें अशा प्रकारचें बोधप्रद आणि जोरदार भाषण ऐकून जवळच्या सर्व ब्रह्मवृंदांना स्फुरण चढलें. ते सर्व राजवाड्यांत सायंकाळीं जाण्यास सिद्ध झाले, अशांत कित्येकांनीं शंका काढली कीं—" राजगुरू रामाचार्य यांनीं कांहीं सांकेतिक अक्षरें कित्येक ब्राह्मणांना देऊन ठेविलीं आहेत. तींच अक्षरें जे जे ब्राह्मण द्वारपाळाला सांगतील त्यांनाच फक्त

राजवाड्यांतील लग्नमंडपांत सोडण्यांत येतें; म्हणून तेवढीं सांकेतिक अक्षरें जर मिळूं शकतील तर फार उत्तम होईल." लपलेल्या गुलाबनें ही हकीकत ऐकतांच रहिमास एक चिठ्ठी काढून दिली आणि ती सांकेतिक अक्षरांची चिठ्ठी त्यानें त्या ब्राह्मणांना दिली. त्या चिठ्ठीवर "नीमेदरूं नीमेबरूं " असें लिहिलें होतें सांकेतिक अक्षरें मिळतांच ब्राह्मणांना आनंद झाला. त्यापैकीं कित्येकांनीं दक्षिणेच्या लोभानें व कित्येकांनीं मिश्रविवाहाविरुद्ध ओरड करण्यासाठीं लग्नमंडपांत घुसण्याचा निश्चय केला. रहीम व गुलाब दुसऱ्या वाटेनें निघून गेले.

२४. सायंकाळीं राजवाड्यांतील लग्नमंडपाच्या द्वारांत द्वारपाल " नीमेदरूं नीमेबरूं " हीं सांकेतिक अक्षरें जे जे सांगतील त्यांना त्यांनाच आंत सोडीत होता. अशा रीतीनें लग्नमंडपांत बरीच गर्दी झाली. पंडितराय व भामिनी त्याचप्रमाणें दिरंगखान व तारा या दोन्ही जोडप्याच्या विवाहास उद्देशून मंगलाष्टकें म्हणण्यास प्रारंभ झाला. मंगलाष्टकें संपतांच एकदम शेकडो ब्राह्मण लग्नमंडपांत बळेंच घुसले आणि " अधर्म, अधर्म, सनातन धर्माचें रक्षण करा. " अशी चहूंकडून एकच ओरड करूं लागले. कोणी पंडितास व कोणी भामिनीस ओढून आणण्यास धांवूं लागले. कित्येक अंतःपट्टवस्त्र ओढूं लागले. अशांत रामाचार्य स्वतःच्या अनुयायांसह कित्येक ब्राह्मणांना हाकून काढूं लागले. बादशाहाला ही बातमी कळतांच तो नरशार्दूल त्या गर्दीतून पुढें आला. त्याला पाहतांच पळापळ सुरू होऊन एक दोन

ब्राह्मण पुढाऱ्याशिवाय सर्व ब्राह्मण निघून गेले आणि कित्येक स्वस्थ उभे राहिले. त्यांचें व बादशाहाचें जें संभाषण झालें ते येणेंप्रमाणें:—

अकबर:—शांत व्हा! शांत व्हा! ब्राह्मणांनो! थांबा, थांबा!! आपलं काय म्हणणं आहे, तें स्वस्थपणें सांगा. भीऊं नका.

दीक्षित अय्या:—हे पुण्यश्लोक नृपाळा! तुझ्या ह्या समदृष्टीच्या राज्यांत हा केवढा अधर्म! हा मिश्रविवाह सशास्त्र नाहीं. अरेरे! आमच्यांतला सूर्याप्रमाणें तेजस्वी ब्राह्मण पंडितश्रेष्ठ जगन्नाथराय महाकवि यास भ्रष्ट करून तुझ्या या समदृष्टीच्या न्यायमंदिरावर अपकीर्तीचा कृष्णध्वज कां उभारतोस? राजा! तुला या तुझ्या आतां अखेरच्या कारकीर्दींत हें कृष्णकर्म कोठून आठवलं? हे राजा! प्रजापालन हें तुझं ब्रीद! तूं प्रजेचा मायबाप! असल्या अधर्मास प्रवृत्त होऊन प्रजेचे तळतळाट कां व्यर्थ घेतोस? राजा या नात्यानं तुझे अधिकार मर्यादित आहेत. यासाठीं हा मिश्रविवाह बंद कर. हेंच आमचं करद्वय जोडून मागणं आहे.

अकबर:—हे ब्रह्मवृंद हो! जगन्नाथपंडिताचा माझ्या प्रियकन्येशीं जो हा विवाह होत आहे तो आतां बंद कसा होऊं शकेल? ब्रह्मसूत्राप्रमाणें जें व्हावयाचें तें मिथ्या होत नाहीं. कोणावर जुलूम करून हा विवाह मी अमलांत आणला नाहीं. उभयतांच्या स्वसंतोषानं व पूर्ण संमतीनं तो झाला आहे. यांत माझा दोष काय? राजा या नात्यानं मी यांत काय करूं शकणार? मला सर्व जातीचे व

सर्व वर्णांचे लोक सारखे आहेत. विचार स्वातंत्र्य हें व्यक्तिमात्रास असलेंच पाहिजे. पंडितराज कांहीं अज्ञान नाहींत; त्याचप्रमाणें माझी कन्याहि अज्ञान नाहीं. पंडितरायास वरण्यास त्यांच्या जातीच्या नववधू या भूमंडळावर कांहीं कमी नव्हत्या. फार तर काय ! ते आपल्या वाणीच्या साम्राज्यांत अलौकिक सत्तेच्या बळानें स्वर्गांतल्या देवांगनासुद्धां खालीं आणूं शकतील; परंतु तें सर्व सोडून या यवनी-लाच वरण्यांत जो कांहीं त्यांनीं दुरवर विचार केला असेल, तो केवळ क्षणिक कामविकाराला भुलून केला असेल, असें मला व कोणालाहि वाटणार नाहीं. त्यांचा हा विचार मोठा उदात्त व सत्परिणामीच असला पाहिजे. यांत स्वार्थत्याग, साहसप्रियता, दृढ निश्चय व खऱ्या मार्गांचें अवलंबन, हें पंडितरायांचें सद्गुणचतुष्टय व्यक्त होत आहे; असें माझें खास मत आहे. धर्मशास्त्राच्या बाबतींत तुम्ही सर्व ब्रह्मवृंदांनीं एक मोठी जाहीरसभा भरवून त्या बहुजनसमाजांत या वधूवरांना प्रायश्चित्त देऊन पावन करून घेण्याला मार्ग आहे किंवा कसें ? या मुद्याचा निर्णय करवावा. आपली सर्वांची इच्छा असल्यास त्या समा-जांत मी स्वतः हाजर राहून माझें या संबंधांत स्पष्ट मत जाहीर करीन.

दीक्षितः—महाराजाधिराज ! पंडितरायांच्या सद्गुणांबद्दल आणि त्यांच्या श्रेष्ठ मनोवृत्तीबद्दल आपण जें जें प्रतिपादन केलें, तें सर्व यथार्थ आहे; परंतु त्यांना पावनकरून घेण्यासंबंधांत आमचे गुरू विद्वन्मणि वे. शा. सं. हरदीक्षितराज हे श्रीक्षेत्र काशीहून लवकरच

येथें येणार आहेत; ते आल्यानंतर या बिकट प्रश्नाचा खल करावा लागेल. महाराजाधिराज ! आपण परमन्यायी आहांत; आम्हास क्षमा कराल अशी पूर्ण उमेद बाळगून आतां आम्ही महाराजांची आज्ञा घेतो.

याप्रमाणें ब्राह्मणपुढाऱ्याचें भाषण ऐकून बादशाहानें त्यांना सन्मानानें रवाना केलें. त्यानंतर रामाचार्य हे पंडितराय व भामिनी या राजदंपतीस घेऊन आले. त्यांच्या बरोबर भानुमती राणी ही आली. बादशाहा अकबर यानें पंडित जगन्नाथराय यांचा हात भामिनीच्या हाताशीं मिळवून दिला; आणि त्यावर भानुमती राणीनें कन्यादानाचें उदक सोडलें. राजदंपतींनीं रामाचार्य, बादशाहा व राणी यांना वंदन केलें. शेवटीं रामाचार्य, बादशाहा व भानुमती राणी या त्रिवर्गांनीं राजदंपतीच्या मस्तकावर वरदहस्त ठेवून त्यांना आशीर्वाद दिला, तो येणें प्रमाणें:—

पद्य. ( राग आसावरी. " राम भजावा राम सदोदित " ही चाल )

॥ नांदावें चिरकाल, सुखानें ॥ ध्रु० ॥
॥ विद्याविनयातुलप्रभावें, होतिल वश भूपाळ ॥ सदोदित ॥ १ ॥
॥ वादविषयजयदुंदुभिनादें, टळतिल रिपु कलिकाळ ॥ सदोदित ॥ २ ॥
॥ शुद्धप्रेमें सत्यशोधनें श्रेष्ठपदां पावाल ॥ सदोदित ॥ ३ ॥

इ. स. १६०९ मध्यें पंडितरायांच्या विवाहानंतर लवकरच बादशाहानें राजदंपतीला सोन्याच्या छडीचे चोपदार, पालखी वगैरे ऐश्वर्य देऊन नेमणुकही बांधून दिली; आणि राहावयास एक

भव्य वाडा बांधून दिला. त्या सुखनिवासांत स्वतंत्र रीतीनें राजदंपती पंडित जगन्नाथराय व भामिनी सुखानें कालक्रमण करूं लागले.

२९. इ. स. १६०५ मध्यें अकबर बादशाहा दिवंगत झाल्यानंतर लवकरच हरदीक्षितराज श्रीक्षेत्र काशीहून दिल्लीस येऊन पोंहचले. त्यावेळीं जाहंगीर बादशाहाची कारकीर्द चालू होती. या बादशाहानें पंडितरायांचें राजैश्वर्य व त्यांची नेमणूक चालत आल्याप्रमाणें चालविली होती. पंडितरायांनीं बादशाहा जाहंगीर यांस उद्देशून कांहीं श्लोक केले, त्यापैकीं एक श्लोक परिशिष्टांत दिला आहे. हा श्लोक पंडितरायांच्या रसगंगाधर नांवाच्या ग्रंथांत आढळतो. जाहंगीर बादशाहाची, संस्कृत वाङ्मय, काव्यें, कविजनांस उत्तेजन, हिंदुधर्मांतील उदात्त तत्वें, अशा विषयांकडे अकबराइतकी प्रवृत्ति नसल्यामुळें त्यानें पंडितरायांच्या सामाजिक, धार्मिक वगैरे बाबतींकडे विशेष लक्ष दिलें नाहीं. त्या कारणानें पंडितरायांस पावन करून घेण्यासंबंधांत ब्रह्मवृंदांची जी एक मोठी सभा हरदीक्षितानें भरवून पंडितरायांशीं वादविवाद केला, त्यांत बादशाहाचें अंग मुळींच नव्हतें. या सभेतल्या वादविवादांत “ धर्मशास्त्राप्रमाणें कर्ममार्गाला अनुसरून पंडितरायांनीं प्रायश्चित्त घ्यावें व यवनी-( भामिनीचा ) चा त्याग करावा ” असा हरदीक्षिताचा मुद्दा होता; आणि “ यवनीचा त्याग करणार नाहीं, यवनीसहित पावन करून घेण्यास धर्मशास्त्रांत आधार नाहीं आणि हरदीक्षिताला तसा अधिकारही नाहीं; ॥ प्रायो नाम तपः प्रोक्तं चित्तं निश्चय उच्यते ॥ तपोनिश्चयसंयोगात् प्रायश्चित्तमितीर्यते ॥१॥ या हेमाद्रीच्या वचनाला अनुसरून

ज्ञानदृष्टीनें जो उचित मार्ग दिसेल त्यानेंच मी पार होणार. " या मुद्यावर पंडितरायांचें प्रतिपादन होतें. हरदीक्षित हा विद्वान व मोठा कर्मनिष्ठ ब्राह्मण असून महामांत्रिकहि होता. या वादविवादाच्या वेळीं त्यानें हातांत एक ताईत मंत्रून बांधला होता आणि त्याच्या बळावर त्यानें वादविवादांत पंडितरायास जर्जर करून सोडलें होतें. सभेंत हरदीक्षिताचे अनुयायी पुष्कळ असल्याकारणानें पंडितरायांस सर्वानुमतें पतित ठरवून बहिष्कृत केलें. बादशाहा जाहंगीर यांचें अशा बाबतींकडे दुर्लक्ष असल्यानें व भानुमती राणीहि गत झाल्यामुळें राजदंपतीस तिकडचाहि संबंध सुटल्यासारखेंच झालें होतें. भानुमती राणीनें मरणकाळीं पंडितरायांस विनंतीपूर्वक कळवून ठेवलें होतें कीं—" रहीम व दिरंगखान यांचे अपराध माफ करावेत व त्यांना बोध करून त्यांचा सांभाळ करावा. " सामाजिक बाबतींत पंडितराय बहिष्कृत असल्याकारणानें फक्त त्यांच्या अनुयायी मंडळीशिवाय कोणीच त्यांच्याकडे येत नसे. अशा अनेक कारणामुळें पंडितराय व भामिनी यांना एका प्रकारचें औदासिन्य प्राप्त झालें होतें. म्हणून त्यांनीं कांहीं दिवस राधानगरास *( राढापुरी ) जाऊन तेथें विश्रांति घेण्याचा निश्चय केला. जातांना त्यांनीं जवळच्या सर्व मंडळीस बोध केला आणि ज्योतिष्मती ( सुवर्णलता. मालकांगोण . ) नांवाच्या दिव्य वनस्पतीचा रस दररोज एक वेळ प्राशन करण्यास सांगितलें. 'जो कोणी या दिव्य

* पंडितरायांनीं आपल्या अश्वधाटि काव्यांत राढापुरीचा उल्लेख केला आहे. ( परिशिष्ट अ. )

वनस्पतीचा रस षण्मास सेवन करील तो शास्त्राध्ययनांत निपुण होऊन अंतीं जन्ममरणापासून मुक्त होईल;' असेंहि त्यांना सुचविण्यांत आलें. त्यास अनुसरून तारा, चंद्रिका, रामाचार्य वगैरे ज्यांची पंडितरायावर श्रद्धा होती ते सर्व तो रस प्राशन करूं लागले; परंतु रहिमाची पंडितरायावर खरी श्रद्धा नव्हती, म्हणून त्यानें तो रस प्राशन केला नाहीं व भोळ्या दिरंगखानालाहि प्राशन करूं दिला नाहीं. रहीम हा बकवृत्ति धारण करून केवळ आपला डाव साधण्यासाठींच पंडितरायांच्या आश्रयाला होता. पंडितराय व भामिनी, ' कांहीं मुदतीनें परत येऊं ' असें सर्वांना सांगून राधानगरास निघून गेले.

२६. **राधानगरास** पंडितराय व भामिनी यांनीं सुखानें कालक्रमण करून काव्यलेखनांत बरेच दिवस घालविले. एकेदिवशीं सायंकाळच्या शांतवेळीं राजबागेची रम्यवनश्री पाहण्यासाठीं पुष्पवाटिकेंतील जलमंदिरांत एकांत स्थळीं उभयता बसले असतां त्यांचा जो मनोरंजक संवाद झाला त्याचा सारांश खालीं लिहिल्या प्रमाणें:—( पंडितराय जलमंदिरांतील पुष्पशय्येवर बसले होते आणि भामिनी कांहीं अंतरावर जाऊन जुईचीं फुलें काढून त्यांचा मोठा हार गुंफीत होती. )

**पंडितजगन्नाथराय**:—( प्रसन्न ) हा सायंकाळचा शांत समय चित्तास किति तरी आनंदप्रद वाटत आहे ? तो वृद्धार्क मावळत मावळत क्षितिजाखालीं जात असल्यानें हा आसपासचा प्रदेश आपल्या तेजोबळानें आपल्यासारखाच सुवर्णमय करून जात आहे कीं काय असें

वाटत आहे. ह्या कूपाच्या सभोंवतीं उत्तमोत्तम फुलझाडें वर्तुळाकार लावलीं असल्यानें त्यांची शोभा अत्यंत वाढली आहे. परंतु हे कूपा! तूं आपल्यास परम नीच असें समजून व्यर्थ खेद कां करतोस? तूं अत्यंत सरस हृदय असा असून परगुणग्रहणाविषयीं मोठा चतुर व तत्पर आहेस. जो उच्चस्थानीं असतो त्याच्या गुणकर्मांचें तूं ग्रहण करतोस आणि त्याच्या मोबदल्यांत त्या उच्चपदस्थांस तूं आपल्या हृदयांत साठविलेलें सरस उदक प्राशन करण्यास देऊन तुझें नीचत्व घालवितोस; त्यामुळें तो उच्चपदस्थ तुला आपल्यांत मिळवून आपल्यासारखा श्रेष्ठ तत्काळ करतो. यासाठीं—

भामिनीः—( इतक्यांत जुईच्या फुलांचा एक मोठा हार हातांत घेतलेली, सालंकृता, जरीचें श्वेतवस्त्र परिधान केलेली, संपूर्ण ब्राह्मणी थाटाची, सुहास्यवदना अशी भामिनी (यवनी) पंडितरायांचें भाषण ऐकून व त्यांतील रहस्य ओळखून एकदम येऊन पंडितरायांच्या गळ्यांत हार घालते. ) प्रिय नाथा! अहो, मी खेद कशाला करूं? आपण माझें पाणिग्रहण करून मला आपल्यासारखें केलेंत.

पंडितः—वाहवा प्रिये! त्या कूपास उद्देशून केलेलें माझें सर्व भाषण तूं आडून ऐकलेंस आणि त्यांतील रहस्य तूं आपल्यालाच लागूं करून घेतलेंस हें महदाश्चर्य होय. प्रियसखे! तूं मज बरोबर येथें येतांच त्या पुष्पवाटिकेंत मोठ्या त्वरेनें निघून गेलीस आणि एवढा वेळ लावून अखेर त्या जुईच्याच फुलांचा हार गुंफून माझ्या गळ्यांत घातलास याचं कारण काय?

**भामिनी:—** प्रियनाथा ! इतर फुलांपेक्षां ह्या जुईचाच सुवास आपल्या कवित्वांतील प्रसादमाधुर्याप्रमाणें मला अत्यंत मधुर वाटला.

**पंडित:—** जुईला संस्कृतांत गणिका असं म्हणतात. परपुरुषाला वश कसं करावं हें या जुईगणिकेला चांगलें माहीत असतें. म्हणून ह्या जुईगणिकेच्या संपर्कामुळें मी अपवित्र झालो.

**भामिनी:—** जुईला गणिका असं जरी म्हणतात तरी पण ज्या अर्थीं आपण परपुरुष म्हणजे परमेश्वर आहांत, जगाचे नाथ आहांत, आणि तिचा अङ्गीकारही केलांत, त्या अर्थीं आतां ॥ अङ्गीकृतं सुकृतिनः परिपालयन्ति ॥ या न्यायानं तिचं परिपालन करणं हा आपला धर्म आहे. प्रियनाथा ! सत्समागमानं तिचं नीचत्व नाहीं होऊन तिला श्रेष्ठपद प्राप्त झालंच पाहिजे. महानंदा वेश्येचा परमेश्वराकडून उद्धार झाल्याविषयीं पुराणांत कथा आहे; त्याचप्रमाणें आपल्या सत्समागमानं ह्या जुईगणिकेचा उद्धार झाला, असं मी समजते.

**पंडित:—** वाहवा ! प्राणप्रिये ! ह्या जुईगणिकेचा कलंक तूं मोठ्या चातुर्यानं घालविलास. आतां तुझ्याच सान्निध्यानं विकास पावलेल्या व ज्यांचा सुगंध आपल्या अन्योन्य प्रेमाप्रमाणें त्रिकालाबाधित आहे, अशा या बकुलपुष्पांच्या हारानें मी तुझें कंठस्थान व कुचप्रदेश विभूषित करतो. ( तिच्या मुखाकडे न्याहाळून पाहून ) आहाहाहा ! प्राणप्रिये ! हा काय चमत्कार ! तो कलानिधी पाहा कसा अगदीं दीन दिसूं लागला; त्यांत आज तर पौर्णिमा ! तोहि म्लान-

वदना दिसूं लागली. त्याचप्रमाणें हीं चंद्रविकासीं कमलेंसुद्धां पाहा कशीं निस्तेज पडत चाललीं ! !

भामिनीः—पण हें असं स्थित्यंतर एकाएकी होण्याचं कारण काय असावं बरं ?

पंडितः—ह्या बकुलपुष्पहाराच्या प्रभावानं हें तुझें मुखसरोज अधिक प्रफुल्ल दिसूं लागलं; आणि त्याचं तेज इतकं वाढत चाललं आहे कीं हा सभोंवतालचा सर्व प्रदेश मला अधिकाधिक सतेज दिसूं लागला व त्यामुळें तो चंद्रमा, ही चंद्रिका, तशींच हीं चंद्रविकासी कमलें निस्तेज दिसूं लागलीं यांत कांहींच आश्चर्य नाहीं. प्रिये ! काय हें तुझं सौंदर्य ! ! रंभा, मेनका, तिलोत्तमा, अशा अप्सरा व सुरांगना खरोखरच तुझ्या दासी शोभतील.

भामिनीः—हें काय बाई ! स्वर्गीतल्या त्या सुरांगना कुणीकडे आणि मृत्युलोकची ही यःकश्चित स्त्री कुणीकडे !

पंडितः—तुला मृत्युलोकची यःकश्चित स्त्री कोण म्हणेल ? तूं तशी असतीस तर माझी अर्धांगीच झाली नसतीस. प्रिये ! तूं क्षणभर देखील जवळ नसलीस म्हणजे मी अर्धांगरहित झालो, असं वाटून मला कांहीं एक सुचत नाहीं. ( हातानें वारा घेतो ).

भामिनीः—प्रिय रमणा ! आपण या पुष्पशय्येवर बसून क्षणभर विश्रान्ती घ्यावी. मी आपणाला वारा घालते. पण मी आपणास घातलेला वारा आवडेल कसा ? कारण, बाणकवीचा पिता चित्रभानू

यांस काव्य लिहीत असतांना उष्मा होऊ लागला म्हणजे साक्षात् सरस्वती येऊन आपल्या हातानें वारा घालीत असे, आपलाहि अधिकार तसाच आहे.

पंडित:—आणि तुझा अधिकार काय कमी आहे? तुझ्या ठायीं तर लक्ष्मी आणि सरस्वती यांनीं एकत्रवास केला आहे; आणि श्यामसुंदर श्रीविष्णूला शोभविणाऱ्या गौरतनु श्रीलक्ष्मीप्रमाणें, अथवा नीलवर्ण अशा सागरास प्रेमानें जाऊन भेटणाऱ्या शरच्चंद्राच्या श्वेतकांतीसारख्या श्रीगंगेप्रमाणें, अथवा सजल श्यामवर्ण मेघाच्या वक्षस्थळीं मालाकार चमकणाऱ्या शुभ्र-विद्युल्लतेप्रमाणें, अथवा वाणी व अर्थ अशा संलग्न वागर्थाप्रमाणें, ही आपली अद्वितीय व अलौकिक जोडी श्रीपरमेश्वरानें निर्माण केली आहे. यावरून या सर्व अवनीतलावरील स्त्रियांपेक्षां तुझा अधिकार अधिक आहे किंवा नाहीं?

भामिनी:—मरणं प्रकृतिः शरीरिणाम् ॥ या उक्तीला अनुसरून मी कधीं तरी मृत्युमुखीं पडणारच. म्हणून म्हणते कीं, या मृत्युलोकच्या स्त्रियांहून माझी योग्यता अधिक ती काय असणार?

पंडित:—मग ती उक्ति मलाहि लागूच आहे. परंतु या माझ्या वाणीच्या साम्राज्यांत वाङ्मयतप व मातृभक्ति यांच्या तेजोबळानें मी मृत्यूलाहि जिंकीन इतकें सामर्थ्य माझ्या अंगीं वास्तव्य करीत आहे. ज्या अर्थीं मी पुरुष व तूं माझी प्रकृति म्हणजे अर्धांगीच आहेस, त्या अर्थीं तुझे दिव्य तेज अवलोकन करून मृत्यूलासुद्धां

मुकाट्यानं मार्गे हटावें लागेल हें उघड आहे. तूं घालीत असलेल्या या वाऱ्यामुळें माझा त्रिविधताप नाहींसा होत आहे, असं मला वाटतं.

**भामिनीः**—प्रिय हृदयानंदा ! प्रसाद व माधुर्य यांनीं ओतप्रोत भरलेल्या या आपल्या वाणीनें माझ्या मनोवृत्ति अत्यंत प्रसन्न झाल्या आहेत.

**पंडितः**—आहाहाहा ! हे चारुगात्रि ! हें तुझें सुप्रसन्न हास्य-वदन पाहून मला असें वाटतें कीं—हें हास्य नव्हें; तर सर्व जगाला मोहीत करून टाकणारी आनंदप्रद व स्वभावतःच सुंदर अशी ही तुझी नूतन प्रसन्नताच होय. हें तुझें मुख नव्हें, तर सर्व अवनीतलावर ज्याचा सुगंध पसरला आहे असें एक सुगंधशाली पुष्पच होय. हें तुझं स्तनद्वय अगदीं मिथ्या आहे, ही तर सुवर्ण केतकी रंगाचीं सूर्यचंद्राप्रमाणें तेजस्वी दोन फळेंच असून त्यांत सर्व जगांतील प्राणी-मात्रांच्या चेतःप्रवृत्ति साठवून ठेवल्या आहेत, असं मला खास वाटतं. ह्यावरून अखेर मी असंच ठरवून ठेवलं आहे कीं, तूं सुंदर स्त्री नसून सर्व भ्रमररूपी विश्वाला वंदनीय अशी एक परम दिव्य अमृतवल्लरीच आहेस.

**भामिनीः**—प्रिय रमणा ! मी अमृतवल्लरी हें जर निश्चित झालं, तर मग आपण सर्व वांछित पूर्ण करणारे कामनाकल्पवृक्षच आहांत हें उघड आहे. या करितां ही आपली अलौकिक वृक्षवल्लरीची अपूर्व जोडी कशी शोभते, ती आपण या आरशांत पाहूं या.

( त्याप्रमाणें पाहून ) मत्प्राणवल्लभा ! हें तनुसुख म्हणजे अल्पसुखच; अर्थात विजेच्या तेजाप्रमाणें क्षणभंगुर आहे; म्हणून याहूनही श्रेष्ठ अशा अतनुसुखाची प्राप्ति मला कशी व केव्हां होईल ?

पंडितः—अग वेडे ! या क्षणभंगुर तनुसुखासाठीं मी तुझा अंगीकार केलाच नाहीं; व आजपावेतों मजपासून जें सुख मिळालं तेंच अतनुसुख म्हणजे ( शरीररहित अशा ) अनंगाचं अथवा त्या मदनाचंच सुख ! कां असंच ना ?

भामिनीः—प्राणेशा ! मी कायावाचामनेंकरून आपलं पाणिग्रहण केलं तें केवळ अतनु म्हणजे शरीररहित अशा अनंगरंगाच्या सुखासाठीं नव्हे. तर अतनु–सुख म्हणजे अनल्प–मोठं–असं जें परम-सुख=मोक्षाचं अक्षय्यसुख तें आपल्या योगानंच प्राप्त होण्यासाठीं मी आपली अर्धांगी झाले; आणि आपणही देवाग्निद्विजासन्निध कोणतीं वचनें बोललांत याचं स्मरण करा.

पंडितः—त्याचं मला चांगलं स्मरण आहे. खरोखर तूं म्हणतेस तसाच माझा मूळ उद्देश आहे. मी हें सहज विनोदानं बोललों. श्रीभगवती आपली इच्छा पूर्ण करील; आणि तिच्याच कृपेनं मी असं अभिमानानें प्रतिपादन करतो कीं–श्रीधीस्त्री यांहि संपन्न माझ्यासारखा परम भाग्यशाली पुरुष या वसुधातलावर कुणीच नाहीं. आज मी या माझ्या अर्धांगीसहित स्वानंद पर्वताच्या शिखरावर बसून परम सुख भोगीत आहे. [ "हा तुझा मिथ्याभिमान लवकरच नष्ट होईल. तूं

पतित आहेस" याप्रमाणें कोणी एकाएकी दुरून बोललं असं ऐकतांच पंडित व भामिनी एकदम उठून चहूंकडे पाहूं लागले; पण तेथें कोणीच दिसलं नाहीं. हें दुसरं कोणी नसून दुष्टबुद्धि रहीमच पंडिताचा गुप्तरीतीनं पाठलाग करीत राधानगरास आला होता व स्वर बदलून मोठ्यानं बोलून आपल्या जागीं निघून गेला."] हें कोण बोललं असावं?

भामिनीः—तें कुणीहि असो. प्रियनाथा! आपण असा अभिमान धरूं नये. रावणाच्या सुद्धां गर्वाचं खंडन श्रीपरमेश्वरानं केलं, मग आपली काय कथा?

पंडितः—हा मिथ्याभिमान नव्हे. मी प्रतिज्ञेनें सांगतो कीं हा सत्याभिमान आहे; आणि तो श्रीभगवतीच्याच कृपेनं तुला खरा करून दाखवीन. तसंच या अज्ञान लोकांनीं मानलेल्या पतितावस्थेतून आपण कसे शुद्ध होऊ, तेंहि तूंच पाहशील.

याप्रमाणें पंडितरायांनीं राधानगरास आपल्या प्रिय पत्नीसह, विवाहाचं मूळ रहस्य यज्ञयागादिकर्मानुष्ठानाची सिद्धि ती प्राप्त करून घेतली, त्यानंतर ते ज्ञानमार्गाला लागले. काव्यलेखन हा त्यांचा आवडता विषय अंगवळणीच पडला असल्यानें तो त्यांनीं चालूंच ठेविला होता. येथून पंडितराय व भामिनी, कुचबिहारचा साहवा राजा प्राणनारायण याजकडून सन्मानपूर्वक बोलावणें आल्यावरून तेथें जाऊन कांहीं दिवस राहिले. तेथून निघतांना राजा प्राणनारायण यांस उद्देशून लिहिलेलें **प्राणाभरण** नांवाचें काव्य त्यांनीं त्याला प्रेमादरपुरस्सर अर्पण

केलें. त्यानंतर उदेपुरचा राणा कर्ण, याचा मुलगा जगत्सिंह, यानकडून पंडितरायास सन्मानपूर्वक बोलावणें आल्यावरून उभयता उदेपुरास गेले; तेथें कांहीं दिवस राहून जगत्सिंहाला उद्देशून **जगदाभरण** या नांवाचें काव्य त्यांनीं लिहिलें व तें त्यास प्रेमादरानें अर्पण केलें. जोधपुरच्या मालदेवाला गोद्वार, उज्जनी, देबलपूर, बदनावर ही १९८२४१४ रुपये उत्पन्नाचीं चार गांवें देऊन त्याची कन्या जोधाबाई इच्याशीं दिल्लीस जाहंगीर बादशाहानें लग्न केलें. या प्रसंगीं उदेपुराहून पंडितरायाला आदरपूर्वक आणावयास जाहंगीर बादशाहानें माणसें पाठविलीं होतीं; परंतु बादशाहा मद्यप्राशनादि दुर्व्यसनांत सदैव निमग्न असल्याचें त्यांना समजल्यामुळें ते उदेपुराहून गेले नाहींत. कांहीं दिवसानंतर शाहाजहां उर्फ खुर्रम् बादशाहाच्या कारकीर्दीत प्रारंभींच पंडितरायांना सन्मानानें दिल्लीस परत बोलावण्यांत आलें होत. कारण, शाहाजहां बादशाहा हा कविजनांचा व संस्कृत वाङ्मयाचा मोठा भोक्ता होता. रहीमही पंडितराय व भामिनी यांच्या पाठोपाठ गुप्तरीतीनें दिल्लीस येऊन राहिला.

२७. **बादशाहा** अकबर, जाहांगीर व शाहाजहां या त्रिवर्ग मोगल बादशाहांनीं पंडितराय व भामिनी (यवनी) यांच्या मिश्रविवाहासंबंधांत पूर्ण सहानुभूति दर्शविली होती; हें हरदीक्षितास मुळींच पसंत पडलें नव्हतें. पंडितरायांना बळेंच प्रायश्चित देऊन शुद्ध करून घ्यावें आणि भामिनीला (यवनीला) यवनाच्या म्हणजे दिरंगखानाच्या ताब्यांत सोंपून मोकळें व्हावें; असा त्यानें निश्चय केला होता.

पंडितरायांच्या या मिश्रविवाहाच्या बाबतींत तर तो या त्रिवर्ग मोगल बादशाहांना अगदीं नीच समजत होता. जयपुरपति राजा भगवानदासाचा पुत्र मानसिंह हा नाभाजीचा परम भक्त होता. जाहांगीरास राज्यपद मिळूं नये अशा विषयीं खटपट करून बंडाळी माजवील म्हणून त्याला नाहींसा करण्याच्या हेतूनें अकबरानें एक विषारी माजुमीच्या अन्नाचें ताट मानसिंहासाठीं, व एक चांगलें शुद्ध ताट स्वतःसाठीं, अशीं दोन्ही ताटें एकाच वेळीं मागविलीं असतां विलक्षण चूक होऊन विषारी ताट अकबराचे भागास आल्यामुळें तो अकस्मात हाल अपेष्टेंत मरण पावला. जाहांगीर बादशाहासुद्धां रजपूत स्त्रियेशीं लग्न करून अखेर मद्यप्राशनादि दुर्व्यसनांत गर्क झाला व लवकरच मृत्युमुखीं पडला; आणि शाहाजहांची सुद्धां पुत्रांच्या कलहामुळें अखेर तीच स्थिति होणार. अकबर, जाहांगीर व शाहाजहां या त्रिवर्ग मोगल बादशाहांनीं संस्कृत वाङ्मयाची व पंडित, कवि, साधुसंत यांची उन्नति करून महत्पुण्य गांठीं बांधलें खरें, पण त्यांत यवनांच्या खऱ्या कर्तव्यकर्मास झुगारून देऊन रजपुतांच्या मुलींशीं लग्न लावणें, ब्राह्मणयवनीच्या मिश्रविवाहास सहानुभूति दाखविणें वगैरे अधर्माचे निंद्य प्रकार करून कर्मभ्रष्टपणाच्या पातकांची भर पडल्यामुळें तें सर्व महत्पुण्य पार नाहींसें झालें आणि ते सर्व असद्गतीस पात्र झाले. अशा प्रकारचे हरदीक्षिताचे विचार असल्याकारणानें त्यानें रहीम व दिरंगखान यांस हाताशीं धरून पंडितराय व भामिनी यांचा ठिकठिकाणीं अपमान व छळ करण्याचा निश्चय केला. रहीम हा पंडितरायाचा शत्रु आहे याची हरदी-

क्षिताला चांगलीशी माहिती नव्हती; म्हणून त्यानें प्रथम रहीमास गांठून उपदेश केला आणि तो त्याला चांगलाच पटला. कारण, पंडितरायांचा छळ करावयास रहीम एखादा ब्राह्मण शोधीतच होता त्यामुळें त्याचें हें अनायासेंच काम झालें.

२८. दिरंगखान हा कवि होता व त्याला सुद्धां शाहाजहांच्या दरबारांत मानसन्मान चांगला मिळत होता. परंतू स्वभावानें भोळा असल्यानें मुसलमान समाजांतील कांहीं कुत्सित लोक, त्यानें तारेशीं मिश्रविवाह केला असल्यानें व तिच्या मर्जीनुरूप हिंदूरीतरिवाज पत्करले असल्यामुळें, त्याची ठिकठिकाणीं कुचेष्टा करून त्याला नेहमीं हिणवीत होते. भामिनी स्वतःला न मिळाल्यानें तो अंतर्यामीं असंतुष्ट होताच. त्यानें तारेच्या मागें असा तगादा लाविला होता कीं - तिणें हिंदूरीतरिवाज सोडून मुसलमानी पेहेराव पत्करावे; पण रामाचार्य, चंद्रिका, सोमदेव, यांच्याच अनुमोदनानें ती वागत असल्यामुळें व स्वतः स्वामीनिष्ठ असल्याकारणानें ती कर्तव्यपराङ्मुख कधींहि झाली नाहीं; त्याचप्रमाणें पंडितराय व भामिनी यांच्या ठायीं असलेली तिची अढळ श्रद्धा यत्किंचितही कमी झाली नाहीं. ती दिरंगखानाला नेहमीं सांगत असे कीं—" माझ्या शरीराचे तुम्ही मालक खरे, पण माझ्या मनाचे मालक तुम्ही कसे असूं शकाल ? " दिरंगखान हा बाह्यात्कारें पंडिताविषयीं अत्यन्त सहानुभूति दाखवीत होता खरा; पण चंचलवृत्तीचा असल्यामुळें त्याची भामिनीविषयीं कामवासना अंतर्यामीं सदैव जागृत असे. तारेचा त्याला पुष्कळ अंशीं धाक होता म्हणून

त्याचें तिच्यापुढें कांहीं एक चालत नव्हतें. हरदीक्षितानें छिन्नमस्ता नांवाच्या एका उग्र व जागृत देवतेचें विधीपूर्वक अनुष्ठान करून एक ताईत सिद्ध केला होता. पंडितरायांचा ठिकठिकाणीं अपमान करून त्यांना तोंडघशीं पाडावें व स्वतः यशस्वी व्हावें, याच उद्देशानें हा ताईत सिद्ध करून हातांत बांधला होता. त्याशिवाय रहीमानें सुद्धां शाबरीमंत्रानें एक दोरा मंत्रून हरदीक्षितास दिला होता. रहीम हा दिरंगखानाला आपल्या मुठींत ठेवण्यासाठीं त्याच्यावर मोहिनीमंत्राचा प्रयोग करीतच होता. तात्पर्य, हरदीक्षित, रहीम व दिरंगखान यांचें एका प्रकारचें त्रिकुटच जमलें होतें. या त्रिवर्गांनीं एकमत होऊन पंडितराय व भामिनी यांना छळून छळून जर्जर करावें असा बेत केला होता. एके दिवशीं त्यांना अशी बातमी कळली कीं पंडितराय व दिरंगखान यांना बहुमानानें योग्य पदव्या देण्यासाठीं शाहाजहां बादशाहा एक मोठा दरबार भरविणार आहे. या दरबारांत अकस्मात प्रवेश करून पंडितरायांचा उघड अपमान करावा असें हरदीक्षितानें ठरविलें.

२९. पंडितराय व भामिनी दिल्लीस परत आल्यावर बादशाहा शाहजहां यानें एक मोठा दरबार भरवून त्यांत पंडितरायांना कविराज (*कबराय) व दिरंगखानास गुणसमुद्र ( *गुणसमुंदर ) अशा पदव्या

* ( ब्लोचमनकृत ऐन्. इ. अकबारीचें इंग्रजी भाषांतर वॉ. १ पृष्ठ ६१३ ची टीप पाहा. )

देऊन त्या उभयतांची रौप्यतुला केली; त्यांत दरेकाचें वजन ४५०० रुपये भरलें, ते प्रत्येकाला बक्षीस देण्यांत आले. या प्रसंगीं हरदीक्षित खदिरांगाराप्रमाणें लाल होऊन आला आणि बादशाहाला म्हणाला " अरे राजा ! तूं प्रत्यक्ष श्रीविष्णूचा अंश ! साधुसंतांचा भोक्ता ! असा असून ही कोणाची तुला करतोस ? दिरंगखानाची तुला करतोस हें योग्य आहे; परंतू हा जगन्नाथपंडित भ्रष्ट व पतित ठरला आहे. याची तुला तूं काय म्हणून करतोस ? अरेरे ! अशा पतितास हद्दपार करण्याचें सोडून त्यांस उत्तेजन देतोस, हें योग्य नाहीं ! " असें त्वेषानें बोलून पंडितरायांची रौप्यतुला ओढण्याचा त्यानें प्रयत्न केला; परंतू दरबाराची सर्व मंडळी हरदीक्षितावर उलटल्यामुळें तो त्याचा प्रयत्न फुकट गेला. बादशाहा शाहाजहां हा मथुरासनस्थ होता. त्याला पंडितराय कूर्मराज असें म्हणत असे, कूर्मराज याचा अपभ्रंश होऊन शाहाजहां बादशाहाचें खुर्रम् असें नांव इतिहासप्रसिद्ध आहे. दरबारांत आसफखान, पंडितरायांचे मथुरेचे परम मित्र रायमुकुंद, कुचबिहारचे प्राणनारायण, उदेपुरचे जगत्सिंह, रामाचार्य वगैरे सर्व मंडळीच्या विद्यमानें बादशाहा हरदीक्षितास म्हणाला:—

" पंडित कविराजांनीं स्वतःची वाणी इतकी सिद्ध, शुद्ध व प्रसादयुक्त केली आहे कीं त्या वाणींत माधुर्य व ज्ञान यांचें सदा सर्वकाळ वास्तव्य आहे; म्हणून ते सर्व कामांत सत्ताधीश आहेत. त्यांनीं यवनीशीं शरीरसंबंध केला तो केवळ एखाद्या प्राकृत मनुष्याप्रमाणें कामविकाराला वश होऊन केला नाहीं; तर कोणतें तरी श्रेष्ठ प्रकारचें ध्येय योजूनच

केला आहे, असें ते जगाला सिद्ध करून दाखवितील. मला पंडित, साधू, कविजन आणि संस्कृतवाङ्मयविशारद असे पुरस्कर्ते सर्व वंद्य आहेत. तुम्ही पंडितराजाविरुद्ध भाषण केलेंत आणि सर्वांना उद्वेग उत्पन्न होईल असें निंद्याचरण केलेंत, हा मोठाच अपराध होय. पण आज मी तुमच्यावर दया करून तुम्हाला सोडतो; नाहींपेक्षां तुम्हाला येथेंच कैद केलें असतें." हें भाषण ऐकून हरदीक्षित अधिक संतापला व तेथून रागानें पाय आपटीत निघून गेला. पंडितरायांनीं हरदीक्षिताची यत्किंचित् ही निंदा न करतां—" तो अत्यंत कर्मनिष्ठ असून ज्ञानमार्गांत मुळींच शिरलेला नाहीं. कालेंकरून तो ज्ञानसंपन्न झाल्यावर सर्वरीतीनें त्याची खात्री होईल." अशी बादशाहाची समजूत घातली. त्यानंतर त्यांनीं श्रीक्षेत्र काशीस जाण्याची इच्छा प्रदर्शित केली. बादशाहाची मर्जी आणखी कांहीं दिवस पंडितरायांनीं दिल्लीस राहावें अशी होती; परंतू पंडितरायांचा निग्रही स्वभाव व दृढ निश्चय पाहून त्यांना जाण्याची परवानगी द्यावी लागली. दाराशुको हा बादशाहाचा सर्वांत वडील मुलगा होता. तो पंडितरायांचा मोठा भक्त होता. पंडितरायाला तो म्हणाला " आपण श्रीक्षेत्रीं निघून गेलांत तर मग मला अध्यात्मविद्या कोण शिकवील ? " उपनिषदें हीं वेदांचीं अंगें असून या उपनिषदांना तो कुरानच समजत होता; आणि त्यांस पूज्य मानून त्याचीं त्यानें फारशींत भाषांतरेंहि केलीं होतीं. या भाषांतरांच्या प्रस्तावनेंत " श्रीगणेश " या देवाच्या नांवाचा उल्लेख केला होता. हें त्याचें आचरण त्याचा कनिष्ठ बंधू औरंगजेब याला मुळींच पसंत

नव्हतें; व तो दाराशुकोला " दाराबीशुको " ( बी=नीचपणा सूचक. ) असें म्हणून नेहमीं चिडवीत असे. " हिंदुदेवता व हिंदूधर्म या विषयीं जर तुझी श्रद्धा उडेल तरच तुला औरंगजेब राजपाट पचूं देईल, नाहीं तर पचूं देणार नाहीं, हें लक्षांत ठेव " असें पंडितराय त्याला नेहमीं म्हणत असत; परंतु " राजपाट मिळो वा न मिळो, हिंदूदेवता व हिंदूधर्म यावरील माझी श्रद्धा कधींच ढळणार नाहीं. " असें तो पंडितरायाला स्पष्ट सांगत असे. रौप्यतुलेचा समारंभ आटोपल्यावर पंडितरायांनीं बादशाहाचे मुख्य सल्लागार आसफखान यांस आसफविलास या नांवाचें स्वतः रचलेलें काव्य अर्पण केलें. त्यानंतर शाहजहां बादशाहाची स्तुति गाऊन ( परिशिष्ठ अ. ) त्यांनीं बादशाहाची परवानगी घेतली; आणि पानसुपारीचा समारंभ रीतीप्रमाणें झाल्यावर दरबार बरखास्त झाला.

२०. दिरंगखानाच्या अंतर्यामीं भामिनीविषयीं पापवासना होती याची पंडितरायास कल्पनाहि नव्हती. जरी कदाचित् थोडी बहुत तशी कल्पना पंडितरायांची पूर्वी झाली असली, तरी भानुमती राणीनें प्राणोत्क्रमणसमयीं " दिरंगखान व रहीम यांचे सर्व अपराध क्षमा करून त्यांना सांभाळावें व अंतर देऊ नये " असे उद्गार काढले असल्यानें पंडितरायांनी त्या उभयतांविषयीं मन शुद्ध केलें होतें. यासाठीं दिरंगखान, तारा व रहीम यांनीं प्रवासांत पंडिताबरोबरच राहावें, व रामाचार्य आणि चंद्रिका यांनीं पुढें मथुरेस रायमुकुंदाकडे जावें,

असें ठरविण्यांत आलें होतें. त्याप्रमाणें उभयतांनीं पुढें मथुरेस जाऊन " पंडितराय व भामिनी मागाहून लवकरच येणार आहेत" असें राय-मुकुंदास कळविलें. इकडे पंडितराय व भामिनी, सोमदेव, दिरंगखान, तारा, रहीम, हीं मंडळी दिल्लीहून निघून कौशी येथें यमुनातटाकीं आनंदोद्यानांत येऊन राहिली. हरदीक्षित बैराग्याचा वेष धारण करून या मंडळीच्या मागोमाग निघाला होता; हें रहीम व दिरंगखान यांस माहीत असून दररोज ते त्यास एकांतीं गांठून पंडितास कसें छळावें अशाविषयीं खलबतें करीत असत. हरदीक्षितानें मंत्र सामर्थ्यानें दिरंग-खानाची मति पंडितरायभामिनी यांचे संबंधांत अगदीं भ्रष्ट करून टाकली होती; त्यामुळें तो, रहीम व हरदीक्षित यांच्याच सल्ल्यानें वागत होता. हरदीक्षितानें छिन्नमस्ता देवतेच्या महामंत्रानें ताईत सिद्ध करून ठेविले होते. अशा ताइतांचा ज्याच्या अंगाला स्पर्श होईल तो अगदीं मोहीत होऊन जात असे. याचा प्रयोग त्यानें पंडितरायावर करून पाहिला; परंतू तो लागू पडला नाहीं. त्यामुळें त्याला मोठा क्रोध येऊन त्यानें एक मोठें होमकुंड तयार केलें आणि विधीपूर्वक त्यांत स्वाहाकार करून छिन्नमस्तादेवीला प्रसन्न करण्यासाठीं अनुष्ठानास प्रारंभ केला.

३१. श्रीकृष्णाला पांडव अत्यंत प्रिय होते; तरीपण त्यांना झालेला गर्व श्रीकृष्णाला सहन झाला नाहीं; म्हणून त्याला पांडवांचा गर्व परिहार करावा लागला. त्याप्रमाणें पंडितराय जरी अंतर्निष्ठ सिद्ध

पुरूष होते व वाग्देवीचे परमभक्त होते, तरी पण श्रीधीस्त्री या ऐश्वर्याचा त्यांना मोठा गर्व झाला होता, तो छिन्नमस्ता देवतेला आवडला नाहीं; म्हणून पंडितरायांचा गर्वपरिहार करावा या उद्देशानें हरदीक्षित, रहीम व दिरंगखान हे त्रिवर्ग पंडितरायभामिनी यांना छळावयासाठीं जें कृष्णकारस्थान रचीत होते, त्यास थोडी बहूत मदत करण्याची दैविक योजना ठरली व त्याप्रमाणें पंडितरायभामिनी यांच्या हृदयांत मोहमायेनें प्रवेश केला. एके दिवशीं दिरंगखान हा तारा व भामिनी यांना घेऊन तिसऱ्या प्रहरीं आनंदोद्यानांतून यमुनेच्या तीरानें रम्यवनश्री पाहात पाहात कौशी गांवा नजीक घेऊन आला. आनंदोद्यानापासून कौशी गांव सुमारे तीन मैलांच्या अंतरावर होता. पंडितराय व सोमदेव आनंदोद्यानांतच कांहीं धार्मिक विषयावर विवेचन करीत फिरत होते. भामिनी, तारा व दिरंगखान हे उद्यानाच्या आसपासच सहज फिरत असतील अशी त्यांची कल्पना होती. रहीम हा बाजार करण्याच्या निमित्तानें सर्वांच्या आधींच कौशीस रवाना झाला होता. दिरंगखान, भामिनी व तारा कौशी नजीक सायंकाळच्या वेळीं येऊन पोंहचतांच, पूर्वसंकेताप्रमाणें हरदीक्षिताच्या सल्ल्यानें रहीम हा दोन चपळ घोडे घेऊन आला व एकावर स्वतः तारेला घेउन बसला व लागलींच घोड्यास टांच मारून विद्युद्वेगानें दक्षिण दिशेला निघून गेला. त्याच्याच मागोमाग दुसऱ्या घोड्यावर दिरंगखान हा भामिनीस घेऊन बसला व विद्युद्वेगानें रहीम गेला त्याच दिशेला निघून गेला; अशा अत्याचारामुळें तारा व भामिनी मूर्छित झाल्या होत्या त्याच भयंकर स्थितींत

त्यांना घेऊन जाण्यांत आलें होतें. हरदीक्षित बैरागी हा तर गुप्तरीतीनें त्याच मार्गानें पूर्वी चालता झाला होता.

३२. **आ**नंदोद्यानांत पंडितरायांनीं बराचवेळ भामिनी, तारा व दिरंगखान यांची वाट पाहिली. शेवटीं यांत कांही तरी दगा असावा असा खास संशय आल्यानें त्यांनीं सोमदेवाला त्याच रात्रीं कौशीस पाठविलें. सोमदेवानें कौशी गांवांत व आसपास दोन तीन तास भटकून दक्षिण दिशेकडे घोड्यावर बसून चौघे अत्यंत वेगानें निघून गेले, असा शोध काढला; व लागलींच आनंदोद्यानांत येऊन पंडितरायांना ती बातमी कळविली. " हें गूढ काय असावें " यासंबंधांत पंडितरायांनीं अंतर्ज्ञानानें पुष्कळ विचार केला;पण देवीच्या मोहमायेचा अंमल त्यांचे-वर पूर्ण बसल्याकारणानें त्यांना खरा प्रकार कांहीं एक समजूं शकला नाहीं. अखेर पंडितराय फारच संतापले व दुसऱ्या दिवशींच प्रातःकाळीं ते आनंदोद्यानांतून निघून मथुरेस रायमुकुंदाकडे येऊन पोंहचले. राय-मुकुंदाच्या घरीं रामाचार्य व चंद्रिका पूर्वींच येऊन राहिले होते. पंडितरायांनीं रायमुकुंद, रामाचार्य व चंद्रिका यांना घडलेल्या कृष्ण-कारस्थानाची साग्र हकीकत कळवितांच सर्व मंडळी अतिशय हळहळली. पंडितराय एकाएकी क्रोधानें उठले व या कृष्णकारस्थानाच्या उत्पादकांस शाप देणार, अशांत चंद्रिकेनें उठून पंडितरायाला नमस्कार केला व हातजोडून " शांत व्हा, शांत व्हा " असें नम्रता-पूर्वक म्हणून तिनें पंडितरायाला खालीं बसावेलें. ती म्हणाली

" पंडितराय ! आपण थोर विभूति आहांत ! आपण असल्या कामीं आपलं दिव्य ब्रह्मतेज खर्ची घालावं हें रास्त नाहीं. शत्रूला हुडकून काढून त्यांना समक्ष तीव्र शासन करावं; म्हणजे त्यांना कृतदुष्कर्मांचा पश्चात्ताप खात्रीनें होईल. " रायमुकुंद व रामाचार्य यांनींही पंडितरायांशीं बोधपर समयोचित भाषण करून पंडितरायांचा क्रोध पुष्कळ कमी केला. सोमदेव म्हणाला " गुरुराज ! आपण आतां येथें स्वस्थ विश्रान्ति घ्यावी; मी शत्रूंचा शोध काढून येतो. " रायमुकुंद, रामाचार्य व चंद्रिका यांनींही तसेंच म्हटलें, पण पंडितरायांना कोणाचेंच म्हणणें पटलें नाहीं. त्यांनीं स्वतःच प्रवास करून शत्रूंचा शोध लावण्याचें ठरविलें; त्याप्रमाणें ते लवकरच भामिनीच्या शोधार्थ निघाले. कांहीं मुद्दतीनंतर रामाचार्य, रायमुकुंद व सोमदेव ही मंडळी-सुद्धां भामिनी व पंडितराय यांच्या शोधार्थ निरनिराळ्या मार्गानें निघाली. चंद्रिका मात्र रायमुकुंदाकडे मथुरेसच राहिली.

३२. तारा व भामिनी यांना घेऊन दिरंगखान व रहीम भरधांव घोडे फेकीत आसपासच्या डोंगरी प्रदेशांत येऊन पोंहचले; आणि चंबळनदीच्या कांठीं एका जुनाट डोंगरी किल्ल्यांत दोघींना निरनिराळ्या ठिकाणीं नजर कैदेंत ठेवण्यांत आलें. भामिनीविषयीं दिरंगखानाची पापवासना होतीच व त्यांत हरदीक्षितानें मंत्रून दिलेल्या ताइताचा दुजोरा मिळाल्यामुळें त्याची बुद्धि अधिक भ्रष्ट होऊन त्यानें भामिनीचा अत्यंत छळ आरंभिला. ज्या ज्या वेळीं तो संधि

साधून भामिनीला धरण्यास जात असे, त्या त्या वेळीं त्याचा अंतरात्मा त्याला आंतून टोचीत असल्याकारणानें आणि प्रबळ कामवासनेचा अतिरेक होत असल्यामुळें त्याला ऐन वेळीं कंपवायू होऊन तो लथडत खालीं पडत असे व त्याला भामिनीचे लत्ताप्रहार सोसावे लागत असत. कधीं कधीं तर तो रहीमाच्या सल्ल्यानें सुरापान करून भामिनीकडे जाई; त्या वेळीं त्याची अत्यंत फजीती होऊन **भामिनीविलासाच्या** ऐवजीं त्याला **सुराविलासाचेच** परिणाम भोगावे लागत असत. एकदा भामिनीनें असा निश्चय केला कीं अशा हाल अपेष्टा भोगण्यापेक्षां आत्महत्या करून मोकळं व्हावं हेंच उत्तम. परंतु पंडितरायांना भेटण्याची उत्कंठा आणि आत्महत्या करणाराला मुक्ति मिळत नाहीं हे दोन विचार तिच्या मनांत घोळत असल्यानें तिला आत्महत्त्या करण्याचा बेत रहीत करावा लागला. गरीब बिचाऱ्या तारेचाहि असाच छळ चालू होता. " तुझी प्रियसखी भामिनी जर मला मिळवून देशील तरच तूं जीवंत राहशील; नाहींपेक्षां तुला ठार मारीन; " असा दिरंगखान तिला धाकदपटशा दाखवून नेहमी गांजीत असे; परंतू तिणें स्वतःचा निश्चय ढळूं न देतां दिरंगखानाला फजीत करून स्पष्ट सांगितलें कीं:—" माझा शिरच्छेद करा म्हणजे मी या त्रासांतून मोकळी होईन. माझ्या हातून अनीतीचं वर्तन कधींहि घडणार नाहीं; आणि तुम्हाला या पापाचा परिणाम भोगावा लागेल. " आपलें काम होत नाहीं असें पाहून रहीम व दिरंगखान हरदीक्षिताकडे गेले व त्याला सर्व हकीकत कळविली.

३४. हरदीक्षितानें रहीम व दिरंगखान यांची हकीकत ऐकून घेतली. त्यामुळें तो अत्यंत संतापला व छिन्नमस्ता देवीची पुनः आराधना करून मंत्रमहौषधी नांवाच्या ग्रंथाच्या आधारानें त्यानें उग्र अनुष्ठान केलें. जिणें स्वतःचें शिरकमळ एका हातांत घेतलें आहे आणि जी स्वतःच्याच धडांतून कारंजाप्रमाणें उडत असलेल्या रक्ताच्या धारा प्राशन करीत आहे, अशा अक्राळविक्राळ छिन्नमस्ता देवीला त्यानें प्रसन्न करून घेतलें आणि पंडिताचें व भामिनीचें अशीं दोन रक्तबंबाळ मायावी शिरकमळें देवीपासून मागून घेतलीं. देवीनें त्याला बजावलें होतें कीं " तीन मासानंतर हीं शिरकमळें अदृश्य होतील. " हरदीक्षितानें पंडिताचें रक्तबंबाळ शिरकमळ दिरंगखानाच्या स्वाधीन केलें व त्याला बजावलें कीं " हें असंच घेऊन जाऊन भामिनीला दाखीव म्हणजे पंडिताविषयीं ती निराश होऊन तुला वश होईल. " भामिनीचें शिरकमळ संधि साधून पंडिताला दाखविण्यासाठीं त्यानें तें स्वतःचे जवळ ठेविलें. रहीमानें भोळ्या दिरंगखानाला स्पष्ट कळविलें कीं—" तूं यथेच्छ सुरापान कर व त्या भामिनीलासुद्धां थोडीशी सुरा जुलुमानं पाज. म्हणजे तुझ्या सुराविलासांत भामिनीविलासाची भर पडून आनंदरंगांत दंग होशील; मात्र अशा अनंगाच्या क्रीडालहरींत त्या पीनोत्तुंगस्तनी अशा कुरंगनयनेचा मनोभंग यत्किंचित्‌हि होऊं न देतां हें पंडिताचं रक्तबंबाळ उत्तमांग ( शिर ) तिला दाखीव म्हणजे ती पंडिताविषयीं निराश होऊन ताबडतोब तुझं कार्य होईल. " दिरगखानानें रहीमाची ही सूचना मान्य केली व तो ती अमलांत

आणण्याच्या उद्योगास लागला. दिरंगखानानें तारेच्या मागें एकसारखा धोशा लावलाच होता कीं एक तर तिणें भामिनीला वश करून द्यावी नाहिंपेक्षां जीवाची आशा सोडावी. तारेला असा अहोरात्र छळ दुस्सह झाला, तेव्हां ती दिरंगखानाला म्हणाली:–" या तलवारीनें माझा एकदाचा शिरच्छेद कां करानांत ! म्हणजे मी या जाचांतून तरी सुटेन. " परंतु दिरंगखान हा स्त्रीजित असल्याकारणानें व भामिनीला वश करण्यास तारा एक उत्तम साधन असल्यामुळें तिला ठार मारण्याची त्याची हिंमतच चालली नाहीं.

पूर्वी ठरल्याप्रमाणें दिरंगखान हा सुरापान करून व थोडी सुरा बरोबर घेऊन पंडिताच्या मायावी रक्तबंबाळ शिरासहित भामिनीकडे जावयास निघाला. इकडे भामिनी दुःखानं अगदींच विव्हळ झाली होती. तिला नजरकैदेच्या जागेंत उत्तररात्रींच्या वेळीं स्वप्नांत अकबर व भानुमती दिसत असत; ते तिला म्हणत कीं:– ' तूं दिरंगखानाला वश होऊं नकोस. पंडिताला अखेर पावेतों सोडूं नको. म्हणजे आम्ही या पिशाच्चयोनींतून मुक्त होऊं. नाहींपेक्षां आम्ही अधोगतीला जाऊं. " पिशाच्चांचीं अशीं भाषणें ऐकून भामिनी बिचारी कधीं कधीं स्वप्नांतून किंकाळया फोडून जागृत होत असे; आणि भ्रमिष्टासारखें करीत असे. असें होतां होतां दिरंगखानानें तिला गांठलें. तिचें दिव्य स्वरूप पाहून तो अगदीं भांबावून गेला व एकदम त्यानें पंडितांचें रक्तबंबाळ मायावी शिर तिला दाखविलें. तें पाहतांच तें शिर जवळ घेऊन एकाएकी ती मूर्छित पडली. अशा तिच्या स्थितींत दिरंगखानाला

स्वतःचा दुष्ट हेतू सिद्धीस न्यावयास अनायासेंच संधी सांपडली. तिचें सुरांगनेसहि लाजविणारें अलौकिक रूप पाहून आधींच तो गोंधळून गेला होता; त्यांत ॥ आधींच मर्कट तशांतहि मद्य प्याला ॥ या उक्तीप्रमाणें मांजत तो सुरापानाच्या निशेंत पूर्ण दंग असल्यामुळें त्याला कंपवायूचा जोरानें धक्का बसतांच तो कामवासनेच्या अतिरेकानें धाडकन् जमीनीवर पडला; परंतू तसाच फरफटत भामिनीला धरावयास जाऊं लागला; कारण, सुरापानाच्या निशेंत लथडून खालीं पडलेल्या माणसास मग एकाएकीं उठवत नाहीं; असे प्रकार पुष्कळ पाहावयास सांपडतात. जन्मांधाला जसें दिसत नाहीं तसेंच कामांधालाहि दिसत नाहीं, हें निर्विवाद होय. भामिनीची मूर्छा हळू हळू कमी होऊं लागतांच कामांध झालेला दिलेरखान तसाच फरफटत तिच्याजवळ येऊन तिला ओढणार अशांत भामिनीनें त्या दुरात्म्यास अनेक लत्ताप्रहार करून पायाखालीं तुडविलें व काठीनें यथेच्छ झोडपलें; त्यामुळें तो अति कष्टी होऊन तेथून हळूं हळूं चालता झाला. भामिनी पंडिताच्या शिराकडे पाहून अत्यंत शोकग्रस्त झाली व तें तिनें एका कपड्यांत गुंडाळून आपल्या जवळ जपून ठेवलें.

२९. **सो**मदेव हा एकटाच जंगलांतून फिरत असतांना डोंगरी किल्ल्याच्या आसपासच्या गांवीं त्याला हरदीक्षिताच्या कृष्णकारस्थानाची बातमी कळली. रामाचार्याचा ताबडतोब शोध काढून त्याला गांठावें आणि भामिनीची व तारेची नजरकैदेच्या जागेतून सुटका

करण्याची कांहीं युक्ति योजावी, असा त्याचा विचार होता. सोमदेवाला पुष्कळ शोधांतीं चंबळनदीच्या कांठीं रामाचार्य स्नानसंध्या करीत असतांना आढळले. उभयतांचा एक विचार होऊन त्यांनीं अगदीं हलक्या प्रतीच्या नोकरांचे वेष घेतले व रूपें बदलण्यासाठीं मुंडन करवून बोलण्याच्या चाली व आवाजही बदलले आणि डोंगरी किल्ल्यानजीक हरदीक्षित, दिरंगखान व रहीम यांच्या कटांत अगदीं नीच वृत्तीच्या नोकऱ्या पत्करल्या. रामाचार्यांनीं नजर कैदेच्या जागेंत भामिनीला अन्नपाणी पोंहचविण्याची आठवड्यांतून एक दिवसाची पाळी पत्करली; आणि सोमदेवाच्या वाटणीला तारेकडे अन्नपाणी पोंहचविण्याचें दररोजचें काम आल्यानें त्याला मोठा आनंद झाला; कारण, त्याला पाहिजे होतें तेंच काम मिळालें. याशिवाय त्या दोघांना झाडझूड करणें, भांडीं घासणें, अशीं हलकींहि कामें करावीं लागत असत. रामाचार्य व सोमदेव यांचें आपसांत असें ठरलें होतें कीं— रामाचार्यानें अचाट युक्ती योजून भामिनीस सोडवावें व सोमदेवानेंहि स्वतःच्या चातुर्यानें तारेला सोडवावें; त्यानंतर सर्वांनीं निरनिराळ्या मार्गानें काशीला जाऊन एकत्र व्हावें. पंडितांचें रक्तबंबाळ शिरकमळ पाहून भामिनी अतिशय शोकग्रस्त होऊन सहगमनाचा मार्ग शोधूं लागली. तिणें तें शिरकमळ स्वतःच्या जवळ संभाळून लपवून ठेविलें होतें. रामाचार्यांची अन्नपाणी पोंहचविण्याची पाळी ज्या ज्या वेळीं येई त्या त्या वेळीं रामाचार्याला तिची दुःखद स्थिति पाहावत नसे; कारण, याच रामाचार्यानें, तिचा बालशिक्षक या नात्यानें तिला

लहानपणापासून वाढवून, शिक्षण दिलें होतें. " हिला येथून आतां सोडविलेंच पाहिजे; मग त्या कामीं पंचप्राण खर्ची घालावे लागले तरी बेहत्तर आहे" असा निश्चय करून त्यानें पाळीच्या एका रात्रीं आपलें मूळ स्वरूप प्रकट केलें. भामिनीला पोटाशीं धरून तो ढसढसा रडला. भामिनी सुद्धां "आज प्रत्यक्ष माझे बाबा भेटले" असें तिला वाटून अत्यंत गहिवरली. पंडितांच्या शिरकमळाविषयीं रामाचार्याला मुळींच माहिती नव्हती; व भामिनीनें ती त्याला तूर्त कळविलीही नव्हती; कारण, ती कळविल्यानें आचार्याला अति दुःख होईल आणि तिची सुटका करण्याच्या कामीं पुष्कळ विलंब होईल;तसेंच दिरंगखान पुनः तेथें केव्हां येईल याचें प्रमाण नव्हतें असें तिला वाटलें. रामाचार्यानें तिच्या कंबरेला एक जाड दोरखंड बांधून तिला किल्ल्याच्या खालीं चंबळ नदीच्या वाळवंटांत मोठ्या गवाक्षद्वारानें संभाळून हळूं हळूं सोडून दिली आणि " आतां थेट काशीस जावें, तेथें मी पंडितरायांचा शोध लावून सत्वर येतो. " असें तिला निक्षून सांगितलें. तिला सोडल्या नंतर तेथें तिचा एक शालू चुकून राहिलेला त्याला दिसला तो त्यानें उचलून घेतला. तेथील द्वारपाळास रामाचार्यानें प्रथमपासूनच माजूम यथेच्छ चारल्यानें तो गुंगून प्रेतासारखा पडला होता. आतां अशा उत्तररात्रींच्या वेळीं थंडी वारा सहन करून किल्ल्याच्या खालीं जाण्यापेक्षां तेथेंच थोडा वेळ विश्रांती घेऊन पहांटेच्या वेळीं निघून जावें, असा त्यानें निश्चय करून तोच शालू पांघरून तेथेंच स्वस्थ पडून राहिला. कांहीं वेळानें उत्तररात्रींची उपाधिरहित शांत वेळ साधून दिरंगखानजी " आज काम-

वासना तृप्त करायचीच, मग कांहींहि होवो " असा निश्चय करून मदिरापानामुळ डोळे गरगरा फिरवीत हातांत मद्याची बाटली घेऊन तेथें आले; आणि शालू पांघरून निजलेल्या रामाचार्यास भामिनीच आहे असें समजून " आज ही परी शालू पांघरून निजली आहे, काय करील बिचारी ? पंडित गत झालेले पाहून निराश झाली असेल व माझीच वाट पाहात निद्रावश झाली असेल. " अशा प्रकारच्या मनोराज्यांत निमग्न होऊन मनांत मांडे खात शालू पांघरून निजलेल्या व्यक्तीकडे कामलोलुप दृष्टीनें पाहत होते;व तिला जागृत करून सुरा पाजावी किंवा कसें याचा विचार करीत होते.त्यांत "नेहमीं प्रमाणें आज आपल्याला कंप सुटत नाहीं"हें पाहून हे राजेश्री तर फारच खुष् झाले. रामाचार्याला झोंप मुळींच लागली नव्हती. तो या उल्लू भाईच्या माकडचेष्टा शालूंतून चोरून पाहतच होता. असें होतां होतां अखेर दिरंगखानानें अधीर होऊन शालू पांघरून निजलेल्या व्यक्तीला भामिनीच समजून एकदम कडकडून आवळलें. रामाचार्य खडबडून उठून उभा राहिला व त्यानें एक जोराचा लत्ताप्रहार दिरंगखानाला केल्यामुळें तो लथडून जमीनीवर पडला; व आश्चर्यचकित होऊन अत्यंत खजील झाला. लागलींच रामाचार्यानें त्याच्या हातांतली सुरेची बाटली घेऊन ती सबंद बाटली दिरंगखानाच्या नरडींत ओतून रिकामी करून फेकून दिली व त्याला लाथा बुक्क्यांचा चांगलाच मार देऊन "भामिनीविलास पाहिजे ! ताराविलास पाहिजे ! त्या ऐवजीं सुराविलासांचा उपभोग यथेच्छ घे " असें अनेक वेळां हिणवून किल्ल्याच्या खालीं

पलायन केलें. पलायन करतांना ज्या गवाक्षांतून त्यानें भामिनीला किल्ल्याच्या खालीं सोडलें, त्याच गवाक्षांतून भामिनीच्या राहिलेल्या शालूची गुंडाळी करून तो चंबळनदीच्या वाळवंटांत फेकून दिला. रामाचार्यानें किल्ल्याच्या खालीं येऊन थेट काशीचा रस्ता धरला. दिरंगखान बेशुद्ध पडला होता; त्याला सकाळीं सूर्योदयानंतर त्याचीं माणसें शोधीत आलीं व त्याला उचलून किल्ल्याखालीं घेऊन गेलीं. सोमदेवानेंहि पूर्वीं ठरल्याप्रमाणें संधि साधून तारेला पुरुषवेष देऊन त्या चांडाळ चौकडींतून मोठ्या चातुर्यानें सोडविलें व दोघेहि एकमत होऊन वेषांतरांतच निरनिराळ्या मार्गानें श्रीक्षेत्र काशीस रवाना झाले.

३६. पंडित जगन्नाथराय यांच्यावर कालमानाप्रमाणें देवीच्या मायामोहाचा चांगलाच पगडा बसला होता. ते रायमुंकुंदाकडून भामिनीच्या शोधार्थ एकटेच निघाले होते. प्रथम उदेपुरास जगत्सिंहाला भेटून नंतर श्रीक्षेत्रीं जावें असा त्यांचा मानस होता. हरदीक्षित हा त्यांच्यामागें हात धुऊन पाठीस लागलाच होता. कर्ममार्गाला अनुसरून पंडितरायांना जोरजुलुमानें प्रायश्चित द्यावें हाच त्याचा अंतिम हेतू होता; पंडितराय हे कर्ममार्गाची पायरी चढून ज्ञानमार्गाच्या पायरीवर गेले असल्यानें त्यांना हरदीक्षितांचें म्हणणें मान्य नव्हतें; श्रीगंगामाउलीस प्रसन्न करून यवनीसहीत मुक्त व्हावें हा त्यांचा अंतिम हेतू होता. भामिनीचें मायावी रक्तबंबाळ शिर हरदीक्षितानें स्वतःच्या जवळ ठेविलें होतें. पंडित कोणत्या मार्गानें जातात त्या मार्गाचा रोख

भरून वाटेंतच चंबळ नदीच्या कांठीं एका झाडाखालीं तें शिर ठेवून हरदीक्षित जवळच आसपास लपून फिरत होता. अशा परिस्थितींत पंडितराय भामिनीच्या शोधार्थ मार्गक्रमण करीत असतांना त्यांना भामिनीचा शालू वाळवंटांत अस्ताव्यस्त पडलेला सांपडला; त्यामुळें त्यांना भामिनीचा येथेंच कोठें आसपास शोध लागेल अशी आशा उत्पन्न झाली: डोंगरी किल्ल्यांतून रामाचार्यानें पळायन करितांना गवाक्षां-तून जो शालू भिरकावून दिला होता, तोच हा शालू वाऱ्याच्या सोसाट्यानें उडून तेथें पडला होता. निर्जन अरण्यांत माणसांची चाहूल नसल्यानें तो शालू तेथेंच रझळत पडून राहिला होता. शालू हातांत चटकन उचलून घेऊन पंडितराय तसेंच पुढें मोठ्या उत्सुकतेनें चालूं लागले; तोंच थोड्या अंतरावर त्यांना एका वृक्षांखालीं दिव्य तेजोमय गोळा दिसूं लागला आणि सन्निध येऊन त्यास निक्षून पाहतांच ते एकाएकी मूर्छित पडले. पंडित मूर्छित पडलेले पाहून हरदीक्षितानें लागलींच दिरंगखान व रहीम यांना घेऊन काशीस जाण्याचा विचार केला; कारण, तें शिरकमळ घेऊन पंडितराय आतां दुसरीकडे न जातां श्रीक्षेत्र काशीसच जातील असें त्याला वाटलें. पंडितरायाला दिसलेला हा दिव्य तेजोमय गोळा दुसरा कसला असणार ? तें भामिनीचें मायावी रक्तबंबाळ शिरकमळ हरदी-क्षितानें मुद्दाम ठेविलेलें होतें. अशा संकटकाळीं एक ८०–९० वर्षांची वृद्धस्त्री काठी टेकीत टेकीत तेथें आली व तिणें पंडितरायाला सावध केलें. पंडितराय मायामोहाच्या आवरणामुळें त्या वृद्धस्त्रीला पाहतांच

एखाद्या लहान अर्भकाप्रमाणें रूदन करूं लागले; व तिच्या चरणावर त्यांनीं मस्तक ठेविलें. ते म्हणाले:—" मातुश्री ! माझं रक्षण करा !" वृद्धस्त्री म्हणाली:— " बाबारे ! तुझ्या चर्येवरून तूं मोठा ज्ञानसंपन्न पुरूष दिसतोस; आणि एखाद्या प्राकृत माणसासारखा शोक करतोस हें मोठंच आश्चर्य होय ! तूं कोण आहेस ? हें शिरकमळ कुणाचं ? व तें तूं घेऊन जातोस तरी कुठें ? तें सांग. " पंडित दीनवाणीनें म्हणाले " या देहाला जगन्नाथ म्हणतात. मी एक साधारण मनुष्य आहे. हें शिरकमळ माझ्या अर्धांगीचं आहे. तें घेऊन आतां मी श्रीक्षेत्र काशीस श्रीगंगामाउलीच्या आश्रयाला जाणार व तेथें या माझ्या प्रियेला मंत्राग्नि देऊन तिचं और्ध्वदेहिक करणार. " वृद्धस्त्री म्हणाली:—" कोण ? जगन्नाथ ? अरेरे ! जगन्नाथ पंडित असं तुझं नांव सर्वत्र गाजत असलेलं मी ऐकते. तोच कां तूं ? तुला द्रव्याचा, बुद्धीचा आणि स्त्रीरत्नाचा केवढा अहंकार ? आणि तो तूं आज दिवंगत झालेल्या स्त्रीसाठीं असा रुदन करतोस ? तेंच कां तुझं हें स्त्रीरत्न ? " पंडित म्हणाले, "नाहीं, नाहीं, नाहीं, मी पंडित नाहीं, पंडित असतों तर अशी दशा कां झाली असती ? माझा सर्व गर्व नष्ट झाला. मातुश्री क्षमा करा ! मला आशीर्वाद द्या. आजीबाई ! अशा निर्जन प्रदेशांत आपण कुणाच्या आश्रयानं राहतां ? " वृद्ध-स्त्री म्हणाली:—" त्या डोंगराच्या पायथ्याशीं माझी पर्णकुटिका आहे, तेथें मी व माझे चार पुत्र अशीं पांच माणसें राहात आहोंत. माझे चार पुत्र चार दिशेला धर्मोपदेशाच्या कामासाठीं दररोज सकाळीं

जातात व सायंकाळीं परत येतात. तूं मोठा भाग्यशाली पुरूष दिसतोस. तुझा हेतू स्तुत्य आहे. तुझ्या निश्चयाप्रमाणें तूं श्रीक्षेत्र काशीस जा, म्हणजे आजपासून एक मासानंतर श्रीगंगामाउलीच्या कृपेनें तुझी कार्यसिद्धि होईल. " असा आशीर्वाद देऊन ती वृद्धस्त्री जवळच्याच एका झाडींत शिरली व अदृश्य झाली. ही वृद्धस्त्री दुसरी कुणी नसून प्रत्यक्ष बालात्रिपुरसुंदरीच होय. तिणें जे चार पुत्र सांगितले ते चार वेद होत. मायावी शिरकमळें व मायामोह यांची मुदत, तीन मासापैकीं दोन मास व्यतीत होऊन फक्त एकच मास राहिली होती; म्हणून तसा आशीर्वाद पंडितरायांस देऊन ती गुप्त झाली. त्या वृद्धस्त्रीच्या मागोमाग जाऊन पंडितरायानें तिचा पुष्कळ शोध केला; पण ती साक्षात् भगवतीच; तिचा शोध लागावा कसा ? तिची लीला अगाध आहे. पंडितरायांनीं भामिनीचें शिरकमळ एका मोठ्या वस्त्रांत चहूंकडून चांगलें गुंडाळून घेतलें व तें मस्तकावर ठेवून अत्यंत शोकग्रस्त स्थितींत मार्गक्रमण करूं लागले. वाटेनें त्यांना एक मोठा पाण्याचा झरा लागला, तेथें कांहीं वेळ विश्रान्ति घेण्याच्या हेतूनें ते थांबले, परंतु मनाच्या अस्वास्थ्यामुळें त्यांना विश्रान्ति मिळाली नाहीं. श्लोकः—" ॥ संबोधुनी रमण ! नाथ ! अशा पदांहीं ॥ स्वर्गासमान मज भासविली धरा हीं ॥ स्वर्गस्थ होउनि इथें मज आजि काय ॥ धूळींत लोळविसि मानिनि हाय ! हाय ! ॥१॥ " ( भा. वि. करुण. श्लोक १२ चें भाषांतर ). अशा प्रकारचे दुःखोद्गार काढीत पंडितराय पुढें गेले.

३७. रामाचार्यानें भामिनीला डोंगरी किल्ल्यांतून विदक्ष

चातुर्यानें सोडविल्यानंतर ती पंडितांचें मायावी शिरकमळ वस्त्रांत गुंडाळून घेऊन चंबळ नदीच्या कांठाकांठानें मोठ्या धैर्यानें मार्गक्रमण करूं लागली. जरी ती महद्दुःखानें पोळली होती, तरी पण पंडितांचें शिरकमळ स्वाधीन झाल्यामुळें तिला समाधान वाटून तिणें तेवढ्यापुरतें तरी दिरंगखानाचे आभारच मानले; कारण, शिरकमळ स्वाधीन झाल्यानें तिला सहगमनाचा मार्ग मोकळा झाला. चंबळनदीच्या कांठावरच चिता रचून सहगमन करावें असा तिणें बेत केला होता; परंतु रामाचार्यांच्या आज्ञेचें तिला एकाएकी स्मरण झाल्यामुळें 'आतां असेंच श्रीक्षेत्रकाशीस जाऊन श्रीगंगामाउलीच्या पवित्र तीरावरच सहगमन करून मुक्त व्हावें' असें तिणें ठरविलें; व ती पुढें मार्गक्रमण करूं लागली. रहीम व दिरंगखान यांनीं तिचा पुष्कळ शोध केला, पण ती अगदीं गरीब जोगिणीच्या वेषानें जनसंपर्कापासून अगदीं दूर राहून थेट काशीस जाऊन पोंहचली; म्हणून त्यांना तिचा शोध लागला नाहीं. रहीम व दिरंगखान यांनीं हरदीक्षितास गांठून सर्व वृत्त कळविलें. हरदीक्षितास मात्र पंडितराय काशीस जाऊन पोंहचल्याचें चांगलें समजलें होतें; म्हणून या त्रिवर्गांनीं काशीस जाऊन पंडितास छळण्याचें ठरविलें; व त्याप्रमाणें तेहि काशीस जाऊन पोंहचले.

३८. पंडितराय श्रीक्षेत्रकाशीला जात असतांना वाटेंत त्यांना एक वृद्ध मनुष्य एका तरुण मुलास घेऊन जातांना आढळला. उभयतांच्या संभाषणांत त्या वृद्ध मनुष्यानें पंडितरायांस कळविलें कीं— "आपले वडील पेरुभट्ट पुष्कळ दिवसांपूर्वीं मुंगुंडा गांवीं निवर्तले.

आपला पुत्र विनायक ( प्रथम पत्नीचा ) हा रामचंद्र नांवाचा मुलगा मागें ठेवून परलोकवासी झाला आणि कांहीं दिवसानंतर आपली सूनही दिवंगत झाली. या मुलाला आतां सांभाळावें. याला आपल्यावाचून कोणी नाहीं. आम्ही दिल्लीहून आपला शोध घेत घेत चाललों होतों, तों वाटेंत आपण श्रीक्षेत्रकाशीस गेल्याचें समजलें; म्हणून आम्ही श्रीक्षेत्रीं जात होतो. " पंडितरायांनीं घराकडील हकीकत शांतपणानें ऐकून घेतली; मनाचा स्वाभाविक उद्वेग आवरून त्यांनीं नातवाला जवळ घेतलें. परंतु पुत्रशोकच तो ! त्यासारखें दुसरें दुःखच नाहीं, तो कांहीं केल्यानें आवरेना ! पंडितरायांचे त्या वेळचे स्वाभाविक दुःखोद्गार येणेंप्रमाणें होते:—" ॥ अपहाय सकलबांधवचिंतामुद्वास्य गुरुकुलप्रणयम् ॥ हा तनय विनयशालिन्कथमिव परलोकपथिकोऽभूः ॥ १ ॥" ( रसगंगाधर. करुणप्रकरण. पृष्ठ ३९ ). त्यानंतर ते तसेंच पुढें मार्गक्रमण करून कांहीं दिवसांनीं श्रीक्षेत्रकाशीस येऊन पोंहचले. श्रीगंगामाउलीच्या पवित्र तीरावर भामिनीच्या शिराला मंत्राग्नि देऊन दहन करावें व एकाग्रवृत्तीनें श्रीगंगेचें स्नान, पान आणि ध्यान करावें, असा त्यांचा विचार ठरला. रामाचार्य श्रीक्षेत्रकाशीस पोंहचल्यावर नित्य श्रीकाशीविश्वेश्वराचें दर्शन आणि मनकर्णिकाघाटावर श्रीगंगेचें स्नानपान व ध्यान घडल्याशिवाय अन्नपाणी ग्रहण करीत नसे. अहोरात्र श्रीगंगेचें मंगलदायक दर्शन घडावें म्हणून रामाचार्यानें आत्मवीरेश्वराच्या घाटानजीक श्रीगंगाकिनाऱ्यावरच एका झोंपडींत मुक्काम ठेविला होता; आणि पंडित श्रेष्ठ जगन्नाथराय यांचें दर्शन सत्वर

व्हाव म्हणून तो सदैव श्रीगंगेची प्रार्थना करीत होता. एके दिवशीं मध्यान्हकाळीं श्रीगंगेवर नित्यान्हिक करीत असतांना कोणी एक सत्पुरूष श्रीगंगेच्या कांठीं चिता रचीत आहे असें रामाचार्यानें दुरून पाहिलें. त्या सत्पुरुषाचें दर्शन त्याला घ्यावेंसें वाटल्यामुळें नित्यान्हिक लवकर आटोपून तो तिकडे गेला व विशेष कोणतीहि विचारपुस न करितां त्यानें त्या सत्पुरुषाचे चरणावर मस्तक ठेविलें. उभयतांनीं एक-मेकास ओळखल्यानंतर रामाचार्यानें साग्र हकीकत पंडितरायांना कळ-विली. पंडितरायांनीं स्वतःच्या हकीकतींत भामिनीच निधनवृत्त कळवि-तांच रामाचार्यास अत्यंत दुःख झालें; त्यांतच तिच्या शिरास दहन व्हावयाच्या ऐन वेळीं येऊन पोंहचल्याबद्दल त्याला कांहीसें समाधान वा-टलें. सर्व चिता रचून तयार झाल्यानंतर जखडून गुंडाळलेलें शिर सोडण्या-पूर्वीं पंडितराय व रामाचार्य यांच्या नेत्रांतुन अश्रुधारा वाहूं लागल्या. गाठोडें सोडतांना पूर्वींपेक्षां तें हाताला अगदींच हलकें लागूं लाग-ल्यानें पंडितरायांना मोठी शंका उत्पन्न झाली. सर्व वेष्टनें मोकळीं केल्यानंतर आंत भामिनीचें शिर नाहिस झालेलें पाहून सर्वांना महदा-श्चर्य वाटलें. या अद्भुत चमत्काराची कोणाला कसलीच कल्पना करितां येईना; लवकरच त्यांनीं रचलेल्या चितेचा पसारा आवरून टाकला. रामाचार्य पंडितरायास त्यांच्या नातवासह स्वतःच्या झोंपडींत घेऊन गेला. पंडितराय आत्मवीरेश्वराच्या घाटावर गंगामाउलीची सेवा करून तेथें कालक्रमण करूं लागले. हरदीक्षितानें काशीसमुद्धां पंडित-रायास अनेक रीतींनें त्रास देण्याचा क्रम चालुच ठेविला होता.

३९. जोगिणीच्या वेषानें भामिनी काशीस येऊन पोंहच-ल्यावर तिणें श्रीगंगामाउलीच्या पवित्र किनाऱ्यावर एकांतस्थळीं सहगमनाची सिद्धता केली. तेथेंच सोमदेव व तारा अकल्पित येऊन पोंहचले. परंतु तेथें सुद्धां ऐनवेळीं पंडितांचें मायावी शिर अदृश्य झाल्यामुळें त्या सर्वांना महदाश्चर्य वाटलें; व त्या संबंधांत कोणाला कसलीच कल्पना करितां आली नाहीं. दिरंगखान व रहीम यांस तारा व सोमदेव काशीस येऊन पोंहचल्याची बातमी लागतांच त्यांनीं उभयतांस छळण्याचें काम चालू केलें होतेंच; त्यांत भामिनी काशीस येऊन पोंहचल्याचें कळतांच तर छळण्याच्या त्यांच्या कामांत अधिक भर पडली. छिन्नमस्ता देवीनें पंडितराय व भामिनी यांच्या मायावी शिरासंबंधांत दिलेली तीन मासाची मुदत संपून गेली होती; म्हणूनच शिरकमलें मुदत संपतांच अदृश्य झालीं; आणि लागलींच पंडितराय व भामिनी यांचेवरील मायामोहाचें पटलहि नाहींसें झालें होतें. सांप्रत उभयतांची वृत्ति अंतर्बाह्य गंगामय झाली होती. शिरकमळें मायावी असलीं पाहिजेत व तीं अदृश्य कशीं झालीं, या संबंधांत हें सर्व हर-दीक्षिताच्याच मंत्रसामर्थ्याचें कपट असलें पाहिजे; असें त्यांनीं ज्ञान-दृष्टीनें ताडलें. पंडितरायाला असें वाटूं लागलें कीं—भामिनी ही काशी-क्षेत्रांतच कोठें तरी आपला शोध करीत असली पाहिजे; आणि भामि-नीला सुद्धां पंडितरायासंबंधांत तसेंच वाटूं लागणें हें अगदीं स्वाभाविक होय. हरदीक्षित, दिरंगखान व रहीम यांना पंडितरायाला व भामिनीला छळण्याच्या कामीं या वेळ पावेतों मुळींच यश आलें नाहीं. मात्र त्या

थोर विभूतींना गर्वाचें खंडन होई पावेतों मायामोहाच्या क्षणिक पटला-मुळें एखाद्या साधारण प्राकृत माणसाप्रमाणें अत्यंत त्रास सोसावा लागला इतकेंच. हरदीक्षित, दिरंगखान व रहीम यांनासुद्धां पंडितराय व भामिनी या दंपतींत काहीं तरी अलौकिक प्रकार असला पाहिजे अशी कल्पना हळूं हळूं येत चालली होती. तरी पण त्यांनीं अखेरपावेतों या थोर विभूतीस त्रास देण्याचें कमी केलें नव्हतें. एके दिवशीं सोमदेव, तारा व भामिनी असे त्रिवर्ग श्रीगंगेच्या कांठाकांठानें देवदर्शनें घेत व पंडित-रायांचा शोध करीत फिरत फिरत आत्मवीरेश्वराच्या घाटापावेतों येऊन पोंहचले; आणि लागलींच भामिनीचा वामनेत्र स्फुरण पावूं लागला. या शुभशकुनाप्रमाणें जवळच असलेल्या रामाचार्यांच्या झोंपडींत सर्वांच्या भेटी झाल्या. मथुरेहून रायमुकुंद व चंद्रिका काशीक्षेत्रीं येऊन पोंहचले व तेथें सर्व एकत्र जमल्यामुळें त्या सर्वांना महदानंद झाला.

४०. **सां**प्रत पंडितराय व भामिनी ( यवनी ) यांची वृत्ति विरक्त असून त्यांचीं अंतःकरणें गंगामय झालेलीं होतीं. त्या उभय-तांनीं कांहींकाळपावेतों श्रीगंगेची भक्ति वायू भक्षण करून एकनिष्ठेनें केली; त्यानंतर ज्येष्ठ शु. १ पासून श्रीक्षेत्रीं श्रीगंगेच्या मोठ्या उत्सवास प्रारंभ झाला. त्या दिवसांत आत्मवीरेश्वराचे घाटावर बसून श्रीगंगास्त-वाचीं पारायणें एकाग्रवृत्तीनें करण्याचें त्यांनीं ठरविलें. या दशहरांत श्रीगंगेचें स्नान, पान व ध्यान हीं केलीं असतां दशविध पातकांचा नाश होतो; म्हणून ज्येष्ठ शु. १ पासून शु. १० पावेतोंच्या दिव-

सांना दशहरा अशी संज्ञा आहे. ॥ अदत्तानामुपादानं हिंसा चैवा विधानतः ॥ परदारोपसेवा च कायिकं त्रिविधं स्मृतम् ॥ पारुष्यमनृतं चैव पशुन्यं चापि सर्वशः ॥ असंबद्धप्रलापश्च वाङ्मयं स्याच्चतुर्विधम् ॥ परद्रव्येष्वभिध्यानं मनसानिष्टचिंतनम् ॥ वितथाभिनिवेशश्च मानसं त्रिविधं स्मृतम् ॥ हीं दशविध पातकें येणेंप्रमाणें:—कायिक तीन प्रकारचीं:—१ दिल्यावाचून वस्तू घेणें. २ शास्त्राज्ञेवाचून हिंसा करणें. ३ परस्त्रीगमन. वाचिक चार प्रकारचीं:—१ कठोर बोलणें. २ खोटें बोलणें. ३ चाहाडी सांगणें. ४ असंबद्ध बोलणें; आणि मानसिक तीन प्रकारचीं:—१ परद्रव्य हरण करण्याचा विचार. २ दुसऱ्याचें वाईट इच्छिणें. ३ एखाद्या वस्तूविषयीं खोटा आग्रह धरणें. या ज्येष्ठ शु. १० चे दहायोग सांगितले आहेत; ते असे:—१ ज्येष्ठ मास. २ शुक्लपक्ष. ३ दशमी तिथी. ४ बुधवार. ५ हस्तनक्षत्र. ६ व्यतीपात. ७ गरकरण. ८ आनंदयोग. ९ कन्येचा चंद्र. १० वृषभेचा रवि. बुधवार व हस्तनक्षत्र यांचा जो योग,त्यास आनंद योग म्हणतात. ह्या दहा योगामध्यें दशमी आणि व्यतीपात हे दोन योग मुख्य आहेत. अशा सर्वोत्तम योगांत प्रथम दशाश्वमेध तीर्थांत स्नान करून *आत्मवीरेश्वराचे घाटावर ज्येष्ठ शु. १ स जावें आणि शु. १० पावेतों अहोरात्र श्रीगंगामातेला उद्देशून स्वतःरचिलेल्या गंगास्तवाचीं ( पीयूषलहरीचीं )

* आत्मवीरेश्वराचा घाट पुस्तककर्त्यानें स्वतः पाहून त्यास बावन्न पायऱ्या असल्याची खात्री करून घेतली आहे. या घाटाला कोणी कोणी जगन्नाथ पंडिताचा घाट असें अद्यापि म्हणत आहेत.

पारायणें करावींत, असें पंडित जगन्नाथराय व भामिनी ( यवनी ) यांनीं निश्चित केलें.

४१. ज्येष्ठ शु. १ ला सूर्योदयापूर्वीं पंडितराय व भामिनी ( यवनी ) आत्मवीरेश्वराच्या घाटाजवळ मोकळ्या जागेंत ऊर्ध्वमुख एकाग्रवृत्तीनें श्रीगंगामातेचें ध्यान करीत पडून राहिले होते. अशांत अप्पय्यादीक्षित नित्यान्हिक उरकून एका बटूचा हात धरून परत मुक्कामीं चालले होते. घाट चढून वर येतांच " कोणी ब्राह्मण यवनी सहित घाटाजवळ पडून राहिला आहे " असें बटूनें त्यांना कळविलें. त्यास उद्देशून अप्पय्यादीक्षित म्हणाले " ॥ किं निःशंकं शेषे शेषे वयसि त्वमागते मृत्यौ ॥ ( भा. वि. शां. श्लो. ३० ). हा श्लोकार्ध कानीं पडतांच पंडितराय यवनीसह उठून बसले आणि अप्पय्यादीक्षितास ओळखून त्यांच्या चरणावर त्यांनीं मस्तक ठेविलें. पंडितरायास ओळखून अप्पय्यादीक्षित म्हणालेः—॥ अथवा सुखं शयीथाः निकटे जागर्ति जान्हवी भवतः ॥ ( भा. वि. शां श्लो. ३० ). पंडितराय म्हणालेः—" क्षमा करा, पूर्व वयांत मी आपल्याला गर्वोक्तीनें " दीर्घश्रवसो लंबकर्णस्य द्रविडस्याप्पदीक्षितस्य " वगैरे म्हणून आपली पुष्कळ निंदा केली; त्याचा मला आतां पश्चात्ताप होत आहे. आपण साक्षात् श्रीशंकराचा अवतार आहांत. आपण सांप्रत मला उद्देशून जो श्लोक म्हणालांत त्याचा उल्लेख "भामिनीविलास" नांवाच्या माझ्या ग्रंथांत करण्याचें मी योजिलें आहे; मात्र तें आपण मोकळ्या मनानें सत्य बोलशांत किंवा कसें ?

तेवढें या दासाला सांगून क्षमा करा." त्यानंतर अप्पय्यादीक्षित म्हणाले:—"जगन्नाथा! तुझें वय हल्लीं ९२ वर्षांचें आणि माझें ९८ वर्षांचें आहे. आतां वर्मी बोलण्याचे दिवस राहिले नाहींत; आतां अवतार कृत्य संपण्याचा समय आला आहे. तूं खरोखर अंतर्निष्ठ सिद्धपुरुष आहेस आणि ही यवनीसुद्धां अंशभूत केवळ तुझ्या साठींच अवतरली आहे. आतां तुम्ही श्रीगंगेची प्रार्थना करा म्हणजे तुमचा उभयतांचा उद्धार होईल." याप्रमाणें त्यांना संबोधून व आशीर्वाद देऊन अप्पय्यादीक्षित बटूचा हात धरून मुक्कामीं गेले. त्यानंतर पंडितराय व यवनी यांनीं श्रीगंगाप्रवाहांत स्नान केलें आणि आत्मवीरेश्वराच्या घाटावर बसून श्रीगंगेची काव्यरूपानें स्तुति करण्यास प्रारंभ केला. याप्रमाणें नऊ दिवस स्वतः रचलेल्या पीयूषलहरीचीं (गंगास्तव, गंगालहरी) अहोरात्र ९०० पारायणें केलीं. पंडितरायांचीं रामाचार्य वगैरे अनुयायी मंडळी त्यांचेच सन्निध श्रीगंगेचें स्नान, पान व ध्यान करून त्यांच्या सेवेंत तत्पर राहत होतीं. नववे दिवशीं दिल्लीहून शाहजहां बादशाहाकडून दाराशुको व उदेपुरचा जगतसिंह हे बहुमानाचा पोषाक व गुरुदक्षिणा घेऊन आले; परंतु पंडितरायांची अंतर्बाह्य वृत्ति श्रीगंगामय झाली असल्याकारणानें त्यांनीं तो सर्व बहुमान वगैरे 'श्रीगंगामाउलीस अर्पण करावा, अशी त्यांची आज्ञा झाल्यावरून तो सर्व बहुमान गुरुदक्षिणा वगैरे श्रीगंगार्पण करण्यांत आला. दाराशुको याच्या बरोबर बादशाहाचा असा निरोप होता कीं—" पंडितरायांनीं दिल्लीस पुनः यावें, म्हणजे मोठमोठ्या विद्वान मंडळीची एक टोलेजंग जाहीर-

सभा भरवून पंडितरायांना यवनीसह पावन करून घेण्याचा ठराव करूं."
परंतु पंडितरायांची श्रीगंगेच्या ठायीं तल्लीन वृत्ति झाल्यानें कांहींच उत्तर न देतां फक्त त्यांनीं आशीर्वाद दिला. हरदीक्षित, दिरंगखान व रहीम यांना ही बातमी समजतांच ते व दुसरी कांहीं ब्राह्मणमंडळी आत्मवीरेश्वराच्या घाटावर धांवून आलीं व त्यांनीं ठरविलेल्या या पतित-दंपतीला आतां कोणत्या रीतीनें छळावें याचा विचार करूं लागलीं. पंडितराय व यवनी यांना कर्मठ अशा ब्राह्मण समाजानें पतित ठरविलें होतें हें खरें, परंतु ते ज्ञानदृष्टीनें स्वतःला पतित असें मुळींच समजत नव्हते; तपोबळानें त्या उभयतांचें तेज हल्लीं इतकें वाढलें होतें कीं त्यांच्याकडे अवलोकन करणारांचे नेत्र दिपून जात होते. नवव्या दिवशीं रात्रौ पंडितरायांनीं स्वतःचा नातू रामचंद्र यांस बोध केला व त्याला त्याच्या इच्छेनें लिहिलेलें **अश्वधाटीकाव्य** अर्पण करून जगतसिंहास त्याचा प्रतिपाळ करण्यास आज्ञा केली. रामाचार्य व सोमदेव यांना पंडितरायांनीं स्वतः रचलेले **रसगंगाधर, भामिनीविलासादि** सर्व ग्रंथ सोंपून दिले. **रसगंगाधर** ग्रंथ अपूर्ण राहिला तो अद्याप तसाच आहे. तो पूर्ण करण्यास अद्याप कोणीहि विद्वान समर्थ होऊन पुढें आलेला दिसत नाहीं. पंडितरायांनीं यवनीसह आत्मवीरेश्वराच्या घाटावर बसून ज्येष्ठ शु. १० च्या दिवशीं सूर्योदयापूर्वीं श्रीगंगेचें ध्यान करण्यास प्रारंभ केला. या दशहाराच्या १० व्या दिवशीं त्यांच्या **पीयूषलहरी** काव्याचीं उरलेलीं १०० म्हणजे एकूण १००० पारायणें संपूर्ण झालीं होतीं.

४२. **पंडितरायांचें** ध्यान संपतांच श्रीगंगाप्रवाहांत स्नान कर-

ण्यासाठीं ते यवनीसहित घाट उतरूं लागले. हरदीक्षित, दिरंगखान व रहीम हे पंडितांच्या पाळतीवर त्यांना त्रास देण्यासाठीं टपून बसलेच होते. घाट उतरू लागतांच हरदीक्षितानें पंडितास अडविलें व स्पष्ट सांगितलें कीं:—"अरे अधमाधमा ! तू चाललास कुठें ? नीचा, तूं पतित आहेस. दशहराच्या आजच्या या महापर्वणीच्या दिवशीं तूं, तुझी ही यवनी आणि अनुयायी भ्रष्ट मंडळी घेऊन घाट उतरतोस त्यामुळें स्पर्शास्पर्शाच्या योगानें सर्वत्र भ्रष्टाकार होऊन यात्रेकरूस व श्रीगंगेस विटाळ होईल." हरदीक्षिताचे हे क्रोधाचे व नीचवृत्तीचे उद्गार दिल्लीहून आलेले दाराशुको वगैरे मंडळीस सहन न होऊन ते सर्व एकदम तरवारी उपसून हरदीक्षितावर चालून जाऊं लागले; हें पाहून पंडितराय म्हणाले—: "अरेरे ! असें करूं नका; त्या बिचाऱ्यांचा कांहीं दोष नाहीं. त्यांना श्रीगंगेचा महिमा काय माहीत? त्यांची इच्छा नसेल तर आम्ही परत घाट चढून जाऊ व तेथेंच बसून श्रीगंगा-माउलीच्या स्तुतीचें पारायण करूं." असें म्हणून पंडितराय यवनीसह परत घाट चढून गेले आणि दाराशुको वगैरे मंडळींनीं आपआपल्या तरवारी पुनः ठिकाणीं ठेविल्या. पंडित जगन्नाथराय यांनीं आत्मवीरेश्व-राच्या घाटावर बसून स्वतः रचलेल्या श्रीपीयूषलहरी ( गंगालहरी ) काव्याचें पारायण करण्यास प्रारंभ केला. या अवनीतलावरील शोक संतापाचा नाश करणारी आणि अखिल जगताला पावन करणारी मातुश्री गंगाबाई, परमभक्त जगन्नाथराय यांची एक निष्ठा व एकाग्रवृत्ति अव-लोकन करून सद्गदित झाली आणि पुत्रवत् मानलेल्या पंडित जगन्नाथ-

रायमहाकवि यांना भेटण्यासाठीं तिच्या लहरी वेगानें उसळूं लागून त्या पवित्र काव्याचा प्रथम श्लोक संपूर्ण होतांच श्रीगंगाबाईचें पवित्रोदक एक पायरी वर चढलें. आत्मवीरेश्वराच्या घाटाला बावन्न पायऱ्या आहेत; व याच घाटाला जगन्नाथ पंडिताचा घाट असें कोणी कोणी अद्यापि म्हणत आहेत त्याप्रमाणें श्लोक संपूर्ण होतांच पवित्रोदक एक एक पायरी वर चढूं लागलें. हरदीक्षित, दिरंगखान व रहीम यांना हा अलौकिक चमत्कार पाहून पूर्ण पश्चात्ताप झाला; पंडितराय व यवनी (भामिनी) ह्या साधारण व्यक्ती नसून अवतारी थोर विभूतीच आहेत, अशी त्यांची पूर्ण खात्री होतांच संमोहातिरेकानें त्यांना मूर्छा येऊन ते त्रिवर्ग धरणीवर निचेष्टित पडले. रामाचार्यप्रभृति पंडितरायांच्या अनुयायी मंडळींना त्या त्रिवर्गाची दया आली; आणि त्यांनी त्रिवर्गावर गंगोदक सिंचन करतांच ते सावध होऊं लागले. पूर्ण शुद्धीवर आल्यानंतर पंडितराय व यवनी विराजमान झाले होते, तेथें ते गेले आणि उभयतांच्या पवित्र चरणावर त्यांनीं आपआपलीं मस्तकें ठेविलीं. हरदीक्षितानें सर्व अपराधांची परिस्फुटता करून क्षमा मागितली. दिरंगखान व रहीम यांनीं यवनीला मातुश्री म्हणून व "राम व रहीम" यांत भेद नाहीं, असा मोठ्यानें जयघोष करून क्षमा मागितली. रामाचार्यानें त्रिवर्गाला श्रीगंगेचें स्नान घालून पंडितरायाजवळ आणिलें. पंडितराय व यवनी यांनीं कृपावंत होऊन त्या त्रिवर्गाच्या मस्तकांवर वरदहस्त ठेविले आणि त्यांचे सर्व अपराध क्षमा केले. श्रीगंगेचें पवित्रोदक आत्मवीरेश्वराच्या घाटालाच पायरी पायरीनें चढत चाललें होतें. हा अलौकिक

चमत्कार पाहून ब्रम्हवृंदांचा " महदाश्चर्य ! महदाश्चर्य ! महदाश्चर्य ! पंडितजगन्नाथराय महाकविजोंकी जय ! श्रीगंगामाउलीकी जय ! " याप्रमाणें एकसारखा जयघोष चालू होता. पीयूषलहरीच्या प्रत्येक श्लोकास एक पायरी, याप्रमाणें बावन्नाव्या पायरीवर पाणी चढतांच पंडितरायांनीं बावन्न श्लोक संपूर्ण केले; आणि श्रीगंगेच्या पवित्रोदकाचा त्यांच्या पायाला स्पर्श होतांच वंदन करून व यवनीचा हात धरून पंडितराय उठून उभे राहिले आणि लागलींच उभयतांचे गुडघे पाण्यांत बुडाले. श्रीगंगेचें पवित्रोदक स्थिर होतांच पंडित जगन्नाथराय म्हणाले:— ("पद्य राग भूप. झंपा. )॥ त्वरें धांव तूं धांव गे माय गंगे ॥ दुरितनगनिरसनोद्यततरंगे ॥ ध्रु० ॥ पातकें नाशिसी क्षितिवरी प्रकटुनि ॥ कृतसकलसाधुवृंदार्तिभंगे ॥ अवनितलशोकसंताप हरि सुरधुनि ॥ भूषितानंगरिपुउत्तमांगे ॥ १ ॥ "

त्यानंतर गंगालहरी ( पीयूषलहरी ) काव्याच्या ४८ व्या श्लोकांत वर्णन केल्याप्रमाणें श्रीगंगेच्या सगुण स्वरूपाचें उभयतांनीं एकाग्रवृत्तीनें ध्यान केलें. ध्यानांत सुप्रसन्न अशा श्रीगंगामाउलीनें स्वतःचा वज्रचुडेमंडित उजवा कर प्रवाहांतून वर केला आहे, असें पंडितरायाला दिसलें. पंडितराय म्हणाले:—" हे जननी ! आज तूं माझ्या उद्धारार्थ अवतरलीस यामुळें मी लोकत्रयीं कृतार्थ झालो. आतां प्रार्थना इतकीच करतो कीं मला तूं आपल्या सन्निध घ्यावयास जसा एक हात वर केलास तसाच दुसरा हात वर कर व ही माझी अर्धाङ्गी यवन—देहधारी आहे, इचाहि मजबरोबर उद्धार कर. " त्या-

नंतर लागलींच यवनीनें श्रीगंगामाउलीची प्रार्थना केली ती येणें प्रमाणें:—
" ॥ सुरधुनि नृपकन्ये पुण्यवंतं पुनासि ॥ स तरति निजपुण्यैः तत्र किं ते महत्वम् ॥ नृपवरकुलजातां (भूतां) यावनीं मां पुनासि ॥ तदिह तव महत्वं तन्महत्वं महत्वम् ॥ १ ॥ याप्रमाणें उभयतांची एकाग्रता अवलोकन करून श्रीगंगामाउलीनें उभयतांना सगुण रूपानें दर्शन दिलें; म्हणजे गंगालहरी ( पीयूषलहरी ) काव्याच्या ४८ व्या श्लोकांत पंडितरायांनीं वर्णन केल्याप्रमाणेंच श्रीगंगेच्या पवित्रोदकांतून श्रीगंगामाउलीनें स्वतःचें सगुण स्वरूप साग्र प्रकट करून त्या उभयतांना दिव्यदर्शन दिलें व लागलींच ॥ नीमे दरूं नीमे बरूं ॥ म्हणजे अर्धी ( पाण्याच्या ) आंत व अर्धी ( पाण्याच्या ) बाहेर सगुण स्वरूपांतच दिसूं लागली. अशा स्थितींत श्रीगंगामाउलीच्या सन्निध अप्पय्या दीक्षितहि श्रीशंकराच्या स्वरूपांत दिसले. यावरून अप्पय्या दीक्षित हे श्रीशंकराचे अंशभूत आहेत, असें जें पंडितरायांनीं पूर्वी ऐकिलें होतें, त्याची साक्ष त्यांना या वेळीं तंतोतंत पटली. श्रीगंगामाउलीचें सगुण स्वरूप पंडितराय, यवनी, अप्पय्यादीक्षित वगैरे जे जे ज्ञानदृष्टीचे श्रद्धावान तेथें होते त्यांनाच दिसलें. श्रीगंगामाउलीनें स्वतःच्या एका स्कंदावर पंडित जगन्नाथराय यांस व दुसऱ्या स्कंदावर यवनीस घेतलें असें वर्णन आहे. अप्पय्यादीक्षितांनीं श्रीगंगेचें सगुण स्वरूप प्रकट होतांच साष्टांग नमस्कार घातला; त्यावरून इतरांनीं श्रीगंगेला साष्टांग नमस्कार घातले. त्यानंतर अप्पय्यादीक्षित यांनीं जें भाषण केलें, त्यांतील तात्पर्य येणें प्रमाणें:—

" पंडित जगन्नाथराय महाकवि आणि यवनी ( भामिनी ) यांना श्रीगंगेनें प्रत्यक्ष दर्शन देऊन स्वतःच्या दिव्य ज्योतींत ज्योति मिळविण्यासाठीं स्वतःच्या स्कंदावर घेतलें आहे. अशा रीतीनें ते मुक्त होणार हें उघड आहे. श्रीगंगामाउलीच्या प्रेरणेनें व आज्ञेनें मी आज तुम्हांस जें सांगत आहे, तें सावधान ऐकून घेऊन त्याप्रमाणें वागावें. पंडित जगन्नाथराय हे पूर्वजन्मीं मोठे योगी असुन परमहंसवृत्तीनें राहत होते. पूर्वसंचितानुसार कांहीं भोक्तृत्व अवशिष्ट राहिलें, म्हणून जन्मास येऊन लौकिक दृष्टीनें हें अवतारकृत्य संपवून अंतीं मुक्त झाले. यवनी ( भामिनी उर्फ लवंगी ) ही पूर्वजन्मीं अप्सरा होती; शापामुळें तिचा अस्त होऊन मृत्युलोकीं अवतरली व पंडित जगन्नाथराय यांची प्रथमस्त्री झाली. ही प्राणोत्क्रमणसमयीं पंडित जगन्नाथराय यांचे विषयीं वासनावश झाल्यानें यवनकुलांत जन्मास आली आणि हिच्यांतच बालात्रिपुरसुंदरीनें पंडित जगन्नाथराय यांना पूर्वीं दिलेल्या वरप्रदानाप्रमाणें स्वतःचा अंश ठेविला होता. ती पूर्वसंचितानुसार पंडित जगन्नाथराय यांची अर्धांगी होऊन अंतीं त्यांच्या सत्समागमानें मुक्त झाली. पंडित जगन्नाथराय यांना श्रीधीस्त्री यांचा गर्व झाल्यामुळें त्यांच्या उत्तरवयांत त्यांना फार कष्ट सहन करावे लागले. हरदीक्षित, दिरंगखान व रहीम हे त्रिवर्ग कर्म मार्गाला अनुसरणारे आहेत व निर्दोषी आहेत. पंडितराय व यवनी यांचा गर्व खंडन करण्यासाठींच श्रीभगवतीनें त्या त्रिवर्गांना तशी प्रेरणा केली, त्याप्रमाणें ते वागले; आणि ॥ क्षान्तितुल्यं तपो नास्ति ॥

ह्या न्यायानें पंडितरायांनीं त्यांचे अपराध क्षमा केले आहेत. पंडितरायांचें शील परमहंसवृत्तीचें म्हणजे अखेरच्या पायरीचें असल्याकारणानें त्यांना, पामरजनांस श्रेष्ठ प्रकारच्या ज्ञानाच्या अखेरच्या पायरीवर चढविण्यासाठीं निर्मिलेलीं, धर्मशास्त्राचीं बंधनें लागूं नाहींत. रामाचार्य वगैरे पंडितरायांच्या अनुयायी वर्गानें, प्रपंच साधून अंतीं सायुज्यमुक्ति मिळविणें असल्यास, प्रथम हरदीक्षिताच्या कर्ममार्गाच्या तत्वाप्रमाणें प्रायश्चित्त घेऊन प्रपंच सुखोपभोग घ्यावा आणि अखेर श्रीगंगातीरीं वास्तव्य करून एकाग्र चित्तानें श्रीगंगेची सेवा करून मुक्त व्हावें; आणि प्रापंचिक सुखाची इच्छा नसल्यास प्रायश्चित्त न घेतां फक्त या पंडितरायांच्या पीयूषलहरी ( गंगालहरी ) काव्याचें पारायण नित्य येथें करीत जावें; म्हणजे जगत्पावनी श्रीगंगामाउली सर्वांना जन्ममरणापासून मुक्त करील. दिरंगखान, रहीम वगैरे सर्व यवनमंडळींनीं सुद्धां सायुज्यमुक्ति मिळविण्यास्तव या गंगालहरी काव्याचा नित्य पाठ करीत जावा; आणि पंडितराय यवनी (भामिनी) यांचें हें अलौकिक सर्वांगसुंदर गद्यपद्यात्मक अवतारचरित्र नित्य वाचीत जावें व लोकांना सुद्धां ऐकवीत जावें; म्हणजे तेहि सर्व पातकांपासून मुक्त होतील. विशेषें करून या दशहाराच्या उत्सवांत गंगालहरीकाव्य पंडितरायांच्या ह्या अलौकिक व हृदयंगम चरित्रासहित वाचलें व ऐकविलें असतां अभक्ष्यभक्ष्यादि मोठमोठीं पातकें नाश पावतात. पंडितरायांची प्रसादयुक्त मधुर वाणी आणि त्यांची श्रीगंगामातेच्या ठायीं अढळ श्रद्धा, या सद्गुणद्वयामुळेंच

त्यांचा उद्धार झाला. पतित असो, अंत्यज असो, सज्जन, दुर्जन, कोणी कसाहि असो, श्रीगंगामाता जातिभेदाकडे लक्ष न देतां सर्वत्र समदृष्टि ठेवून, जे तिला एकनिष्ठेनें व दृढनिश्चयानें शरण जातील त्या सर्वांचा ती मातुश्री उद्धार करील. तुम्ही सर्व भक्तमंडळी वर पाहा ! ही पुष्प-वृष्टि होत आहे. परमपूज्य बादशाहा अकबर, राणी भानुमती, पिता पेरमभट्ट व मातुश्री लक्ष्मीबाई उर्फ गंगूबाई ( पंडितरायांची माता ) आनंदानें ही पुष्पवृष्टि करीत आहेत; आणि सगरतनयांप्रमाणें आपला उद्धार झाल्यामुळें स्वर्गलोकीं धन्य धन्य म्हणवीत आहेत. आतां सर्वांनीं मिळून श्रीगंगामाउलीची आरती करावी " याप्रमाणें अप्पय्या-दीक्षितांचें भाषण संपल्यानंतर श्रीगंगामाउलीची सर्वांनीं मिळून आरती केली आणि " जयगंगे ! जयगंगे ! जयगंगे ! " याप्रमाणें सर्वत्र जयघोष होतांच मोठें दिव्य तेज दिसूं लागलें; त्यांतच पंडित जगन्नाथराय यवनीसह ( भामिनीसह ) श्रीगंगामाउलीच्या पवित्र प्रवाहांत अदृश्य झाले.

---

# परिशिष्ट—अ.



पंडितजगन्नाथरायकृत ग्रंथांतील, त्यांच्या चरित्राशीं ज्यांचा निकट संबंध आहे असे, कांहीं उतारे व इतर आधारः—

(१) इति श्रीमदखिलांध्रवेंगिनाडिकुलावतंसपंडितराजजगन्नाथनिर्मिते भामिनीविलासे शांतश्चतुर्थो विलासः समाप्तः ( भामिनीविलास. रॉयल एशिआटिक सोसायटि पुस्तकालयांतील हस्तलिखितप्रत. )

(२) ॥ तैलंगान्वयमंगलालयमहालक्ष्मीदयालालितः॥श्रीमत्पेरम–भट्टसूनुरनिशं विद्वल्ललाटंतपः ॥ संतुष्टः + कमताधिपस्य कवितामाकर्ण्य तद्वर्णनम् ॥ श्रीमत्पंडितराजपंडितजगन्नाथो व्यधासीदिदम् ॥ १ ॥ ( प्राणाभरण. श्लोक ९२. ) ( + कुचबिहारचा ६ वा राजा प्राणनारायण. इ. स. १६२७. )

(३) पाषाणादपि पीयूषं स्यंदते यस्य लीलया ॥तं वंदे पेरु(द्दु)-भट्टाख्यं लक्ष्मीकांतं महागुरुम् ॥ १ ॥ (रसगंगाधर. उपोद्घात).

(४) बनारस येथील बाबुशास्त्री पंडित हे जगन्नाथपंडितांचे वंशज आहेत. त्यांचे कडून असें कळतें कीं—जगन्नाथपंडित हे तैलंग ब्राम्हण असून त्यांच्या बंधूच्या वंशजांतील लक्ष्मीधरराव नांवाचा एक प्रसिद्ध पुरुष हिंदुस्थानच्या गव्हरनरजनरल साहेबांच्या हाताखालीं भाषांतरकर्ता होऊन गेला. ( वैद्यकृतभामिनीविलास. प्रारंभीं पृष्ठ १२);

त्याचप्रमाणें श्रीवेदमूर्तिब्रम्हश्री उपदृष्टा सुब्रह्मण्यशास्त्री महाकवि आंध्रवें-गिनाडि, गोदावरी डिस्ट्रिक्ट पोस्ट अंबाजीपेठ-गांव मुंगुंडा येथील पंडित जगन्नाथरायांचे वंशज, वय वर्षें ८०, यांनीं सांप्रतच्या चरित्रा-विषयीं जी माहिती दिली आहे, ती सर्व तलंगी भाषेतील त्यांच्या जव-ळील हस्तलिखित जीर्ण पोथीच्या आधारानें दिली आहे. आणि सद-रील शास्त्र्यांचे चिरंजीव यांनीं वडिलांच्या पश्चात् जें पोस्ट कार्ड पाठ-विलें त्यांत "पंडितजगन्नाथराय यांचे कौण्डिन्यगोत्र, वसिष्ठ, मैत्रावरुण, कौण्डिन्येति त्रिप्रवरान्वित आश्वलायन शाखीय ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मणः पंडितजगन्नाथरायः" असें त्यांनीं लिहून पाठविलें आहे

(५) पंडितरायांचे वडील पेरमभट्ट हे कोण कोणत्या ज्ञानी-पुरुषाजवळ कोण कोणत्या विद्या शिकले त्याचा आधारः—

श्रीमज्ज्ञानेंद्रभिक्षोरधिगतसकलब्रम्हविद्याप्रपंचः ।
काणादीराक्षपादीरपि गहनगिरो यो महेंद्रादवेदीत् ॥
देवादध्यगीष्ट स्मरहरनगरे शासनं जैमिनीयम् ।
शेषांकप्राप्तशेषामलभणितिरभूत्सर्वविद्याधरो यः ॥१॥

(र. गं. उपो.)

भावार्थः—ज्ञानेंद्रयतीपासून वेदांत, महेन्द्रापासून काणाद व गौतम याच्या तत्त्वज्ञानपद्धती, खण्डदेवापासून जैमिनीची मीमांसा आणि वीरेश्वर (शेषउपनांवाचे पंडित) पंडितापासून पतंजलीचें महाभाष्य तो शिकला होता.

(६) मराठी दरबारास उद्देशून पंडितजगन्नाथरायांनीं जे संस्कृत श्लोक म्हटले ते उपलब्ध नाहींत; परंतु त्याचें इंग्रजींत (कवितारूपानें) भाषांतर सांपडलें, तें खालीं लिहिल्याप्रमाणें:—

" The Kokil singing amidst a flock of Crows "
" His melody in tuneful warblings shows "
" And while the power of harmony displays "
" The verdant groves re-echoforth his lays "
" The foresters enchanted by his song "
" Indignant drive away the sable throng "
" That no vile croaker of the Kawing race "
" Should near the vocal stranger hold a place. "

(Literature Catalogue No. 63 Page 78. Biographical sketches of Deccan Poets being memoirs of the lives of serveral eminent bards, ancient and modern, compiled from authentic documents by Cavelly Venkata Ramaswami, late Head Translator and Pandit in the literary and antiquarian Dept. Calcutta. The Book was published in 1829 A. D. and dedicated to Lord William Bentinc, the then Governor General of of India. )

( ७ ) पंडितरायांचें दारुण तप पाहून देवीनें प्रसन्न होऊन दिलेलें वरप्रदानः—॥ आकुरुदेशं विचरे मा कुरु परवादिनिर्जये शंकाम् ॥ स्वीकुरु वरमेकं मे व्याकुरु भो वत्स शास्त्राणि ॥ १ ॥ ( वैद्यकृत भा. वि. पृष्ठ ४ ).

( ८ ) पंडितरायांची आणि अकबर बादशाहाची प्रथम भेट झाली, त्या वेळीं पंडितरायांनीं म्हटलेला श्लोक येणें प्रमाणें:—॥ जयत्यकबरः पृथ्वीपतिरूर्जितविक्रमः ॥ येनारातिवधूवर्गः सर्वोप्यकबरीकृतः ॥ १ ॥ भावार्थः—प्रचंड पराक्रमी अशा पृथ्वीपति अकबराचा जयजयकार असो ! ज्या अकबरानें सगळा शत्रुस्त्रियांचा समूह देखील अ-कबरी ( केशपाशरहीत ) करून टाकिला, म्हणजे शत्रूंचा नाश करून त्यांच्या स्त्रियांना वैधव्य आणिलें. ( निबंधावलि पृष्ठ ९६ ).

( ९ ) इतर राजेलोकांकडून बहुमानाचें बोलावणें आलें, तरी पंडितराय त्यांना उत्तर देत असत, तें असें:—॥ दिल्लीश्वरो वा जगदीश्वरो वा मनोरथान्पूरयितुं समर्थः ॥ अन्यैर्नृपालैः परिदीयमानं शाकाय वा स्याल्लवणाय वा स्यात् ॥ १ ॥ ( वैद्यकृत भा. वि. पृष्ठ ४ ).

( १० ) ॥ माहात्म्यस्य परोवधिर्निजगृहं गंभीरतायाः पिता ॥ ॥ रत्नानामहमेक एव भुवने को वाऽपरो मादृशः ॥ इत्येवं परिचिंत्य मास्म सहसा गर्वांधकारं गमो ॥ दुग्धाब्धे भवता समो विजयते दिल्लीधरा वल्लभः ॥ १ ॥ ( र. गं. प्र. प्र. ) हा श्लोक व असेच कांहीं रसगंगाधरांतले श्लोक बादशाहाला उद्देशून पंडितरायांनीं म्हटले होते. ( पहा. रसगंगाधरांत—अक्षेप प्र०, अप्रस्तुत प्रशंसा प्र०, सहोक्ति प्र०, वगैरे. )

( ११ ) अकबर बादशाहाच्या सूचनेप्रमाणें पंडितरायांनीं लागलींच तयार करून म्हटलेलें **कवनपंचक** येणें प्रमाणें:—

## पंचचामरवृत्त.

॥ धरामरेन्द्रपाणिषु प्रदातुमीहसे धराम् ॥ यदित्वमादरात्तदैव देहि तत्फलप्रदाम् ॥ पयस्विनीं स्वलंकृतां स्ववंशभुक्तिमुक्तिदाम् ॥ यदैव तच्छिशुर्भवेन्निमेदरुं निमेबरुम् ॥ १ ॥

॥ धरातले धरामराः स्वकर्मधर्मतत्परा ॥ न सन्ति किं तथापि तेष्वयं सुदुर्लभो यमी ॥ सदार्घ्यकालसाधकस्तदा यदैव कुंकुमारुणः ककुद्द्वये रविर्निमेदरुं निमेबरुम् ॥ २ ॥

॥ भयं न याम्यदूतजं न नारकीय यातना ॥ न मातृकुक्षि–यातना पुनर्न दुःखमण्वपि ॥ भवेन्नरस्य तस्य यः प्रयाणकाल आगते ॥ वियत्सरिज्जले पतेन्निमेदरुं निमेबरुम् ॥ ३ ॥

॥ विधातुमर्थवद्वचो विधेर्विधानविद्धरि ॥ दधार रूपमद्भुतं न वा मृगं न मानुषम् ॥ हिरण्यकं निजोरुगं ददार पाणिजांकुरैः ॥ स्थितः सदेहलीतटे निमेदरुं निमेबरुम् ॥ ४ ॥

॥ नृपं जगाम कौशिकः सुतं प्रदेहि रक्षणे ॥ तरस्विनां प्रमाणकं सुतेज एव नो वयः ॥ प्रहर्तुमेति सद्गजेन्द्रगण्डमेणराडरम् ॥ यदैव सिंहिकाभगे निमेदरुं निमेबरुम् ॥ ५ ॥

## भावार्थ.

**श्लोक १ ला**:—हे राजा! जर तुला पृथ्वीदान करण्याची इच्छा असेल तर तूं आदरपूर्वक, पृथ्वीदाना इतकेंच फळ देणारी, पुष्कळ दूध

देणारी, अंगावर उत्तमप्रकारचे सर्व अलंकार घातलेली, स्वतःच्या वंशाला भुक्ति ( प्रापंचिक सुखोपभोग ) व मुक्ति ( मोक्ष=जन्ममरणापासून सुटका ) देणारी, अशी उभयतोमुखी गाय ( म्हणजे जिचें वांसरू अर्धे गर्भाशयांत व अर्धे बाहेर आलें आहे. ) श्रेष्ठ ब्राह्मणांच्या हातांत दान दे. (॥ यावद्वत्सो योनिगतो यावद्गर्भं न मुंचति ॥ तावद्गौः पृथिवी ज्ञेया सशैलवनकानना ॥ १ ॥ ( मत्स्यपुराण दानचंद्रिका पृष्ठ २१० ).

श्लोक २ रा:—आपल्या धर्मकर्मांत तत्पर असे ब्राह्मण या अवनीतलावर नाहींत कीं काय ? ( आहेत.) तथापि त्यांत, ज्या वेळेस कुंकवासारखा लाल झालेला सूर्य, उदयाचलाच्या व अस्ताचलाच्या शिखरावर अर्धा आंत व अर्धा बाहेर असतो, त्या वेळेस सदा अर्घ्य देण्याची वेळ साधणारा व मनोनिग्रहकर्ता असा योगी फार दुर्लभ आहे.

श्लोक ३ रा:—प्राणोत्क्रमणाच्या वेळीं ज्याचें अर्धें शरीर गंगाप्रवाहांत व अर्धें गंगाप्रवाहाच्या बाहेर पडतें, त्या मनुष्यास यमदूतांपासून भय नाहीं, नरकाच्या यातना नाहींत, मातेच्या गर्भवाससंबंधीं यातना नाहींत आणि पुनः केव्हांहि त्याला दुःखाचा लेशसुद्धां संभवत नाहीं.

श्लोक ४ था:—ब्रह्मदेवाचें विधान (त्यानें दिलेल्या वरप्रदानास) जाणणारा श्रीमहाविष्णू, यानें ब्रह्मदेवाच्या वचनाच्या अर्थाप्रमाणें करण्यासाठीं, मनुष्य नाहीं व पशूहि नाहीं, असें ( नारसिंहाचें ) अद्भुत रूप धारण केलें आणि हिरण्यकशिपुला ( दैत्याचा राजा )

मांडीवर घेऊन अर्धा उंबऱ्याच्या आंत व अर्धा उंबऱ्याच्या बाहेर धरून उंबऱ्यावर त्याला नखांनीं विदारण केलें ( फाडून टाकलें ).

श्लोक ९ वा:—कौशिकऋषी ( विश्वामित्र ) दशरथ राजाजवळ गेला आणि " यज्ञाच्या रक्षणासाठीं तुझा मुलगा दे " असें म्हणाला; तेव्हां दशरथानें नम्र होऊन सांगितलें " अजून तो वयानें लहान पोर आहे; त्याच्याकडून राक्षसांचा पराभव आणि यज्ञयागाचें रक्षण कसें होणार ? " तेव्हां विश्वामित्र म्हणाला " राजा ! तुझ्या पुत्राच्या ( श्रीरामाच्या ) वयाकडे पाहावयाचें कारण नाहीं. त्याच्या ठायीं जें अलौकिक तेज ( =सत्ता=शौर्य ) वास्तव्य करीत आहे, त्या तेजो-बळानेंच राक्षसांचा विध्वंस व यज्ञयागाचें रक्षण होणार आहे. उदाहरणार्थ—मृगपतिसिंहबालक ( छावा ) अर्धा मातेच्या गर्भाशयांत व अर्धा गर्भाशयाबाहेर, अशा स्थितींतच गजराजाचें गंडस्थळ विदारण करण्यास तत्काळ सिद्ध होतो. "

( १२ ) पंडितरायांनीं जहांगीर बादशाहास उद्देशून म्हटलेला श्लोक येणेंप्रमाणें:—॥ श्यामं यज्ञोपवीतं तव किमिति मषीसंगमात्कुत्र जातः ॥ सोऽयं शीतांशुकन्यापयसि कथमभूत्तज्जलं कज्जलाक्तम् ॥ क्याकुप्यन्नूरुद्दीनक्षितिरमणरिपुक्षोणिभृत्पक्ष्मलाक्षी—॥लक्षाक्षीणाश्रुधारा-समुदितसरितां सर्वतःसंगमेन ॥१॥ ( रसगंगाधर उत्तरप्रकरण. ) "नुरुद्दीन-महंमद जहांगीर" हें जहांगीर बादशाहाचें नांव आहे ( ब्लोच्मनकृत ऐनी—अकबरीचें भाषांतर, वंशवृक्षाच्या शेवटीं वॉल्युम १ )

(१३) पंडितरायांनीं शहाजहां बादशाहास उद्देशुन केलेला श्लोकः- भूमीनाथ शहाबुदीन भवतस्तुल्यो गुणानां गणै-॥रेतद्भूतभवप्रपंचविषये नास्तीति किं ब्रूमहे ॥ धाता नूतनकारणैर्यदि पुनः सृष्टिं नवां भावये-॥ न्न स्यादेव तथापि तावकतुलालेशं दधानो नरः ॥ १ ॥ (रसगंगाधर. असम-प्रकरण ). " शिहाबुदोन महंमद शहांजहां " हें शहाजहां बादशाहाचें नांव आहे. (सदरील जहांगीराच्या संबंधांत दिलेल्या टिपेच्या आधारानें.)

( १४ ) पंडितरायांना शाहाजहांबादशाहानें पंडितराज ही पदवी दिली तो आधारः—

" मूर्तिमतेव नवाबासफखानमनःप्रसादेन द्विजकुलसेवाहेवाकि-वाङ्मनःकायेन माथुरकुलसमुद्रेन्दुना रायमुकुंदेनादिष्टेन सार्वभौमश्री-शहाजहांप्रसादाधिगतपंडितराजपदवीविराजितेन तैलंगकुलावतंसेन पंडित-जगन्नाथेनासफविलासाख्येयमाख्यायिका निरमीयत. " (आसफविलास. उपोद्घात. )

(१५) सदरहू आसफखानासंबंधांत आधारः—॥ सुधेव वाणी वसुधेव मूर्तिः सुधाकरश्रीसदृशी च कीर्तिः ॥ पयोधिकल्पा मति-रासफेंदो महीतलेऽन्यस्य न हीति मन्ये ॥ १ ॥ ( र. गं. उ. प्र. ) ॥ युक्तं तु याते दिवमासफेंदौ तदाश्रितानां यदभूद्विनाशः ॥ इदं तु चित्रं भुवनावकाशे निराश्रया खेलति तस्य कीर्तिः ॥ २ ॥ ( र. गं. वि. प्र ) याच आसफखानानें फारशींत " सुशरोसिरीन " या नांवाचें काव्य लिहिलें आहे. (जाहंगीरानें स्वतः लिहिलेलें चरित्र पान १०८).

( १६ ) पंडितरायांनीं अन्योक्ति विलासाच्या २९ व्या श्लोकांत " मरुप्रांतांत " म्हणजे मारवाड देशांत असा उल्लेख केला आहे ॥ ऐसें संकट चंपकावरि मरुप्रांतांत येतां वना ॥ दैवें धाडियलें कसें तरि तुला द्यायां तया जीवना ॥ २९ ॥ ( लेलेकृत भा. वि. )

---

# परिशिष्ट—ब.

---

पंडित जगन्नाथराय यांचे समग्र ग्रंथ व त्या संबंधांत विश्वसनीय माहिती, उतारे, आधार वगैरेः—

(१) सुधालहरीः—हें तीस श्लोकांचें काव्य स्रग्धरावृत्तांत रचिलें आहे. यांत श्रीसूर्यनारायणाचा महिमा वर्णन केला आहे. मयूरकृत सूर्यशतक स्रग्धरावृत्तांत रचिलें आहे, त्याच पद्धतीवर हेंहि काव्य रचिलें आहे. या काव्यांतील कांहीं उतारे रसगंगाधरांत आढळतात. ( पहा सुधालहरीकाव्य श्लोक १, ५, ६, २४ ).

(२) अमृतलहरीः—हें छोटेखानी दहा श्लोकांचें काव्य श्रीमच्छंकराचार्यविरचित गंगास्तवाच्या धर्तीवर रचिलें आहे. यांत श्री यमुनेची प्रेमळ स्तुति केली आहे.

(३) करुणालहरी:—हें साठ श्लोकांच काव्य आहे. यांत प्रापंचिक दु:खांतून आपली सुटका होण्यास्तव पंडितरायांनीं श्रीविष्णूची स्तुति केली आहे. इला कोणी कोणी विष्णूलहरी असेंहि म्हणतात. यांतील कांहीं उतारे रसगंगाधरांत आढळतात.

(४) लक्ष्मीलहरी:—हें एकेचाळीस श्लोकांचें काव्य शिखरिणी वृत्तांत रचिलें आहे. यांत श्रीविष्णूची पत्नी लक्ष्मी, इची स्तुति केली आहे. यांतील ३० वा श्लोक रसगंगाधरांत आढळतो; त्यांतच पंडितरायांनीं थोडासा फेरफार करून तो आपल्या भामिनीविलासांतहि दिला आहे. तो श्लोक येणें प्रमाणें:–

॥ अभूदप्रत्यूहः सकलहरिदुल्लासनविधि–॥ विलीनो लोकानां सहि नयनतापोऽपि कमले ॥ तवास्मिन्पीयूषं किरति वदने रम्यवदने ॥ कुतो हेतोश्वेतो विधुरयमुदेति स्म जलधेः ॥ ( लक्ष्मीलहरी श्लोक ३० ).
॥ अभूदप्रत्यूहः कुसुमशरकोदंडमहिमा ॥ विलीनो लोकानां सह नयनतापोऽपि तिमिरैः॥ तवास्मिन्पीयूषं किरति परितस्तन्विवदने॥ कुतो हेतोः श्वेतो विधुरयमुदेति प्रतिदिनम् ॥१॥ ( भा. वि. २–१३७ ).

( ५ ) पीयूषलहरी (गंगालहरी). हें बावन्न श्लोकांचें सुरस, प्रेमळ व भक्तिरसानें संपूर्ण भरलेलें काव्य आहे;आणि तें शिखरिणी वृत्तांत रचिलें आहे. या काव्याच्या एका जीर्ण हस्तलिखित पोथींत त्रेपन्नावा श्लोक आढळतो तो येणें प्रमाणें:–॥ कदाचिन्नागारिः सुरतटिनितीरे सम-चरन् ॥ समाकृष्य व्यालं सजलमगिलत्कंचनबलात् ॥ चतुर्बाहुर्भूत्वा तदु-

परिलसत्पीतवसनो ॥ गतो विष्णोर्लोकं जननि तव नीरस्य महिमा ॥१॥ श्रीगंगेच्या उदकाचा हा महिमा गंगालहरीच्या १६ व्या श्लोकांत– "स्वभावस्वच्छानां........" ह्मणून वर्णन केलाच आहे; यावरून हा श्लोक पंडितरायांचाच आहे, किंवा कसें याबद्दल शंका आहे. त्याशिवाय, या नव्या श्लोकाची पद्यरचना पंडितरायांच्या नेहमींच्या रचनेसारखी दिसत नाहीं. रसगंगाधरांत पीयूषलहरींतील पुष्कळ उतारे सांपडतात. ह्या पीयूषलहरींस पंडितरायांनीं "गंगास्तव" असें ह्मटलें आहे. "गंगालहरी" ह्या नांवाचा पंडितरायांनीं उल्लेख केल्याचा कोठेंहि आधार नाहीं. श्रीगंगेस स्वतःची मातुश्री मानून पीयूषलहरीचें अनुष्ठान करावें आणि स्वतःचा उद्धार होण्यासाठीं एकाग्रचित्तानें प्रार्थना करावी, असें मनांत येऊन पीयूषलहरीच्या पारायणास ज्येष्ठ शु. १ पासून प्रारंभ करून शु. १० पावेतों दशहरांत दररोजचीं १०० याप्रमाणें दहा दिवसांत एक हजार पारायणें त्यांनीं संपूर्ण केलीं. त्या वेळीं श्रीगंगामाउलीनें प्रसन्न होऊन पंडितरायांचा यवनीसह उद्धार केला. हा अद्‌भुत चमत्कार घडला, त्या दिवसापासून हें " पीयूषलहरीकाव्य " " गंगालहरी " या नांवानें जगांत लोकादरास अधिक पात्र होऊन प्रसिद्ध झालें. पंडितरायांनीं स्वतः रचिलेल्या पांच लहरीं पैकीं शेवटच्या पीयूषलहरीचेंच पारायण कां केलें, त्याचें कारण त्यांनीं गंगालहरीच्या २८ व्या श्लोकांत दिलें आहे. ( त्रपंते तीर्थानि....श्लो. २८ ).

( ६ ) **यमुनावर्णनचंपूः**—हा गद्यपद्यात्मक ग्रंथ फारसा कोठें आढळत नाहीं; काव्यमालेंत तो प्रसिद्ध झाला आहे, असें म्हणतात.

यांतील दोन उतारे रसगंगाधरांत आढळतात, ते येणेंप्रमाणें:—( अ ) यत्र व्यंग्यचमत्कारासमानाधिकरणो वाच्यचमत्कारस्तत्तृतीयम् । यथा यमुनावर्णने:—" तनयमैनाकगवेषणलंबीकृतजलधिजठरप्रविष्टहिमगिरि-भुजायमानाया भगवत्या भागीरथ्याः सखी " इति (रसगं काव्यलक्षण). ( ब ) एवमलंकारांतरमपि शब्दशक्तिमूलानुरणनस्य विषयः । यथा यमुनावर्णने:—"रविकुलप्रीतिमावहंती नरविकुलप्रीतिमावहति । अवारितप्रवाहा सुवारितप्रवाहा " । ( रसगं. अन. २ ). या यमुनावर्णनास पूर्स जगन्नाथपंडितरायानें " आख्यायिका " असेंहि म्हटलें आहे. " आख्यायिकायां जात्यवच्छिन्नस्वरूपोत्प्रेक्षा यथा ":—"तनयमैनाक" ........( रसगंगाधर. उत्प्रेक्षाप्रकरण. ).

( ७ ) **रसगंगाधर**:—जगन्नाथपंडितरायांनीं जे ग्रंथ लिहिले, त्या सर्वांत हा ग्रंथ फार महत्वाचा आहे. पंडितरायांनीं इतर ग्रंथांचें चांगलेंच मनन करून तो लिहिला आहे. जगन्नाथ-पंडितानंतर नागोजीभट्ट व भट्टोजीदीक्षित यांनीं जसें व्याकरणविषयांत नांव मिळविलें, तसेंच प्रस्तुतचा ग्रंथ लिहिण्यांत जगन्नाथपंडितरायांनीं स्वतःची चांगली विद्वत्ता प्रदर्शित केली असल्यानें त्यांची दिगंत कीर्ति पसरली. या ग्रंथांत वादविषयक मुद्दे असून त्यांचीं उत्तम निराकरणें करण्यांत आलीं आहेत. प्रोफेसर महेशचंद्र न्यायरत्न हे या ग्रंथावि-षयीं लिहितात कीं—"नवीनेषु निबंधेषु रसगंगाधर एव प्रधानम् । अत्रहि नकोऽपि विषयः (प्रायो) निर्युक्तिक उक्तः । प्रत्युत सर्व एव तेऽतीव सूक्ष्मानुसंधानेन निर्णिताः । (नवीनत्वेपि) नातीवाश्लीलता-

दोषः । नापि रचनायाः काठिन्यम् । यच्च क्वापि क्वापि काठिन्यं दृश्यते तत्प्रतिपाद्यविषयाणां दोषो न ग्रंथकर्तुः । यानि नवीनान्युदाहरणानि प्रणीतानि तान्यतीव मनोहराणि । ततश्चास्यावलोकने प्रसंगादभिनवकाव्यावगतिरपि भवति । इत्येवमस्य बहवो गुणा विद्यंते। केवलमेको दोषो यदनेकत्र नैयायिकसमयानुसारितर्केण दूषणभूषणादिकरणमिति । फलतोऽलंकारशास्त्रे व्युत्पित्सूनामेतदध्ययनमतीवावश्यकम् । (काव्यप्रकाशविज्ञापनम् )." रसगंगाधरांतील अपूर्ण आर्याः—" ॥किं कुर्वंते दरिद्राः का सारवती धरा मनोज्ञतरा ॥ कः पावनस्त्रिलोक्या.........॥१७॥ (रसगंगाधर. उत्तरप्रकरण पान ९२२ ). अशा आर्या त्यांत बऱ्याच आहेत. रसगंगाधराच्या पुष्कळ ठिकाणच्या हस्तलिखितप्रती पाहतां त्या अपूर्ण दिसून येतात, यावरून पंडितरायांनीं हा ग्रंथ संपूर्ण लिहिला असावा असें दिसत नाहीं. इ. स. १६४१ मध्यें हा ग्रंथ लिहिणें चालू असलें पाहिजे असें पंडितरायानें रसगंगाधरांत आसफच्या मृत्युविषयीं उल्लेख केला आहे (रसगं. विशेषप्रकरण) त्यावरून दिसतें; आसफ हा इ. स. १६४१ मध्यें मरण पावला. ( सर एच् इलियट कृत हिंदुस्थानचा इतिहास वॉ. ७ पृष्ठें ४६ ।६८ ।६९).

(८) **मनोरमाकुचमर्दनः**—पंडितजगन्नाथराय यांनीं हा ग्रंथ व्याकरणविषयावर लिहिला आहे. भट्टोजीदीक्षितानें आपल्या सिद्धांतकौमुदीवरील टीकेचें नांव मनोरमा असें ठेविलें आहे; आणि या मनोरमेवर पंडितरायांनीं जी टीका केली तिचें नांव मनोरमाकुचमर्दन असें ठेविलें आहे. हा ग्रंथ फारसा कोठें आढळत नाहीं,

पण त्याच्या प्रारंभींचीं कांहीं पृष्ठें पाहण्यांत आलीं त्यावरून असें कळतें कीं– जगन्नाथरायपंडितांचे वडील ज्या वीरेश्वरशेषाजवळ पतंजलीचें महाभाष्य शिकले, त्याच वीरेश्वरशेषाचें नांव या ग्रंथाच्या पहिल्या श्लोकांत "वीरेश्वरं गुरूं शेषं नत्वा"....असें लिहिलें आहे, तो तोच वीरेश्वरशेष असावा असें वाटतें; परंतु जगन्नाथपंडितरायांनीं त्यास गुरू कां म्हटलें, हें मात्र समजण्यास चांगला आधार नाहीं.

(९) अश्वधाटीः—"राम" या नांवाचा जगन्नाथपंडिताचा नातु होता. त्याच्या इच्छेप्रमाणें हें २६ श्लोकांचें मनोहर लघुकाव्य अश्वधाटी वृत्तांत रचिलें आहे, असें या खालीं दिलेल्या या काव्याच्या शेवटच्या श्लोकावरून वाटतें:—॥रामनाम्नः स्वपौत्रस्य कामनापूरणोत्सुकः॥ अश्वधाटीं जगन्नाथो विश्वहृद्यामरीरचत ॥२६॥ या काव्यांत अनेक देवतांची स्तुति केली आहे; जगन्नाथपंडितांच्या बहुतेक ग्रंथांतील उतारे जसे रसगंगाधरांत आढळतात, तसे सांप्रतच्या काव्यांतील उतारे रसगंगाधरांत आढळत नाहींत. यांत पहिल्या श्लोकापासून २५ श्लोकापर्यंत ३६ मूळाक्षरां पैकीं ११ सोडून बाकी २५ मूळाक्षरें अनुक्रमें साधून वृत्त्यनुप्रास नांवाचा शब्दालंकार पंडितरायांनीं प्रत्येक श्लोकांत उत्तम साधला आहे. उदाहरणार्थः—

॥ हारं ददासि कुचभारं जिघृक्षसि च सारंगचंचलदृशः ॥
॥ सा रंतुमिच्छति हि जारं निषेव्य तव का रंजनेह घटताम् ॥
॥ स्मारं विहाय मदमारंभरम्यमनुवारं भज श्रुतिगिराम् ॥
॥ सारं महेशमविकारं जनुर्विलयपारं प्रयास्यसि सखे ॥ १७ ॥

॥ गाढा त्वया सपदि राढापुरी[1] वसुनि बाढावबद्धरतिना ॥
॥ सोढा तथा तपनगाढातपप्रसररूढातिवृष्टिवितति: ॥
॥ मूढापि किं फलमगूढा जरैव शिरसोढा कुतो न विनुतो ॥
॥ व्रीढा जनोर्जनितषोढामुख: समिति वोढा महाटकगिरे: ॥७॥

या दोन श्लोकावर मराठी साक्या खालीं लिहिल्या प्रमाणें:— ॥ मृगनयनेचे पीनपयोधर धरावया मतिहीना ॥ देशी तिजला प्रेमें मौक्तिकहार भूषणें नाना ॥१॥ जारपुरुषिं कीं तरुणी ती बा विलास करिते नाना ॥ अशा रंजनें पावसि कैसा येथें सुसमाधाना ॥ २ ॥ ॥ आरंभाला रम्य जरी परि कामप्रमाद हा वायां ॥ अंतीं निंद्यचि आहे यास्तव जन्ममरण चुकवाया ॥३॥ निगमपयोनिधिसार अशातें निर्विकार जो त्यातें ॥ सदाशिवाला सदा भजावें उमजावें स्वहितातें ॥ ४ ॥ ॥रात्रंदिन बा धन धन करितां तदर्थ दूषितशीला ॥ शीघ्र गांठिली राधा-नगरी सोसुनियां बहु हाला ॥५॥ प्रखर उन्हाचा ताप कठिण तन्मूलक जी अति वृष्टी ॥ घेउनि माथां जरेविना वद काय मिळविली तुष्टी ॥६॥ जन्ममरण जो चुकवाया विभु षडाननाचा तात ॥ स्मरसि कां न त्या केलें ज्यानें मेरुधनू युद्धांत ॥७॥

(१०) **प्राणाभरण**:—कुचबिहारचा (कामरूप देशाचा) ६ वा राजा प्राणनारायण होता. त्यांस उद्देशून हें ५० श्लोकांचें स्तुतिपर काव्य पंडित जगन्नाथरायांनीं लिहून प्राणनारायणास इ.स. १६२७च्या

---

१ राधानगर ( बंगाल. )

सुमारास ते तेथें असतांना अर्पण केलें. हें संपूर्ण काव्य काव्य प्रकाशांत छापून प्रसिद्ध झालें आहे;याचे उतारे रसगंगाधरांत आढळतात. त्याच-प्रमाणें या काव्याचा प्रथम श्लोक भामिनीविलासांत आढळतो. ( भा. वि. ४/४२). प्राणाभरण व जगदाभरण हीं दोन्हीं काव्यें बहुतेक सारखींच आहेत, हें या खालीं जगदाभरणकाव्या विषयीं दिलेल्या हकीकतीवरून सहज ध्यानांत येईल.

(११) **जगदाभरणः**—या काव्यांत शाहाजहां बादशाहाचा वडील मुलगा दाराशुको याची प्रशंसा केली आहे, असें पंडित दुर्गाप्रसाद यांच्या रसगंगाधराच्या व एल. आर. वैद्य यांच्या भामिनीविलासाच्या प्रतींत प्रसिद्ध झालें आहे, परंतु तें अगदीं चुकीचें आहे. या संबंधांत साधार लेख मीं ता. २१–१०–१९१३ च्या केसरी पत्राच्या ४२ व्या अंकांत **जगदाभरण** या सदरा खालीं प्रसिद्ध केलाच आहे. या काव्याची एक हस्तलिखित प्रत मला श्री क्षेत्र काशी येथून मिळाली होती; तसेंच पुणें येथील आनंदाश्रमांत या काव्याची एक हस्तलिखित प्रत मीं स्वतः वाचून पाहिली आहे. या काव्याचे एकंदर पन्नास श्लोक आहेत; या हस्तलिखित प्रतींतील बरींच अक्षरें दुर्बोध आहेत. या जगदाभरण काव्यांत दाराशुकोची अगर कोणत्याहि मोगल बादशाहाची स्तुति नसून उदेपुरचा राणा जो कर्णसिंह, त्याचा मुलगा जगत्सिंह याची स्तुति केली आहे; आणि या काव्यास "जगदाभरण" या दिलेल्या नांवावरूनहि उघड होत आहे. हें काव्य जगत्सिंहास पंडितरायांनीं इ. स. १६२७ च्या सुमारास

" जगताचें आभरण " म्हणून प्रेमादरानें अर्पण केलें आहे. दाराशुको हा पंडितरायांचा परमभक्त होता, युवराज होता आणि संस्कृत भाषेचा चाहता होता (सर एच.इलियटकृत हिंदु. इति.पु. ७ पृष्ठ १७९). यावरून पंडितरायांनीं त्याची स्तुति केली असली, तरी ती या जगदाभरण काव्यांत नाहीं. या काव्याचे कांहीं श्लोक रसगंगाधरांत आढळतात. प्राणाभरण व जगदाभरण हीं दोन्हीं काव्यें मीं वाचून पाहिलीं, त्यावरून मला असें आढळून आलें कीं—हीं दोन्हीं काव्यें अगदीं एकसारखीं आहेत; म्हणजे जगदाभरणांत जेथें जगत्सिंहाचें नांव आहे, तेथें प्राणाभरणांत प्राणनारायणाचें नांव आहे. इतकाच काय तो फरक दोहोंत आहे. उदाहरणार्थ, जगदाभरण काव्याचा ५ वा श्लोक येणें प्रमाणें:—

॥ माहात्म्यस्य परोऽवधिर्निजगृहं गंभीरतायाः पिता ॥
॥ रत्नानामहमेक एव भुवने को वाऽपरो मादृशः ॥
॥ इत्येवं परिचिंतय मास्म सहसा गर्वाधिकारं गमो ॥
॥ दुग्धाब्धे भवता समो विजयते **श्रीकर्णजन्मार्णवः** ॥ ५ ॥

वरील श्लोकाच्या शेवटीं जेथें " **श्रीकर्णजन्मार्णवः** " असें म्हटलें आहे, तेथें प्राणाभरणकाव्यांत " **श्रीप्राणनारायणः** " असें म्हटलें आहे. तसेंच:—॥ " जागर्तु क्षितिमण्डलोपरि **जगत्सिंहो** धराधीश्वरः "॥ ( जगदा. श्लो. २ ). ॥ जागर्तुक्षितिमण्डले चिरमिह **श्रीकामरूपेश्वरः** ॥ (प्राणाभ. श्लो. २). तसेंच ॥ नुतो निखिलभूसुरै

विनयते जगत्केसरी ॥ (जगदा. श्लो. २१) आणिः—॥ नुतो निखिल-भूसुरै र्जयति कामरूपेश्वरः ॥ ( प्राणाभ. श्लोक २१ ).

(१२) आसफविलासः—यांतील आख्यायिकेंत नबाब आसफखान याच्या पराक्रमाचें वर्णन केलें आहे. हा गद्यग्रंथ उपलब्ध नाहीं; पण काव्यमालेच्या एका अंकांत यांतील एक उतारा प्रसिद्ध झाला आहे, त्यावरून शाहाजहांच्या प्रीतींतला खानखानान व यांतील आसफखान हे एकच असावेत असें दिसतें; कारण शाहाजहांच्या कारकीर्दींत दुसरा कोणीहि आसफखान या नांवाचा प्रसिद्ध पुरुष नव्हता. या आसफखानाचें संपूर्ण नांव " यामीनुद्दौला आसफखान " असें होतें. यांस " खानखानान " ही पदवी इ. स. १६३४ सालांत मिळाली व तो इ. स. १६४१ सालांत मरण पावला. ( सर एच्. इलियटकृत हिं. इति. पु. ७. पृष्ठ ४६,६८,६९ ). ( या पुस्तकाचें परिशिष्ठ अ. अंक १४ पाहा. )

(१३) भामिनीविलासः—पंडित जगन्नाथरायकृत हें एक सर्वांगसुंदर व मनोहर काव्य आहे. भर्तृहरीकृत शतकत्रयाप्रमाणें १. प्रास्ताविक. २. श्रृंगार. ३. करुण. आणि ४. शांत असे याचे विलास (भाग) केले आहेत. प्रोफेसर तारानाथांच्या सूचनेप्रमाणेंसुद्धां जगन्नाथरायपंडितांच्या प्रथमपत्नीचें नांव भामिनी होतें आणि तिचेंच नांव या काव्यास दिलें आहे. पंडितरायांचें हें हृदयंगम काव्य अत्यंत लोकप्रिय आहे व अद्यापि ते विश्वविद्यालयांच्या परीक्षेसाठीं पाठशाळांतहि चालत आहे.

(१४) **चित्रमीमांसाखंडनः**—अप्पय्यादीक्षितकृत "**चित्रमीमांसा**" नांवाच्या ग्रंथांतील मुद्यांचें खंडन करून पंडितजगन्नाथराय यांनीं जो हा ग्रंथ लिहिला त्याला "**चित्रमीमांसाखंडन**" असें म्हटलें आहे. * या शिवाय या ग्रंथाविषयीं" अधिक माहिती उपलब्ध नाहीं.

(१५) **पंडितराजशतकः**—संस्कृत हस्तलिखित प्रतींतून पुस्तकांची एक जीर्ण यादी तपासतांना त्या यादींत प्रस्तुतचें नांव आढळलें; त्यावरून हाहि ग्रंथ पंडितजगन्नाथराय यांनींच लिहिला असावा असें वाटतें. (एल्. आर. वैद्यकृतभामिनीविलास इंग्रजी नोटस. प्रस्तावना पान. १९.) या शिवाय या संबंधांत अधिक माहिती उपलब्ध नाहीं.

---

## विशेषः—

१६. **या**शिवाय "शशिसेना" या नांवाचें एक प्राकृत काव्य, जगन्नाथकवीनें केलें आहे; परंतु हा जगन्नाथ, सांप्रतचा चरित्र नायक जगन्नाथराय पंडित नव्हे, असें मी तें प्राकृत काव्य वाचून

---

*॥ नामं नामं घनश्यामं धाम तामरसेक्षणम् ॥ पण्डितेन्द्रो जगन्नाथशर्मा निर्माति कौतुकम् ॥१॥ रसगंगाधरे चित्रमीमांसाया मयोदिताः॥ये दोषास्तेऽत्र संक्षिप्य कथ्यन्ते विदुषां मुदे॥२॥सूक्ष्मं विभाव्य मयका समुदीरितानामप्यय्यदीक्षितकृताविहदूषणानाम् ॥ निर्मत्सरो यदि समुद्धरणं विदध्यादस्याहमुज्ज्वलमतेश्चरणौ वहामि ॥ ३ ॥ ( हे श्लोक चित्रमीमांसाखंडनाच्या प्रारंभीं दिलेले आहेत. ) ॥ अप्पयार्धचित्रमीमांसा न मुदे कस्य मांसला । अनूरुरिव तीक्ष्णांशोरर्धेन्दुरिव धूर्जटेः ॥१॥ ( हा श्लोक या ग्रंथाच्या शेवटीं दिला आहे. रसगंगाधराचा प्रस्ताविक लेख पाहा. )

पाहून खात्रीनें सांगतों. त्याचप्रमाणें काव्यमालेंत ( पु. २ ७६ ) " वसुमतिपरिणय " व " रतिमन्मथ " या नाटकांचा कर्ता आणि भामिनीविलासाचा कर्ता जगन्नाथराय पंडित एकच आहे, असें म्हटलें आहे; परंतु हीं दोन्हीं नाटकें सूक्ष्मरीतीनें पाहतां त्या नाटकांचा कर्ता जगन्नाथकवि हा सांप्रतचा जगन्नाथपंडित नव्हे, असेंहि मी खात्रीनें सांगतों; कारण कीं सांप्रतचा जगन्नाथरायपंडित हा अकबर जाहंगीर व शाहाजहां यांच्या कारकीर्दींत, व मदरहु नाटकांचा कर्ता जगन्नाथ कवि हा बाळाजी बाजीराव पेशव्यांच्या कारकीर्दींत, होऊन गेला. ( व प. नाटकाच्या शेवटीं "॥ आचंद्रार्कमयं सुखी विजयतां **बालाजिरायः** प्रभुः ॥" वैद्यकृत भा. वि. इं. नोट पान २० ). " विवाद भंगार्णव " या ग्रंथाचा कर्ता " जगन्नाथ तर्कपंचानन " यानें ग्रंथाच्या प्रारंभीं स्वतःच्या वडिलांचें नांव रुद्र असें लिहिलें आहे. ( वैद्यकृत भा. वि. प्रस्तावना. ) या शिवाय कविचरित्रांत आणखी एका जगन्नाथाची हकीकत अशी दिली आहे कीं—तो तैलंगणाच्या उत्तर भागांतला राहणारा होता आणि त्यानें राजनीतीविषयीं पुष्कळ ग्रंथ लिहिले आहेत. भारतांतील " राजधर्म " या विषयाचा शांतीपर्वांचा जो एक भाग आहे, त्याचें या कविनें तैलंगी भाषेंत भाषांतर केलें आहे. ( क. च. पा. २३७, २३८ ). या शिवायः—(१) रेखागणितकर्ता सम्राड् जगन्नाथ. (२) अतन्द्रचंद्रिकनाटककर्ता जगन्नाथ मैथिल. (३) अनंगविजय-भाणकर्ता श्रीनिवासाचा पुत्र जगन्नाथपण्डित. (४) सभातरंगकर्ता जगन्नाथमिश्र. (५) अद्वैतामृतकर्ता जगन्नाथसरस्वति. (६) समुदाय प्रकरण-

कर्ता जगन्नाथसूरि.(७) शरभराजविलासकर्ता जगन्नाथ (८) ज्ञानविलास–काव्यकर्ता नारायणदैवज्ञाचापुत्र जगन्नाथ; आणि अनुभोगकल्पतरुकर्ता जगन्नाथ. याप्रमाणें "जगन्नाथ" या नांवाचे अनेक पण्डित होऊन गेले; परन्तु ते सर्व सांप्रतच्या पंडित जगन्नाथरायाहून अगदीं भिन्न होते.

(१७) **आ**त्मस्तुति हा एक मोठा दोष पंडितजगन्नाथराय यांच्यांत आढळतो. उदाहरणार्थः—" श्रुतमात्रा वाक्यार्थं करतलबदरमिव निवेदयंती घटना प्रसादस्य । अयंच सर्वसाधारणो गुणः । उदाहरणान्यत्र प्रायशो मदीयानि सर्वाण्येव पद्यानि । (रसगं. अनन्०१ )." परंतु पंडितजगन्नाथरायकृत रसगंगाधरांतील प्रारंभीचे श्लोक आणि भामिनीविलासांतील शेवटचे श्लोक लक्षपूर्वक वाचले म्हणजे तो दोष खरोखरच क्षम्य आहे असें कोणासहि वाटल्या वाचून राहणार नाहीं. पंडित जगन्नाथराय यांची कवि या नात्यानें उत्तमोत्तम कवींतच गणना केली आहे. कारणकीं— कालिदास, भवभूति वगैरे मोठमोठ्या कवींसारखीच त्यांची योग्यता होती.त्यांचे मनोविकार उच्चप्रतीचे असून त्यांस प्रत्येक कामांत पावलोपावलीं चांगलेंच यश मिळत गेलें.स्वरमाधुर्याविषयीं त्यांची बिल्हण व जयदेव यांच्याशीं बरोबरी करण्यास कांहींएक हरकत नाहीं. "प्रसाद" हा एक त्यांच्या कवितेचा मुख्य व सर्वसाधारण गुण आहे, असें त्यांनींच कळविलें आहे तें यथार्थ आहे. गद्य लिहिणें व वादविवाद करणें, यांत पंडित जगन्नाथराय यांची जगत्प्रसिद्ध श्रीशंकराचार्य यांच्या खालोखाल योग्यता होती असें कोणीहि म्हणेल.



# संगीत गंगालहरी श्लोकांची सूची



॥ श्री ॥

# संगीत गंगालहरी



## मंगलाचरण.

( राग भूप. ताल त्रिताल. “ वंदन त्या ईशा ” ही चाल. )

॥ श्रीमंगलगंगा ॥ अभंगा ॥

॥ शिवोत्तमाङ्गा जी सुभगा ॥ ध्रु० ॥

॥ श्रीधरचरणक्षालनशीला ॥ स्वर्गी सुरवरपूजितविमला ॥

॥ सज्जनदुर्जनमज्जनतरला ॥ उद्धरि अधमाधमपतितांला ॥

॥ वन्दू ऐशी सागरगा* ॥ श्रीमंगलगंगा ॥ १ ॥

---

* सागराला जाऊन मिळणारी.

## साकी.

( राग जोगी. ताल धुमाळी. )

॥ जगन्नाथपंडितकृतगंगालहरीकाव्यसुरचना ॥
॥ संगीतें ही सुखवो प्रत्यहि सकलजनांच्या सुमनां ॥
॥ जन हो प्रेमभरें ॥ निशिदिनिं पठण करा सारे ॥ १ ॥



॥ श्री ॥

# संगित गंगालहरि.

गंगोदक प्रार्थना.

## १ श्लोक.

॥ समृद्धं सौभाग्यं सकलवसुधायाः किमपि तत् ॥
॥ महैश्वर्यं लीलाजनितजगतः खंडपरशोः ॥
॥ श्रुतीनां सर्वस्वं सुकृतमथ मूर्तं सुमनसाम् ॥
॥ सुधासौंदर्यं ते सलिलमशिवं नःशमयतु ॥ १ ॥

१ वामनी टीका.

॥ अशेषा भूतींचें विपुलतर सौभाग्य मिरवी ॥
॥ जगातें लीलेनें करि शिव तया भूतिपद वी ॥
॥ श्रुतींची तत्वोक्ती सुकृत विबुधांचेंचि अथवा ॥
॥ सुधा—बंधू तूझें सलिल अमुच्या नासु अशिवा ॥ १ ॥

## १ संगीत.

( राग काफी. ताल दीपचंदी. " अवन करो तुमचें " ही चाल. )

॥ दुरित लया नेवो ॥ असें तें पावन तव जल गंगे अमुचें ॥ध्रु०॥
॥ सौभाग्यचि जें या वसुधेचें ॥ सर्वस्वच गे जेंहि श्रुतींचें ॥
॥ साक्षात्पुण्य सुरांचें ॥ श्वेत सुधेसम तेज जयाचें ॥ दुरित०॥१॥

॥ परशु जयाचा नाशक रिपुला ॥ लीलेनें जो निर्मि जगाला ॥
॥ ऐशा श्रेष्ठ शिवाचें ॥ महदैश्वर्यचि कीर्तित साचें ॥ दुरित० ॥२॥

## १ भावार्थ.

सर्व पृथ्वीला पुष्कळ सौभाग्य देणारें, लीलेनें चौदा भुवनें निर्माण करणाऱ्या महादेवाचेंही मोठें ऐश्वर्यरूप, सर्व वेदांचें केवळ सार, इंद्रादि देवांचें मूर्तीमंत पुण्य, अमृताप्रमाणें मधुर आणि अमरत्व देणारें, असें जगप्रसिद्ध, हें गंगे ! तुझें उदक, आमच्या सर्व अशुभांचा (पातकांचा) नाश करो.

---

गंगाप्रवाहमहिमा.

## २ श्लोक.

॥ दरिद्राणां दैन्यं दुरितमथ दुर्वासनहृदाम् ॥
॥ द्रुतं दूरीकुर्वन्सकृदपि गतो दृष्टिसरणिम् ॥
॥ अपि द्रागाविद्याद्रुमदलनदीक्षागुरुरिह ॥
॥ प्रवाहस्ते वारां श्रियमयमपारां दिशतु नः ॥ २ ॥

२ वा. टी.

॥ दरिद्रांच्या दैन्या मलिन हृदयांच्या अघबला ॥
॥ हरी एक्यावारीं त्वरित पडतां नेत्रकमला ॥
॥ अविद्यावृक्षाचें हनन करि दीक्षागुरुच हा ॥
॥ तुझा देवू तोयप्रवह अमुतें भूतिनिवहा ॥ २ ॥

## २ संगीत.

( राग गौरी. ता. धुमाळी. "वीर शिरोमणि सकलधनुर्धर" ही चाल. )

॥ दीनजनांच्या एकवारही दृष्टिस पडतां क्षणीं ॥
॥ हरी जो दैन्य सकल सुरधुनि ! ॥
॥ दर्शनमात्रें पापिजनांचें पातक जो खंडुनि ॥
॥ करितो मुक्त त्यांस तारुनि ॥
॥ हा मायामय संसाररूप वृक्ष जो ॥
॥ वाढला असे वसुधेवरि या भार जो ॥
॥ छेदाया त्वरित तयास परम गुरुचि जो ॥
॥ उपदेशक जो प्रवाह ऐसा सकलांना त्रिभुवनीं ॥
॥ सुखवो अगणित धन देउनि ॥ २ ॥

## २ भावार्थ.

या लोकीं श्रीगंगेच्या प्रवाहास एकवारही पाहिलें असतां जो दरिद्र्यांचें दैन्य आणि पातकीजनांचें पापसुद्धां तत्काल नाश करणारा होऊन सर्व मायारूप वृक्षाच्या छेदनाचा उपदेशकर्ता जो गुरू होतो; तो हा, हे गंगे ! तुझ्या जळाचा प्रवाह आम्हांस अपार संपत्ति देवो.

---

श्रीगंगातरंगप्रार्थना.

## ३ श्लोक.

॥ उदञ्चन्मार्तण्डस्फुटकपटहेरम्बजननी-॥
॥ कटाक्षव्याक्षेपक्षणजनितसंक्षोभनिवहाः ॥
॥ भवन्तु त्वङ्गन्तो हरशिरसि गङ्गातनुभुव-॥
॥ स्तरङ्गाः प्रोतुङ्गा दुरितभयभङ्गाय भवताम् ॥ ३ ॥

३ वा. टी.

॥ उदेला मात्सर्यें गजवदनमाता स्वकपटें ॥
॥ कटाक्षांनें पाहे तरि मनि महा क्रोध झगटे ॥
॥ अशा आविर्भावें पृथुललहरी तूज उठती ॥
॥ शिरीं शंभूच्या त्या जनकलुष भंगूत *निगुती ॥ ३ ॥

३ संगीत.

( रा. कालंगडा ता. दादरा. " मदना, चंद्रा, सुवैरि तुम्ही जाहला" ही चाल

॥ गंगे ! ऐसे तरंग जनां लाभती ॥ ध्रु० ॥
॥ बालरवीसम, अरुणनयन कीं, पार्वतिचे होती ॥
॥ बघुनि जे ॥ तरंग जनां० ॥ १ ॥
॥ गिरिजेच्या ह्या, मत्सररोषें, कंपित जे दिसती ॥
॥ सदोदित ॥ तरंग जनां० ॥ २ ॥
॥ जणु ते सुंदर, नृत्य करोनी, शिवशिर भूषविती ॥
॥ सदोदित ॥ तरंग जनां० ॥ ३ ॥
॥ दिव्य तरंगीं, मज्जनयोगें, जनकलुषें टळती ॥
॥ सदोदित ॥ तरंग जनां० ॥ ४ ॥

३ भावार्थ.

उगवणाऱ्या सूर्याप्रमाणें आरक्त असल्यानें सापत्न भावरूप कप
दर्शक असे जे पार्वतीचे नेत्रकटाक्ष त्यांच्या संबंधानें कांहींवेळपा
ज्यांस मोठें भय उत्पन्न झालें आहे असें महादेवाच्या मस्तकीं कांप
श्रीगंगेचे जे अतिउच तरंग ते भक्तांच्या पातकांचा नाश करणारे होव

---

* लौकर.

गंगाश्रययाचना.

## ४ श्लोक.

॥ तवालम्बादम्ब स्फुरदलघुगर्वेण सहसा ॥
॥ मया सर्वेऽवज्ञासरणिमथ नीताः सुरगणाः ॥
॥ इदानीमौदास्यं भजसि यदि भागीरथि तदा ॥
॥ निराधारो हा रोदिमि कथय केषामिह पुरः ॥ ४ ॥

४ वा. टी.

॥ बळें आलंबाच्या तव जननि गर्वोद्धतमनें ॥
॥ अवज्ञेचे पंथीं सकळ सुर मी पावविदिने ॥
॥ अगे गंगे माझेविषयिं जरि चित्तीं *उबगसी ॥
॥ रहूं तेव्हां कोणाजवळि मज सांगे गति कशी ॥ ४ ॥

## ४ संगीत.

( राग भैरवी. ता. आदि. "वद जाउ कुणाला शरण" ही चाल )

॥ जो गर्व असे मज फार तुझ्या आधारबळानें गे ॥
॥ तव चरणकृपेनें जागे ॥ हे गंगे ! ॥
॥ बहु सुरवर अवमानिले अशा दृढ तुझ्याच विश्वासानें ॥
॥ घे सन्निध शिशुभावानें ॥ हे गंगे ॥
॥ जरि आतां मज उबगसी न तव दाविशी मातृममतेते ॥
॥ त्यागिल कीं गोवत्साते ॥ वद गंगे ॥
॥ तुजवीण कुणाला शरण जाउनी रडूं दुःख मम माते ॥
॥ दावी तव वात्सल्याते ॥ हे गंगे ॥ ४ ॥

---

* कंटाळसी

## ४ भावार्थ.

हे आई ! ( गंगे ) तुझ्या आश्रयाच्या बळानें महा गर्विष्ठ असा मी, मोठ्या उद्धटपणानें पुष्कळ देवांची अवज्ञा केली; कारण तुजवरच माझा दृढ विश्वास आहे. हे भागीरथी ! आतां जर तूं मला कंटाळशील आणि मातृप्रेम दाखविणार नाहींस तर मग गाईनें वासराचा त्याग केल्या प्रमाणेंच होईल म्हणून हे माते ! तुझ्यावाचून या जगांत कुणाला शरण जाऊन माझें दुःख रडूं हें तूंच सांग; आणि तुझें वात्सल्य मला दाखीव.

---

गंगाप्रवाहोदकरूपमूर्तीची प्रार्थना.

## ५ श्लोक.

॥ स्मृतिं याता पुंसामकृतसुकृतानामपि च या ॥
॥ हरत्यन्तस्तंद्रां तिमिरमिव चंद्रांशुसरणिः ॥
॥ इयं सा ते मूर्तिः सकलसुरसंसेव्य सलिला ॥
॥ ममान्तः संतापं त्रिविधमथ पापं च हरताम् ॥ ५ ॥

५ वा. टी.

॥ न केलें सत्कर्माचरण जरि ज्यांनींहि स्मरतां ॥
॥ तयांच्या जाड्यांतें हरसि तिमिरां जेवि सविता ॥
॥ अशी तूझी ते हे तनु सुरगणां सेव्यसकळां ॥
॥ त्रिधा माझ्या पापा अणिक हरु संताप सगळा ॥ ५ ॥

## ५ संगीत.

( राग काफीजिल्हा, ताल त्रिवट. “ विधितनये पावगे ” ही चाल. )

॥ संतापा ती हरो ॥ सुरगणसेवित उदकमूर्ति ॥ संतापा० ॥ ध्रु॥
॥ नित्यान्हिकही कधि नाचरती ॥ यत्स्मरणें आयासहि हरती ॥
॥ चंद्रकिरण तम नाशि तसें ॥ संतापा० ॥ १ ॥
॥ कायिकवाचिक मानसिकहि जे ॥ आध्यात्मिक दैविक भौतिक जे
॥ त्रिविधताप चित्तोद्भव मम ॥ संतापा ती हरो ॥ २ ॥

## ५ भावार्थ.

हे गंगे ! तुझी प्रवाहोदकरूप मूर्ति, नित्यान्हिकसुद्धां करीत नाहींत अशा पातकीजनांच्या स्मरणांत आली असतां तत्काल, चंद्राची कांती ज्याप्रमाणें अंधःकाराचा नाश करते त्या प्रमाणें त्यांच्या अंतःकरणांतील अज्ञानरूप आलस्याचा नाश करते; तीही सर्व देवांनीं भक्तिपुरस्सर सेवन केलेली तुझी प्रवाहोदकरूपमूर्ति माझ्या अंतःकरणांतील आध्यात्मिक, आधिदैविक आणि आधिभौतिक अशा त्रिविध तापांचा तसेंच कायिक, वाचिक, मानसिक अशा त्रिविधपापांचा नाश करो.

---

**गंगातीरनिवासी मोक्षाला तुच्छ मानतात.**

## ६ श्लोक.

॥ अपि प्राज्यं राज्यं तृणमिव परित्यज्य सहसा ॥
॥ विलोलद्वानीरं तव जननि तीरं श्रितवताम् ॥

॥ सुधातः स्वादीयः सलिलभरमातृप्ति पिबताम् ॥
॥ जनानामानंदः परि हसति निर्वाण पदवीम् ॥ ६ ॥

६ वा. टी.

॥ त्यजोनी साम्राज्यां तृणसदृश जे कां शुभमति ॥
॥ तुझ्या तीरीं वेतावलिललित नीरांत वसती ॥
॥ सुधेहूनी स्वादू सलिल पिउनी तृप्त जन जे ॥
॥ तयांच्या आनंदें गुणरहित मोक्षास हसिजे ॥ ६ ॥

## ६ संगीत.

( रा. पिलू. ताल धुमाळी. "बळसागर तुम्ही वीर शिरोमणि" ही चाल.)

॥ विशालराज्या तृणवत्मानुनी सहसा हे नृपती ॥
॥ कंपित वेतसवृक्षाच्छादित तव तीरीं वसती ॥
॥ अमृताहुनि जें परम रुचिर गे उदक तुझें म्हणती ॥
॥ परमानंदें पूज्य विमल जल ते प्राशन करिती ॥
॥ ऐशा हर्षामाजीं बहुजन मग्न सदा होती ॥
॥ शाश्वत ऐशा मोक्षसुखाला तुच्छचि कीं गणिती ॥ ६ ॥

## ६ भावार्थ.

हे माते ! सर्व पृथ्वीच्या हि राज्यास तृणाप्रमाणें मानून, जेथें वेतसवृक्ष वाऱ्यानें हालत आहेत अशा दाट छाया असलेल्या तुझ्या तीराचा आश्रय करून राहणाऱ्या आणि अमृताहून स्वादिष्ट अशा तुझ्या निर्मळ जलाचें यथेच्छ पान करणाऱ्या लोकांचा आनंद मोक्षमार्गासमुद्धां हसत आहे.

---

गंगोदकस्पर्शमहिमा.

### ७ श्लोक.

॥ प्रभाते स्नातीनां नृपतिरमणीनां कुचतटी- ॥
॥ -गतो मातर्यावन्मिलति तव तोयैर्मृगमदः ॥
॥ मृगास्तावद्वैमानिकशतसहस्रैः परिवृता ॥
॥ विशन्ति स्वच्छन्दं विमलवपुषो नन्दनवनम् ॥ ७ ॥

७ वा. टी.

॥ नृपस्त्रीवक्षोजीं मृगमद विभूषार्थ असतां ॥
॥ प्रभातस्नानें तो जननि तव तोयांत मिळतां ॥
॥ क्षणें देवश्रेणीसह मृग तया नंदनवनीं ॥
॥ स्वइच्छेनें जाती अति विमल देहास धरुनी ॥ ७ ॥

### ७ संगीत.

( राग अलैया बिलावल्. ता. दीपचंदी. " अरसिक कितिहा " ही चाल )

॥ नृपवर सुंदर युवती ॥
॥ स्नानास प्रभातीं तव जळिं येती ॥
॥ तत्कुचकस्तुरि मग ती ॥
॥ तव जलसंसर्गें पावन होती ॥
॥ कस्तुरिमृगकुलपंक्ती ॥
॥ ते देवांसह नंदनवनिं रमती ॥ ७ ॥

### ७ भावार्थ.

हे आई ! प्रभातकाळीं स्नानास येणाऱ्या सुंदर राजस्त्रियांच्या

स्तनमंडलास लावलेली कस्तुरी, तुझ्या उदकानें ज्यावेळीं भिजते त्याचवेळीं, ती कस्तुरी ज्यांच्यापासून उत्पन्न झाली ते कस्तुरीमृग, हजारो देवांनीं सेव्यमान असे दिव्य देही होऊन, यथेच्छ क्रीडा करावयास इंद्राच्या नंदनवनांत प्रवेश करितात.

---

गंगानामस्मरणमहिमा.

## ८ श्लोक.

॥ स्मृतं सद्यः स्वान्तं विरचयति शान्तं सकृदपि ॥
॥ प्रगीतं यत्पापं झटिति भवतापं च हरति ॥
॥ इदं तद्गङ्गेति श्रवणरमणीयं खलु पदम् ॥
॥ मम प्राणप्रान्ते वदनकमलान्तर्विलसतु ॥ ८ ॥

८ वा. टी.

॥ मना आणी शांती स्मरण करितां ते क्षणभरीं ॥
॥ गितीं गातां पापा त्वरित भवतापाप्रति हरी ॥
॥ अहो ! तें हें कर्णी मधुरतर गङ्गापद असें ॥
॥ असो प्राणत्यागीं मुखकमळिं माझ्या समरसें ॥ ८ ॥

## ८ संगीत.

( रा. लीलांबरी. ता. धुमाळी. “ समरीं अभिमन्यु पडला ” ही चाल )

॥ विलसो, प्राणान्तःकाळीं ॥ “गंगा”, नामचि मुखकमलीं ॥ध्रु०॥
॥ स्मरतां, क्षणभरिं हो ज्यातें ॥ त्वरितचि, हृदय शांत होतें ॥
॥ संतत, गातां अघ हरतें ॥ सत्वर, भवभीतिही टळते॥
॥ रमणिय, वाटे श्रुतियुगुलीं ॥ तारक, भवमायाजालीं ॥ ८ ॥

## ८ भावार्थ.

ज्याचें क्षणभर स्मरण केलें असतां मनाला तत्काळ शांतता वाटते; आणि जें सतत गाइलें असतां पाप व भवताप यांचा नाश करितें; तें हें कर्णाला मधुर लागणारें "गंगा" असें नाम (पद) प्राणान्तःकाळीं माझ्या मुखांत विलसो.

---

गंगातीरनिवासमहिमा.

## ९ श्लोक.

॥ यदन्तः खेलन्तो बहुलतरसंतोषभरिता ॥
॥ न काका नाकाधीश्वरनगरसाकाङ्क्षमनसः ॥
॥ निवासाल्लोकानां जनिमरणशोकापहरणम् ॥
॥ तदे तत्ते तीरं श्रमशमनधीरं भवतु नः ॥ ९ ॥

९ वा. टी.

॥ जलामध्यें क्रीडा करुनि बहु तोषेंचि असती ॥
॥ तया काकांचेही सुरपतिपुरीं काम नसती ॥
॥ निवासें लोकांचें हरि जनिमृती दुःख मनिंचें ॥
॥ असें तूझें तीर श्रम परिहरू सर्व अमुचे ॥ ९ ॥

## ९ संगीत.

( रा. झिंझोटी. ता. दादरा. "वैशाखमास वासंतिक" ही चाल. )

॥ तव तीर सदा श्रमशमनीं प्रबल तें असो ॥
॥ जन्ममरणदुःखहि त्या आश्रयें नसो ॥ ध्रु० ॥

॥ जे काकपक्षि तीरिं अशा नित्य राहती ॥
॥ खेळुनि तव उदकिं सतत हर्ष पावती ॥
॥ इंद्रपुरीं क्रीडा ते कधिं न इच्छिती ॥
॥ तीर असें अवलोकुनि मोद मनिं वसो ॥ ९ ॥

९ भावार्थ.

हे जननी ! ज्या तुझ्या तीराचे ठायीं क्रीडा करणारे काकपक्षी, मोठ्या आनंदांत निमग्न होऊन स्वर्गसुखाची सुद्धां इच्छा करीत नाहींत; आणि जें तीर निवास करण्याऱ्या सर्व जनांचे जन्ममरणादि शोक घालविते; तें तुझें तीर आमच्या श्रमांचा परिहार करण्याविषयीं समर्थ होवो.

---

गंगेचें ब्रम्हरूपत्वानें वर्णन.

१० श्लोक.

॥ न यत्साक्षाद्वेदैरपि गलितभेदैरवसितम् ॥
॥ न यस्मिन्जीवानां प्रसरति मनोवागवसरः ॥
॥ निराकारं नित्यं निजमहिमनिर्वासिततमो ॥
॥ विशुद्धं यत्तत्वं सुरतटिनि तत्वं न विषयः ॥ १० ॥

१० वा. टी.

॥ दिसेना जें वेदां गतनिखिल भेदांसि नयनीं ॥
॥ न जेथें जीवांची प्रसरति मनोवाक्यसरणी ॥
॥ अकारा नाशातें त्यजुनि निजरूपींच वसणें ॥
॥ जया तत्वांतें तूं विषय म्हणती मूढमतिनें ॥ १० ॥

## १० संगीत.

( रा. पिलू. ता. धुमाली. “ उद्धवा शांतवन कर जा ” ही चाल )

॥ श्रुति शुद्ध ब्रह्म जें वदते ॥ हे गंगे ! तूंच सदा तें ॥ ध्रु. ॥
॥ प्रत्यक्ष वेद अद्वैतें ॥ न च शकती वर्णाया तें ॥
॥ जीवांचीही मति थकते ॥ कथिती न मनोवाक्या ते ॥
॥ अविनाशि सदा जें राहे ॥ साकार कोणिहि न पाहे ॥
॥ निजतेजें नाशि तमा हें ॥ तें त्रिभुवनिं तूंच जनांते ॥
॥ हे सुरवरपूजितगंगे ! ॥ तूं इंद्रियविषय न माते ! ॥ १० ॥

## १० भावार्थ.

हे गंगे ! जें ब्रह्म अद्वैत अशा वेदांनींही प्रत्यक्ष जाणिलें नाहीं; जेथें जीवांच्या वाणीचा व मनाचा व्यापार चालत नाहीं; असें आकाररहित, निरंतर राहणारें स्वप्रकाशानें अज्ञानांधःकाराचा नाश करणारें मायातीत जें ब्रह्म तें तूंच आहेस. इतर विषय ( नाशवंत ) नाहींस.

---

गंगेचें निरूपमत्व.

## ११ श्लोक.

॥ महादानैर्ध्यानैर्बहुविधवितानैरपि च यन्न—॥
॥ लभ्यं घोराभिः सुविमलतपोराशिभिरपि ॥
॥ अचिन्त्यं तद्विष्णोः पदमखिलसाधारणतया ॥
॥ ददाना केनासि त्वमिह तुलनीया कथय नः ॥ ११ ॥

११ वा. टी.

॥ महादानें ध्यानें व्रतनियमयज्ञादिक विधि ॥
॥ इहीं जें लाभेना विमलतपकर्त्यांसहि कधीं ॥
॥ असें तें विष्णूचें पद सहज तूं देशि ललिते ॥
॥ समत्वीं त्यां तू ते कवण तुलिजे सांग अमुते ॥ ११ ॥

## ११ संगीत.

( रा. कालंगडा. ता. धुमाळी. "वीराभ्रमरा जन्मुनि सार्थक" ही चाल. )

॥ महादानें ध्यानें बहुविध यज्ञहि जन करिती ॥
॥ दारुण शुद्ध तपाचरती ॥
॥ ऐशा कष्टेंही जें दुर्लभ अचिंत्य या जगतीं ॥
॥ श्रीवरविष्णुपदप्राप्ती ॥
॥ समदृष्टीनें तें पद देसी तीच खरी मुक्ती ॥
॥ ऐशी थोर तुझी शक्ती ॥
॥ अन्य कोण तुलनेस तुझ्या ह्या जगीं पात्र होती ॥
॥ वद तूं मज हे भागिरथी ॥ ११ ॥

## ११ भावार्थ.

हे भागीरथी ! मोठमोठ्या दानांनीं, ध्यानांनी, नाना प्रकारच्या यज्ञांनीं आणि परमकष्टसाध्य अशा निर्मळ तपांच्या राशींनींही जें प्राप्त होत नाहीं, तें अचिंत्य श्रीविष्णुपद ( वैकुंठ किंवा मोक्ष ) सर्वांस सारखेपणानें देणारी तूं कोणाबरोबर तुलना करण्यास योग्य आहेस ? हें आम्हांस सांग. ( वास्तवीक, तुझी उपमा देण्यास कोणीच योग्य नाहीं. )

गंगेला शिवानें मस्तकावर धारण केली.

## १२ श्लोक.

॥ नृणामीक्षामात्रादपि परिहरन्त्या भवभयम् ॥
॥ शिवायास्ते मूर्तेः क इह महिमानं निगदतु ॥
॥ अमर्षम्लानायाः परममनुरोधं गिरिभुवो ॥
॥ विहाय श्रीकंठः शिरसि नियतं धारयति याम् ॥१२॥

### १२ वा. टी.

॥ विलोकीतां जीतें भवभय जनांचें परिहरी ॥
॥ तया त्वन्मूर्तीचा अतुलमहिमा कोण विवरी ॥
॥ अतिक्रोध खिन्नें करि हट उमा तो न गणुनीं ॥
॥ प्रयत्नें श्रीशंभू तुज निजशिरीं ठेवि जननी ॥ १२ ॥

## १२ संगीत.

( रा. सारंग. ता. धुमाळी. " कालि गंडिका शिळा चक्रांकित " चाल )

॥ प्रवाहमूर्ती तुझी गंगे सकलांना मंगल करिते ॥
॥ दर्शनमात्रें पावन करुनी लोकांचें भवभय हरिते ॥ ध्रु० ॥
॥ थोर तुझी लीला वर्णाया तीव्रमतिहि कुंठित होते ॥
॥ ब्रह्माविष्णूशिवही थकले काय करिल नर वर्णन तें ॥
॥ सपत्नि तव कीं गिरिजा माता रोष धरुनि जेव्हां बसते ॥
॥ सोडुनि तिजला शिव धरि तुज शिरीं थोरवि फारही तुज मिळते ॥ १२ ॥

## १२ भावार्थ.

हे गंगे ! सापत्नभावापासून उत्पन्न झालेल्या क्रोधानें अति खिन्न

अशा पार्वतीचें करावयाचें जें सांत्वन तें न करतां श्रीशंकर मोठ्या प्रेमानें तुला मस्तकीं धारण करितो. अशा तुझ्या दर्शनमात्रें करूनच मनुष्यांचें संसारभय दूर करून कल्याण करणाऱ्या तुझ्या मूर्तीचा महिमा या जगांत कोण बरें वर्णन करूं शकेल ?

---

गंगेचा पापनाशकशक्तिप्रभाव.

## १३ श्लोक.

॥ विनिन्द्यान्युन्मत्तैरपि च परिहार्याणि पतितै- ॥
॥ रवाच्यानि व्रात्यैः सपुलकमपास्यानि पिशुनैः ॥
॥ हरन्ती लोकानामनवरतमेनांसि कियताम् ॥
॥ कदाप्यश्रान्ता त्वं जगति पुनरेका विजयसे ॥ १३ ॥

१३ वा. टी.

॥ मदोन्मत्तव्रात्याधमपतितपैशुन्यनिकरीं ॥
॥ इहीं हीं जीं त्रासें त्यजियलि सकंपें अतिदुरीं ॥
॥ जनांचीं तीं पापें सतत शमवीतां न शिणली ॥
॥ अशी तूंची एक प्रकटविभवें नांदसि भली ॥ १३ ॥

## १३ संगीत.

( रा. खमाज. ता. धुमाळी. " पंचतुंड नररूंडमालधर " ही चाल. )

**कवणाचें तुज सहाय नसतां, महापातकें तूं हरिशी ॥**
**॥ या व्यासंगें श्रान्त नससि जगीं, तूच सदा विजयी होसी ॥**

॥ विनिन्द्य ऐशीं मत्तजनांसी ॥ पापें पतितां त्याज्य तशीं ॥
॥ भ्रष्टां कंपित जीं वाच्यांशीं ॥ रोमांचित कीं कुजनांसी ॥
॥ रौरवदर्शक जीं मनुजांसी ॥ ऐशा या पातकराशी ॥
॥ निशिदिनिं जागृत राहुनि गंगे, सदैव त्यां खंडन करिशी ॥१३॥

## १३ भावार्थ.

हे आई ! उन्मत्तपुरुषांनाहि निंदा करण्यास योग्य, ज्यांना प्रायश्चित्तच नाहीं अशा पतितांनींही टाकलेलीं, ज्यांचे गर्भादानादि संस्कार झाले नाहींत अशा व्रात्यांनींहि रोमांचित होऊन त्यागिलेलीं अशा पुष्कळ लोकांच्या पातकांच्या राशींचा निरंतर नाश करणारी आणि कधींहि श्रम न पावणारी अशी तूंच एक या जगांत विजय पावतेस.

---

गंगेचे गुणच तिच्या बंधनास कारण झाले.

## १४ श्लोक.

॥ स्खलन्ती स्वर्लोकादवनितलशोकापहृतये ॥
॥ जटाजूटग्रन्थौ यदसि विनिबद्धा पुरभिदा ॥
॥ अये निर्लोभानामपि मनसि लोभं जनयताम् ॥
॥ गुणानामेवायं तव जननि दोषः परिणतः ॥ १४ ॥

१४ वा. टी.

॥ अलीसी स्वर्लोकाहुनि अवनिच्या शोकहरणीं ॥
॥ अशा तूंते बांधी शिवनिजकपर्दीं निशिदिनीं ॥

॥ अर्थी निर्लोभाला उपजविति लोभा गुण असे– ॥
॥ तुझे त्यांचा प्रादुर्भव जननि ऐसा फळतसे ॥ १४ ॥

## १४ संगीत.

( रा. कल्याण ता. धुमाळी० " नंद गृहाच्या जवळ मुलींनो "...ही चाल ).

॥ स्वर्गाहुनि तूं शोक जगाचा, शमवाया येसी ॥ जननी ॥ ध्रु० ॥
॥ निर्मळ तव गुण, ऐसे पाहुनि ॥ निर्लोभी शिव लुब्धचि होउनि ॥
॥ तुजसि जटेंतचि, टाकि बांधुनि ॥ पाडिति गुण तुजला ॥ बंधनिं ॥ १ ॥
॥ चित्ताकर्षक, अशा गुणांवरीं ॥ दोषारोपण तें बंधन करी ॥
॥ बोले तो शुक, मधुर रवें जरी ॥ बंधन त्या मिळतें ॥ निश्चिदिनिं ॥ २ ॥
॥ स्वर्गाहुनि तूं० ॥ १४ ॥

## १४ भावार्थ.

हे जननी ! भूमंडळाचा शोक घालविण्यासाठीं स्वर्गातून पतन पावणारी तूं, महादेवाच्या जटाजूटामध्यें बंधन पावली आहेस त्या अर्थीं हें उघड आहे कीं–निर्लोभी पुरुषांच्या मनांत लोभ उत्पन्न करणाऱ्या तुझ्या गुणांचाच हा दोष बंधनरूपानें परिणाम पावला आहे. उदाहरणः–पोपट मधुर बोलतो या त्याच्या गुणामुळेंच त्याला अहोरात्र पिंजऱ्यांत बंदिवास प्राप्त झाला आहे.

---



<u>गंगा ही दिव्य औषधी.</u>

### १९ श्लोक.

॥ जडानन्धान्पंगून्प्रकृतिबधिरानुक्तिविकलान् ॥
॥ ग्रहग्रस्तानस्ताखिलदुरितनिस्तारसरणीन् ॥
॥ निलिम्पैर्निर्मुक्तानपि च निरयान्तर्निपततो ॥
॥ नरानम्ब त्रातुं त्वमिह परमं भेषजमसि ॥ १९ ॥

१५ वा. टी.

॥ जडांधा पंगूते बहु बधिर वाणीविकल जे ॥
॥ ग्रहद्वेषी ज्यांचें अघहनन यत्नें न घडिजे ॥
॥ सुरींही सोडीले कुनर नरकाचेचि गमनीं ॥
॥ अशांते रक्षाया पटु जननि तूं औषध गुणी ॥ १९ ॥

### १९ संगीत.

( रा. जिल्हा. ता. धुमाळी. "अजि अक्रुर हा नेतो श्रीकृष्णाला" ही चाल. )

**॥हे जननी तूं दिव्य औषधी असशी॥ताराया जगिं सकलांसी॥ध्रु०॥**
**॥जड अंधहि जे पंगू बधिरनरांसी ॥ वाणीनें रहित अशांसी ॥**
**॥नवग्रहीं सदा पीडित जे ॥ अघवारणपंथ रहित जे ॥**
**॥भवतारणिं जे देवें त्यक्त नरांसी ॥ जे जाति घोर नरकासी ॥**
**हे जननी तूं० ॥ १९ ॥**

### १९ भावार्थ.

हे अंब ! या लोकीं आळशी, आंधळे, पांगळे, जन्मापासून बहिरे, मुके, वेड लागलेले, ज्यांना शास्त्रांत कोणतेंच प्रायश्चित्त सांगितलें

नाहीं असे आणि देवांकडूनही ज्यांचें संरक्षण होत नाहीं अशांना आणि घोर नरकांत पडणाऱ्या मनुष्यांना तारावयास तूं अमरत्व देणारें दिव्य औषध आहेस.

---

गंगागौरव सगरपुत्र गातात.

### १६ श्लोक.

॥ स्वभावस्वच्छानां सहजशिशिराणामयमपा- ॥
॥ -मपारस्ते मातर्जयति महिमा कोऽपि जगति ॥
॥ मुदा यं गायन्ति द्युतलमनवद्यद्युतिभृतः ॥
॥ समासाद्याद्यापि स्फुटपुलकसान्द्राः सगरजाः ॥ १६ ॥

१६ वा. टी.

॥ स्वभावें जी स्वच्छें सहज अतिशीतें तव जळें ॥
॥ तयांच्या उत्कर्षें यश सकळ लोकांत उजळे ॥
॥ जया गाती तोषें सगरसुत रोमांच भरुनी ॥
॥ गति स्वर्लोकीं त्या तव विमवयोगेंचि जननी ॥ १६ ॥

### १६ संगीत.

( “ अभाग्याच्या घरीं बाबा कामधेनु आली ” ही चाल. )

॥ लोकोत्तर तव अपार महिमा गाजे उदकाचा ॥
॥ जय जय पावत सकल जगीं जो ! अद्यापी साचा ॥ध्रु०॥
॥ स्वाभाविक निर्मल तव जल कीं सकल महीवरतीं ॥
॥ आयासाविण शीतल जयिं हो जन पावन होती ॥

॥ सगराचे सुत दिव्य होउनी स्वर्गलोकिं वसती ॥
॥ रोमांचित ते होउनि गाती प्रभाव गंगेचा ॥ १६ ॥

## १६ भावार्थ.

स्वभावानें निमळ व थंडगार अशा तुझ्या उदकाचा अगाध महिमा जगांत अद्याप गाजत आहे; तो असा कीं तुझ्या उदकस्पर्शानें दिव्य देह पावणारे व ज्यांचे अंगावर रोमांच उभे राहिले आहेत असे सगरराजाचे पुत्र स्वगलोकीं अद्यापी आनंदानें तुझा महिमा गात आहेत.

---

गंगा सर्व तीर्थांपेक्षां श्रेष्ठ.

## १७ श्लोक.

॥ कृतक्षुद्रैनस्कानथ झटिति संततमनसः ॥
॥ समुद्धर्तुं सन्ति त्रिभुवनतले तीर्थनिवहाः ॥
॥ अपि प्रायश्चित्तप्रसरणपथातीतचरितान् ॥
॥ नरान्दूरीकर्तुं त्वमिव जननि त्वं विजयसे ॥ १७ ॥

१७ वा. टी.

घडे दैवें किंचित् कलुष परि संतापति मनीं
अशांते ताराया असति बहु तीर्थे त्रिभुवनीं
जया प्रायश्चित्तें नसति कुनरां दे गति अशी
समर्था या लोकीं तुजसम अयी तूंचि असशी ॥ १७ ॥

## १७ संगीत.

( रा. कालंगडा. ता. दादरा. " मधुसुदनमदनमूर्तिहरी वदनिं या वदा " चाल )

॥ तुजवीण जगीं, दुजि उपमा, तुजसि गे ! नसे ॥ ध्रु० ॥
॥ अल्पान्यायाचरुनि ॥ त्वरितचि परितप्त मनीं ॥
॥ अशा जनां पापशमनि ॥ सुयश तुज असे ॥ १ ॥
॥ ताराया त्यांस जरी ॥ बहुतीर्थें वसुधेवरि ॥
॥ गंगे ! तुज सर्वोपरि ॥ श्रेष्ठता असे ॥ २ ॥
॥ शुद्ध व्हावया जयांस ॥ मार्ग न शास्त्रांत खास ॥
॥ तारिशी अशा खलांस ॥ जलसुधारसें ॥ ३ ॥ १७ ॥

## १७ भावार्थ.

हे गंगे ! पलांडू भक्षणादि लघु पातकें करूनसुद्धां तत्काळ पश्चात्ताप पावणाऱ्या मुनुष्यांना पावन करणारी त्रिभुवनांत पुष्कळ तीर्थें आहेत; परंतु ज्यांच्या पातकांस प्रायश्चित्ताचा मार्गच नाहीं अशा मनुष्यांना पावन करणारी तुझ्यासारखी तूंच आहेस.

---

गंगेचें शरीर त्रिविधताप दूर करो.

## १८ श्लोक.

॥ निधानं धर्माणां किमपिच विधानं नवमुदां ॥
॥ प्रधानं तीर्थानाममलपरिधानं त्रिजगतः ॥
॥ समाधानं बुद्धेरथ खलु तिरोधानमधियाम् ॥
॥ श्रियामाधानं नः परिहरतु तापं तव वपुः ॥ १८ ॥

१८ वा. टी.

॥ अगार श्रेयाचें सकलजन संतोष अवनी ॥
॥ अशेषा तीर्थांची गुरु रुचिर जीची त्रिभुवनीं ॥
॥ मतीसी सौख्या दे मलिन मतिला दुर्लभ रुचि ॥
॥ असें धाम श्रीचें तव वपु हरू आग अमुची ॥ १८ ॥

## १८ संगीत.

( रा. झिंझोटी. ता. धुमाळी. “ उद्या बघ जातें नृपसिंहासन रामातें. ” चाल. )

॥ तुझी तनु माते ॥ वारो मम भवतापातें ॥ ध्रु० ॥
॥ श्रेष्ठ स्थानचि तूं धर्मांचें॥ नूतन सुघटित आनंदाचें ॥
॥ म्हणविसि मुख्य तीर्थ जगताचें ॥
॥ त्रैलोक्यातें ॥ परिधानचि सोज्वळ दिसतें ॥ १ ॥
॥ शंकानिरसन तूं बुद्धीचें ॥ आच्छादन तूं जडपुरुषांचें ॥
॥ साधन उत्तम मोक्षश्रीचें ॥ गंगे ! तूंते ॥ जडलें मातेचें नातें ॥१८॥

## १८ भावार्थ.

हे गंगे ! वेदोक्त धर्माचें स्थान आणि नव्यानव्या हर्षास उत्पन्न करणारें, सर्व तीर्थांचा राजा, त्रैलोक्याचें निर्मळ वस्त्र, बुद्धीच्या कुकल्पना घालवून सर्व शंकांचें समाधान करणारें, जडपुरुषांचें आच्छादन आणि मोक्षाच्या संपत्तीचें संपादक असें तुझें शरीर आमचा त्रिविधताप दूर करो.

---

गंगेचा वियोग हा मोठा अपराध.

## १९ श्लोक.

॥ पुरो धावंधावं द्रविणमदिराघूर्णितदृशाम् ॥
॥ महीपानां नानातरुणतरखेदस्य नियतम् ॥
॥ ममैवायं मंतुः स्वहितशतहंतुर्जडधियो ॥
॥ वियोगस्ते मातर्यदिह करुणातः क्षणमपि ॥ १९ ॥

१९ वा. टी.

॥ मदें श्रीच्या अंधप्रभु म्हणविती मद्यपि जसे ॥
॥ पुढें त्यांच्या धांवें श्रमसहित मी लोभ विवशें ॥
॥ मतीच्या मंदत्वें त्यजुनि तुज नाशी हितशता ॥
॥ अयी हा माझाची अनय करुणा तूज उचिता ॥ १९ ॥

## १९ संगीत.

(रा. बिलावल. ता. दादरा. (कामदा) "जन्म घेति ते कोणत्या कुळीं" ही चाल).

॥ द्रव्यमदबलें भ्रमित दृष्टिचे ॥ नृप अनेक जे बहुत देशिंचे ॥
॥ तत्समीप मी धांव धांवलो ॥ परि अधीक गे खेद पावलो ॥
॥स्वहित सर्व कीं धुळिस मिळविलें॥ शस्त्र निजशिरीं मीच मारिलें॥
॥तव वियोग हा दोष जाहला॥ पाहि जान्हवी सदय तू मला॥१९॥

## १९ भावार्थ.

हे आई! या लोकीं तुझा वियोग ( स्नान न घडणें ) घडला हा माझाच अपराध आहे; आणि द्रव्यरूप मद्याच्या योगानें ज्यांच्या दृष्टि फिरून गेल्या आहेत अशा अनेक राजांपुढें पैशाच्या लोभानें

धांवतां धांवतां मोठे श्रम पावणारा आणि स्वहित पराङ्मुख होणारा मंदबुद्धि असा मी आहे; म्हणून मजवर क्षणभर तरी दया कर.

---

गंगोदक जन्मजालाचा नाश करो.

## २० श्लोक.

॥ मरुल्लीलालोलल्लहरिलुलिताम्भोजपटली- ॥
॥ -स्खलत्पांसुव्रातच्छुरणविसरत्कौंकुमरुचि ॥
॥ सुरस्त्रीवक्षोजक्षरदगरुजम्बालजटिलम् ॥
॥ जलं ते जम्बालं मम जननजालं जरयतु ॥ २० ॥

२० वा. टी.

॥ स्फुरे वायू तेणें उठति लहरी तैं कमळिंचा ॥
॥ गळे रेणू तेणें सलिल विलसे कुंकमरुचा ॥
॥ जया देवस्त्रींच्या स्तनअगरुचा पंक मिसळे ॥
॥ बहु धांवे ऐसें तव जळ हरूं जन्म सगळें ॥ २० ॥

## २० संगीत.

( रा. झिंझोटि ता. त्रिवट. “ शैवालें युक्त जैसें ” ही चाल. )

॥ वायूच्या स्फुरणवेगें तव लहरी उसळती ॥
॥ त्यायोगें पंकजांचे गुच्छ बहू डोलती ॥
॥ अभिनव ते कुसुमरेणु तव उदकीं मिसळती ॥
॥ जणु कांती केशराची जळिं दिसते स्पष्ट ती ॥ १ ॥
॥ सुरयुवतीकुचतटीं जें चंदन गे चर्चिलें ॥
॥ तव उदकीं क्रीडनानें मिश्रित तें जाहलें ॥

॥ शैवालें युक्त ऐसें जळ मजला लाभलें ॥
। चुकवो तें जन्मजाला निशिदिनिं मी वंदिलें ॥ २० ॥

## २० भावार्थ.

हे गंगे ! वायूच्या संचारानें हालणाऱ्या लहरींच्या योगानें कंपायमान होणाऱ्या कमळांच्या समूहापासून पडणारा जो रजःकणांचा समुदाय त्याच्या लेपनानें केशराप्रमाणें लाल कांती ज्याची पसरली आहे आणि देवांगनांच्या स्तनापासून स्नान करतेसमयीं गलित झालेल्या कृष्णागरुच्या कर्दमानें व्याप्त व शेवाळानें युक्त असें तुझें उदक माझ्या जन्ममरणांचा नाश करो.

---

गंगेचा उत्कर्ष.

## २१ श्लोक.

॥ समुत्पत्तिः पद्मारमणपदपद्मामलनखा- ॥
॥ -न्निवासः कन्दर्पप्रतिभटजटाजूटभवने ॥
॥ अथायं व्यासङ्गो हतपतितनिस्तारणविधौ ॥
॥ न कस्मादुत्कर्षस्तव जननि जागर्तु जगतः ॥ २१ ॥

२१ वा. टी.

॥ बरी उत्पत्ती श्रीरमणचरणांच्या नखिहुनी ॥
॥ असावें शंभूच्या निशिदिनिं जटाजूटभवनीं ॥
॥ जपावें सर्वस्वें सतत पतितोद्धारकरणीं ॥
॥ नसावें कां माते ! तरि मग तुझ गौरव जनीं ॥ २१ ॥

## २१ संगीत.

( रा. बिलावल ता. त्रिवट " प्रतीकूल होइल कैसा कृष्णदेव माते " ही चाल. )

॥ विजय कां न जागे तव गे, सकल या जगासी- ॥
॥ सदा पूज्य असशी गंगे, श्रेष्ठ तूंच होसी ॥ ध्रु० ॥
॥ रमाकांतचरणनखांतुनी उगम तुझा झाला ॥
॥ जटाजूटिं स्मररिपुच्या तूं वास नित्य केला ॥
॥ तारिशी सदा व्यासंगें, पतितहतजनाला ॥
॥ जगीं तुझ्या ऐशा असतां दिव्य कीर्तिराशी ॥
॥ विजय कां० ॥ २१ ॥

## २१ भावार्थ.

हे गंगे ! तुझी उत्पत्ति श्रीविष्णूच्या चरणकमलनखांपासून आहे. स्थिति श्रीशंकराच्या जटाजूटरूप गृहामध्यें आहे; आणि हा तुझा व्यासंग ( उद्योग=सतत वाहणें ) शस्त्रादिकांनीं मारलेल्या आणि पतित यांच्या उद्धाराविषयीं आहे; म्हणून सर्व जगाला तुझा उत्कर्ष कां बरें जागृत नसावा ?

---

गंगेचें निरुपमत्व.

## २२ श्लोक.

॥ नगेभ्यो यान्तीनां कथय तटिनीनां कतमया ॥
॥ पुराणां संहर्तुः सुरधुनि कपर्दोऽधिरुरुहे ॥
॥ कया वा श्रीभर्तुः पदकमलमक्षालि सलिलै- ॥
॥ -स्तुलालेशो यस्यां तव जननि दीयेत कविभिः ॥ २२ ॥

२२ वा. टी.

॥ नद्या शैलाहूनी किति न निघती त्या क्षितितळीं ॥
॥ वदावें शंभूच्या शिरिं गुरुपणें कोण जडली ॥
॥ स्वतोयें कोणें श्रीदयितचरणालागिं धुतलें ॥
॥ जियेतें योजावें जव तुज न लेशाप्रति भले ॥ २२ ॥

## २२ संगीत.

( साकी. रा. जोगी. ता. धुमाळी. )

॥ शैलोद्भवसरितांमाजीं तूं सागरगा म्हणवीसी ॥
॥ त्यांतुनि कोणीं शिवोत्तमांगा भूषविलें कैलासीं ॥
॥ गंगे ! वद मजला ॥ वर्णूं किति ही तव लीला ॥ १ ॥
॥ अथवा कोणीं हरिपदकमलां उदकें क्षालन केलें ॥
॥ तव उपमेचा, लेश तरि कुणा, द्यावा कविनें विमले ! ॥
॥ थोरवि, ही तुजला ॥ झडकरिं, तोडी भवजालां ॥२२॥

## २२ भावार्थ.

हे जननी ! कवींनीं ज्या नदीचे ठाईं तुझ्या उपमेचा थोडा तरी अंश दिला आहे अशी नदी कोणती आहे ? हे गंगे ! पर्वतापासून निघणाऱ्या नद्यांमध्यें कोणत्या नदीनें महादेवाचा जटाजूट आरोहण केला ? त्याचप्रमाणें श्रीविष्णूचें चरणकमल आपल्या उदकानें कोणीं क्षालन केलें ? हें तूंच आम्हांस सांग.

---

## गंगेचें महत्व–इतर देवांपेक्षां.

### २३ श्लोक.

विधत्तां निःशंकं निरवधिसमाधिं विधिरहो ॥
सुखं शेषे शेतां हरिरविरतं नृत्यतु हरः ॥
कृतं प्रायश्चित्तैरलमथ तपोदानयजनैः ॥
सवित्री कामानां यदि जगति जागर्ति जननि ॥ २३ ॥

### २३ वा. टी.

॥ अनुष्ठो एकांतीं निरवधिसमाधीप्रति विधी ॥
॥ निजो शेषीं सौख्यें हरिहर करो तांडवविधी ॥
॥ तपें कृच्छ्रें दानें उगलि* यजमानासि न पवे ॥
॥ प्रदात्री कामांची जरि जगिं तुझी मूर्ति मिरवे ॥ २३ ॥

### २३ संगीत.

( रा. मांड. ता. दादरा. "मज भीति नसे मरणाची कांहिं अंतरीं" चाल. )

॥ सुयश तुझें जागृत जरि त्रिभुवनीं असे ॥
॥ इष्टसिद्धिविषयिं जनां काळजी नसे ॥ ध्रु० ॥
॥ निःशंकें चिरसमाधि विधि तरी करो ॥
॥ शेषावरि श्रीपतिही शयनसुख वरो ॥
॥ श्रीशिव नटघटितांडव सतत अनुसरो ॥
॥ यज्ञदान कृच्छ्रतपहि दिसति व्यर्थसे ॥
॥ सुयश तुझें जागृत जरि त्रिभुवनीं असे ॥ २३ ॥

---

* उगीच राहो.

## २३ भावार्थ.

हे मातुश्री ! जगाचे मनोरथ पूर्ण करणारी जर तूं जागृत आहेस, तर ब्रह्मदेव अमर्याद समाधी निःशंकपणें करो; विष्णू शेषावर सुखानें शयन करो; महादेव निरंतर तांडवनृत्य करो; प्रायश्चित्ताची तर मुळींच गरज नाहीं; तसेंच कृच्छ्रचांद्रायणादितपें, गजाश्वादि दानें, आणि यज्ञयाग देवपूजादि आराधनांची ही गरज नाहीं; हें मोठेंच आश्चर्य होय ! !

---

गंगेविषयीं मातृप्रेम.

## २४ श्लोक.

॥ अनाथः स्नेहार्द्रां विगलितगतिः पुण्यगतिदाम् ॥
॥ पतन्विश्वोद्धर्त्रीं गदविगलितः सिद्धभिषजम् ॥
॥ सुधासिंधुं तृष्णाकुलितहृदयो मातरमयम् ॥
॥ शिशुः संप्राप्तस्त्वामहमिह विदध्याः समुचितम् ॥ २४ ॥

### २४ वा. टी.

॥ अनाथस्नेहाळे गतिविहिन मी तूं सुगतिदा ॥
॥ जगोद्धारा तूं मी पतित गद मी तूं अरि गदा ॥
॥ सुधाब्धी तूं मी जो तृषित अयि तूझा शिशु असा ॥
॥ तशा तूंते आलों शरणपथ योजी उचितसा ॥ २४ ॥

## २४ संगीत.

( रा. भूपाळी. ता. धुमाळी. " कृतांत पुरुषा असा " ही चाल. )

**॥ शरणागत पाडसा ॥ गंगे ॥ पथ योजी उचितसा ॥ ध्रु० ॥**
**॥ अनाथ मी परि, दयार्द्र गे तूं ॥ विगलितगति मी, सद्गतिदा तूं ॥**
**॥ तूं गुरु मी शिष्यसा ॥ गंगे ॥ १ ॥**
**॥ रोगपिडित मी, सिद्धवैद्य तूं ॥ तृषाकुलित मी, सुधासिंधु तूं ॥**
**॥ शिशु मी तव ल्हानसा ॥ माते ॥ २४ ॥**

## २४ भावार्थ.

हे भागीरथी माते ! अनाथ, गतिरहित, पतित, रोगग्रस्त, आणि तृषेनें व्याकुळ झालेला हा मी तुझा बालक आणि तू स्नेहानें द्रवलेली, सुगति देणारी, जगाचा उद्धार करणारी, सिद्धवैद्य आणि अमृताची नदी, अशी माझी मातुश्री त्या तुला मी शरण आलों आहे; तर या समयीं तूं योग्य ज ( शरणागताचें रक्षण ) तें कर.

---

गंगेच्या कथेचा महिमा.

## २५ श्लोक.

**॥ विलीनो वै वैवस्वतनगरकोलाहलभरो ॥**
**॥ गता दूता दूरं क्वचिदपि परेतान्मृगयितुम् ॥**
**॥ विमानानां व्रातो विदलयति वीथीर्दिविषदाम् ॥**
**॥ कथा ते कल्याणी यदवधि महीमण्डलमगात् ॥ २५ ॥**

२५ वा. टी.

॥ विराले निःशेषें यमनगरिचे जे गलबले ॥
॥ पहाया प्रेतांचे अवनिं फिरती दूत उगले ॥
॥ विमानांच्या संघें विबुधपथ सोडी स्वनियमा ॥
॥ जसा आला भूमीं सुखकर तुझा कीर्तिमहिमा ॥ २९ ॥

## २५ संगीत.

( रा. सारंग. ता. धुमाळी. " बाळा जो जो रे कुलभुषणा " ही चाल. )

॥ जेव्हां पासुनि ही, पुण्यकथा, लोकीं प्रसिद्ध झाली ॥
॥ दुःखित कलकल जी, यमपुरिची, त्वरित लयाला गेली॥
॥ गर्दी दूतांची, मृत घ्याया, दूर विदेशिं पळाली ॥
॥ विमानसमुदायें, विबुधांची, पथपंक्ती तुडवीली ॥ २९ ॥

## २५ भावार्थ.

हे आई ! जेव्हांपासून तुझी पुण्यप्रद कथा भूमंडळावर प्रसिद्ध झाली, तेव्हांपासून यमपुरींतील पातक्यांचा भयंकर कलकलाट अगदीं नाहींसा झाला. यमाचे दूतसुद्धां तुझी जेथें कथा नाहीं अशा दूर प्रदेशीं मेलेल्या प्राण्यांचा शोध करावयास गेले. सांप्रत तुझ्या स्नान, पान, कथाश्रवणादि पुण्यानें झालेल्या देवांच्या विमानांचा समुदाय, देवांच्या मार्गाचा अवरोध करीत आहे.

---

गंगाजलतुषारसामर्थ्य.

## २६ श्लोक.

॥ स्फुरत्कामक्रोधप्रबलतरसंजातजटिल- ॥
॥ -ज्वरज्वालाजालज्वलितवपुषां नः प्रतिदिनम् ॥
॥ हरन्तां संतापं कमपि मरुदुल्लासलहरि— ॥
॥ -च्छटाचञ्चत्पाथःकणसरणयो दिव्यसरितः ॥ २६ ॥

२६ वा. टी.

॥ स्फुरे कामक्रोधज्वर बहुकरालार्चिक बनीं ॥
॥ जळे तेणें काया जननि अमुची ही प्रतिदिनीं ॥
॥ महोर्मींच्या योगें उसळति तुझे तोयकण ते ॥
॥ तया संतापाते शमवुत अहो देवसरितें ॥ २६ ॥

## २६ संगीत.

( रा. कर्नाटकीपैकीं, ता. दादरा " थाटमाट सदनिं नवा " ही चाल.)

॥ अतुल पवनवेगें तव लहरि उसळती ॥
॥ त्यायोगें जलधारा बहुत पसरती ॥ ध्रु० ॥
॥ कामादी षड्रिपुची ज्योति पेटुनी ॥
॥ पोळविते तनुला ती प्रखर निशिदिनीं ॥
॥ व्यर्थ सकल औषधि ह्या ज्वर निवारणीं ॥
॥ जलधारा वारी ज्वर, ताप दे अती ॥ २६ ॥

## २६ भावार्थ.

हे सुरधुनि ! अशा तुझ्या वायुवेगानें उत्पन्न झालेल्या ज्या लहरींच्या ( लाटां ) परंपरा, त्यायोगें हालणाऱ्या जलतुषारांच्या

ज्या पंक्ती त्या, अहोरात्र स्फुरण पावणाऱ्या कामक्रोधांनीं अतिशयेंकरून प्रदीप्त झालेल्या ज्या संसारतापाच्या ज्वाला त्यांनीं पोळलें आहे शरीर ज्यांचें अशा आमचा, औषधादिकांनीं अपरिहार्य जो संसाररूप ताप, त्याचा नाश करोत.

---

गंगोदकसंचय संसारताप दूर करो.

२७ श्लोक.

**॥ इदं हि ब्रह्माण्डं सकलभुवनाभोगभवनम् ॥**
**॥ तरङ्गैर्यस्यान्तर्लुठति परितस्तिंदुकमिव ॥**
**॥ स एष श्रीकण्ठप्रविततजटाजूटजटिलो ॥**
**॥ जलानां संघातस्तव जननि तापं हरतु नः ॥ २७ ॥**

२७ वा. टी.

॥ अहो हे ब्रह्माण्डाकृति सकललोकांसह बरी ॥
॥ रुळे जेथें उर्मी भ्रमणविवशें तिंदुकपरी* ॥
॥ असा तो हा मृत्युंजयपृथुकपर्दीं जडिनला ॥
॥ तुझा श्रीतोयौघ प्रशमन करूं पापवहिला ॥ २७ ॥

२७ संगीत.

( राग जोगी. ता. धुमाळी “ जाते कीं मम शकुंतला ही ” ही चाल. )

**॥ चौदा भुवनोत्पत्तिस्थानचि ब्रह्माण्डहि ऐसें ॥**
**॥ डुलत तरंगें उदकामध्यें तिंदुकफल जैसें ॥**

---

* टेंबुरणीचें फळ.

॥ ऐसा जो तव जलौघ पशुपतिजटाजूटिं विलसे ॥
॥ अमुच्या दुःखा नाशो गंगे! मी तुज विनवितसे ॥२७॥

## २७ भावार्थ.

हे जननी! ज्या तुझ्या प्रवाहांत चौदाभुवनांतील लोकांच्या सर्व सुखांचें घरच आहे असें हें ब्रह्माण्ड लाटांनीं टेंबुर्णीच्या फळाप्रमाणें इकडे तिकडे फिरत आहे; असा हा शंकराच्या विस्तृत जटाजूटांत राहिलेला तुझ्या जलाचा जो प्रवाह तो आमच्या तापांचा नाश करो.

---

गंगा सर्व तीर्थांचा गर्व खंडन करणारी आहे.

## २८ श्लोक.

॥ त्रपन्ते तीर्थानि त्वरितमिह यस्योद्धृतिविधौ ॥
॥ करं कर्णे कुर्वन्त्यपि किल कपालिप्रभृतयः ॥
॥ इमं तं मामम्ब त्वमियमनुकंपार्द्रहृदये ॥
॥ पुनाना सर्वेषामघमथनदर्पं दलयसि ॥ २८ ॥

२८ वा. टी.

॥ जयाच्या उद्धाराविषयिं बहु तीर्थेंहि पळती ॥
॥ स्वकानीं हस्तांते मग शिव शिवादीक धरिती ॥
॥ असा मी त्या मातें पुनित करिशी तूं जननि ये ॥
॥ जगीं पापघ्नांच्या हरिसि गुरु गर्वास सदये ॥ २८ ॥

## २८ संगीत.

( रा. भूप. ता. झंपा. " अधम क्षिति पालका असशि भूपा " चाल. )

॥ अखिल भुवनानुकंपार्द्रहृदये ॥
॥ तारि तूं मज त्वरित जन्हुतनये ॥ ध्रु० ॥
॥ विविध तीर्थें ममोद्धृतिस जगिं तरि किती ॥
॥ मजसि अवलोकुनी दूर पळती ॥
॥ धुर्जटिप्रभृति जे सुरहि भय पावती ॥
॥ उद्धराया स्वकर कर्णि देती ॥ अखिल भुवनानु० ॥ १ ॥
॥ अधम पतिता अशा दुर्जना तारुनी ॥
॥ दाविसी जगिं अतुल शौर्य जननी ॥
॥ सकल सुर गर्वबलखंडनें सुरपुरीं ॥
॥ खिन्नमुख दीन होतील भारी ॥ अखिल भुवनानु० ॥२८॥

## २८ भावार्थ.

हे दयार्द्रहृदये माते ! या लोकीं माझ्या उद्धाराविषयीं गोदावर्यादि तीर्थें मला पाहतांच लाजून दूर पळतात; आणि श्रीशंकरादि देवसुद्धां भय पावून निश्चयानें आपल्या कानांवर हात ठेवतात; म्हणून मला पावन करणारी तूंच, त्या सर्व तीर्थांचा पापनाशनाविषयीं गर्व खंडन करीत आहेस.

---

गंगेची स्तुति करावयास मी नरपशु समर्थ नाहीं.

## २९ श्लोक.

॥ श्वपाकानां व्रातैरमितविचिकित्साविचलितै- ॥
॥ -र्विमुक्तानामेकं किल सदनमेनः परिषदाम् ॥
॥ अहो मामुद्धर्तुं जननि घटयन्त्याः परिकरम् ॥
॥ तव श्लाघां कर्तुं कथमिव समर्थो नरपशुः ॥ २९ ॥

२९ वा. टी.

॥ श्वपाकांच्या श्रेणीहुनि बहुत नीचांत गणना ॥
॥ न मर्यादा पापा अघसदन मी एकचि म्हणा ॥
॥ अशाला ताराया कटि कसुनि होसी निज सखे ॥
॥ कशी तूझी श्लाघा द्विपदपशु जो तो करुं शके ॥ २९ ॥

## २९ संगीत.

( विलंब काल. ता. दीपचंदी. " पुष्पपराग सुगंधित शीतल " ही चाल. )

॥ अगणित संशययुक्त नराधम, जे त्यजिती अघसंचय हा ॥
॥ सकल अशा दुरितांचें केवल, विकट समूहागार हा ॥ ध्रु० ॥
॥ त्या माझ्या तारणिं तूं गंगे, प्रबल दृढ कटी कसली ॥
॥ स्तोत्रपठण तव सतत कराया, नरपशुसम मी शक्त न हा ॥२९॥

## २९ भावार्थ.

हे जननी ! अगणित पातकें करावीं किंवा न करावीं असा संशय घेऊन शेवटीं त्या पातकांपासून मुक्त झालेल्या चांडाळांनींही त्याग केलेल्या पापांचें केवळ घरच अशा माझ्या उद्धारासाठीं कंबर बांधणाऱ्या तुझी स्तुति करावयास मनुष्यांमध्यें पशु सारखा जो मी तो कसा समर्थ होईन ?

"हे गंगे ! तूं आपली इच्छा माझ्या उद्धारानें सफल कर."

### ३० श्लोक.

॥ न कोऽप्येतावन्तं खलु समयमारभ्य मिलितो ॥
॥ यदुद्धारादाराद्भवति जगतो विस्मयभरः ॥
॥ इतीमामीहां ते मनसि चिरकालं स्थितवती-॥
॥ -मयं संप्राप्तोऽहं सफलयितुमम्ब प्रणय नः ॥ ३० ॥

३० वा. टी.

॥ न कोणीही ऐसा अजिवरि मला प्राप्त जन कीं ॥
॥ ज्याच्या उद्धारें अखिल अवनी मस्तक तुकी* ॥
॥ अशी इच्छा पोटीं बहु दिवस होती तुज तिला ॥
॥ कराया मी आलों सफळ समजो भाव तुजला ॥ ३० ॥

### ३० संगीत.

( राग शंकराभरण. ता. दादरा "अंगिकार करुनि इचा" ही चाल )

॥ चंड पाप खंडुनिमज नेइ सुगतिला ॥
॥ म्हणुनि दास तव सन्निध शीघ्र पातला ॥ ध्रु० ॥
॥ पापि असे आजवरीं त्वां न देखिले ॥
॥ उद्धारें ज्यांच्या जगिं नवल जाहलें ॥
॥ तारुनि मज अजरामर सुयश घे भलें ॥
॥ सफल करिन जें मनिं त्वां दीर्घ चिंतिलें ॥ ३० ॥

### ३० भावार्थ.

ज्यांच्या उद्धारानें एकाएकीं जगाला मोठें नवल वाटेल असा

* डोलवी.

पापी, हे मातुश्री, मला आजपावेतों कोणीहि मिळाला नाहीं; अशी ही तुझ्या मनांत फार दिवस राहिलेली इच्छा सफळ करावयास हा मी पापी प्राप्त झालों आहे; तर तूं मला आतां उत्तम गतीला पोंहचीव.

---

गंगेवाचून अशा पातक्याचें कोण मुखावलोकन करील ?

### ३१ श्लोक.

॥ श्ववृत्तिव्यासंगो नियतमथ मिथ्याप्रलपनम् ॥
॥ कुतर्केष्वभ्यासः सततपरपैशून्यमननम् ॥
॥ अपि श्रावंश्रावं मम तु पुनरेवं गुणगणा- ॥
॥ -नृते त्वत्को नाम क्षणमपि निरीक्षेत वदनम् ॥ ३१ ॥

३१ वा. टी.

॥ स्वभाव श्वानाचा तदुपरि असत्यार्थ वदनीं ॥
॥ कुतर्की घोकावें अनवडि परपैशून्यमननीं ॥
॥ असे माझे दोष प्रचुर गुण कानीं परिसुनी ॥
॥ मुखा पाहे कोण क्षणहि तुजवाचूनि जननी ॥ ३१ ॥

### ३१ संगीत.

( रा. झिंझोटि. ता. धुमाळी. "अंजनी गीताच्या चालीवर" )

॥ श्वानवृत्तिचें वर्तन केलें ॥ मिथ्याभाषण हें व्रत धरिलें ॥
॥ कुत्सित तर्काध्ययन हि झालें ॥ निशिदिनिं हे गंगे ! ॥ १ ॥
॥ परपैशून्यीं मन कीं रमलें ॥ गुणगण ऐसे ऐकुनि सगळे ॥
॥ कोण क्षण तरी पाहिल असलें ॥ मुख तुजविण गंगे ॥ ३१ ॥

## ३१ भावार्थ.

हे माते ! कुत्र्यासारखें जिकडे तिकडे फिरून पोट भरणें हा उद्योग; नेहमीं खोटें बोलण्याचें जणु काय व्रतच धरिलें आहे; कुतर्काविषयीं अभ्यास; आणि वारंवार दुसऱ्याच्या निंद्यकर्माचें चिंतन; असे माझे पुष्कळ दुर्गुण ऐकून घेऊन हे आई ! तुझ्यावांचून दुसरें कोण बरें एक क्षणभर तरी माझ्या मुखाकडे पाहील ?

---

गंगेचें स्नानपान न करणाऱ्यांना धिःकार असो.

## ३२ श्लोक.

॥ विशालाभ्यामाभ्यां किमिह नयनाभ्यां खलु फलम् ॥
॥ न याभ्यामालीढा परमरमणीया तव तनुः ॥
॥ अयं हि न्यक्कारो जननि मनुजस्य श्रवणयो- ॥
॥ -र्ययोर्नान्तर्यातस्तव लहरिलीलाकलकलः ॥ ३२ ॥

३२ वा. टी.

॥ वृथा ते मोठेही नयन तुझि ज्यांहीं तनु कधीं ॥
॥ विलोकीली नाहीं जरि जननि लावण्य उदधी ॥
॥ न वर्णावें त्याला अधम नर कर्णाकृति बिळा ॥
॥ न ऐकीला जींहीं मधुर तव लीलागलबला ॥ ३२ ॥

## ३२ संगीत.

( रा. बिलावल. ता. धुमाळी " सफलेच्छा ती करिन सुरांची " ही चाल )

॥ ज्या मानवनेत्रांनीं जगतीं ॥ देखिलि नच तव तनुची कांती ॥
॥ नयन असे जरि विशाल असती ॥ व्यर्थचि समजावे ॥मनुजा॥
॥ अजागलीं स्तन निष्फळ होतीं ॥ त्यांसम मानावें ॥ मनुजा ॥१॥
॥ तव लहरीलीलामंजूध्वनि ॥ येत नसे जरि मानवकर्णीं ॥
॥ धिक्कार असो ऐशा श्रवणीं ॥ असुनिहि फुकटचि ते ॥मनुजा॥
॥ मंगलदर्शन दिव्यतनूचें ॥ मोक्षप्रद होतें ॥ मनुजा ॥ ३२ ॥

## ३२ भावार्थ.

हे माते ! ज्या नेत्रांनीं तुझी दिव्य मूर्ती पाहिली नाहीं; ते विशाळ असले तरी व्यर्थ समजावें. तसेंच ज्या कानांनीं तुझ्या लहरीचा मंजुळ ध्वनि ऐकिला नाहीं ते कानसुद्धां असून फुकट समजावें. ( येथें जो इंद्रियांचा धिक्कार केला आहे तो मनुष्यांचाच समजावा; कारण इंद्रियें मनुष्याधीन आहेत )

---

गंगा–प्रदेशांत पापपुण्यांचा भेदाभेद नाहीं. तेथील सर्व लोकांस मुक्ति.

## ३३ श्लोक.

॥ विमानैः स्वच्छन्दं सुरपुरमयंते सुकृतिनः ॥
॥ पतन्ति द्राक् पापा जननि नरकान्तः परवशाः ॥
॥ विभागोऽयं तस्मिन्नशुभमयमूर्तौ जनपदे ॥
॥ न यत्र त्वं लीलादलितमनुजाशेषकलुषा ॥ ३३ ॥

३३ वा. टी.

॥ घडे ज्याला पुण्याचरण तिहिं जावें सुरपुरीं ॥
॥ पडावें पापिष्टीं विषमनरकीं घोर विवरीं ॥
॥ व्यवस्था ऐशी हे अशुभमय देशांतचि असे ॥
॥ तुझी लीला जेथें सकल अघहर्त्री न विलसे ॥ ३३ ॥

## ३३ संगीत.

( रा. जंगला. ता. धुमाळी. " भूपती खरे हे वैभव सुख सेवीती " ही चाल. )

॥ सुरपुरीं पुण्यजन सुखें विमानीं जाती ॥
॥ यमदूत दुर्जनां त्वरित रौरवीं नेती ॥
॥ हा भेद वसत तेथेंची, ज्या स्थळीं- ॥
॥ तव पापमोचनी लीला, न च मुळीं ॥
॥ तो देश अशुभमय म्हणती, भूतळीं ॥
॥ हा अगाध महिमा तुझा असे ज्या प्रांतीं ॥
॥ तेथील सुजनदुर्जनां देसि तूं सुगती ॥ ३३ ॥

## ३३ भावार्थ.

हे जननी ! पुण्यवान पुरूष, विमानांत बसून स्वर्गाचे ठायीं स्वच्छन्दपणें गमन करतात आणि पापीपुरुष यमदूतांचे स्वाधीन होऊन तत्काल नरकांत पडतात; ही लोकांची व्यवस्था, जेथें तुझ्या लीलामात्रेंकरून मनुष्याचें सर्वपाप घालविणारी तूं नाहींस त्या पापरूपी देशांतच असो. ( जेथें तूं आहेस तेथील सज्जन दुर्जन सर्वच स्वर्गीं जातात. )

---

गंगाजलांत देहविसर्जन करून महापातकीसुद्धां स्वर्गाला जातात.

## ३४ श्लोक.

॥ अपि घ्नन्तो विप्रानविरतमुशन्तो गुरुसतीः ॥
॥ पिबन्तो मैरेयं पुनरपि हरन्तश्च कनकम् ॥
॥ विहाय त्वय्यन्ते तनुमतनुदानाध्वरजुषा- ॥
॥ मुपर्यम्ब क्रीडन्त्यखिलसुरसंभावितपदाः ॥ ३४ ॥

३४ वा. टी.

॥ वधीती विप्रांते, सतत गुरुदारा निरत जे ॥
॥ हरावें स्वर्णांते, मलिन मदिरापानहि किजे ॥
॥ महत्पापी ऐसे त्यजिति निज देहां तव तिरीं ॥
॥ करीती क्रीडा ते कृतमखनरांहूनि उपरी ॥ ३४ ॥

## ३४ संगीत.

( "तस्कराहातीं, द्विजगोधन हरिलें" ही चाल )

॥ ब्रह्महत्येचें ॥ पातक जे करिती ॥ गुरुस्त्रीरतखल जे असती ॥
॥ मद्यपानाचे ॥ पापा आचरिती ॥ कनकही दुष्टबुद्धि हरती ॥
॥ महापापांचे ॥ दुर्ग असे रचिती ॥ तव जळीं स्वतनू जे त्यजिती॥
॥ सुरहि स्वर्गींचे ॥ मान तया देती ॥ कृतमखाहूनि श्रेष्ठ गणिती॥
॥ अमरलोकांचें ॥ सत्पद मिळविती ॥ रमुनि ते कृतार्थ म्हणवीती

## ३४ भावार्थ.

हे गंगे ! ब्रह्महत्या करणारे, गुरुपत्नीचा अभिलाष करणारे, मद्यपी, सुवर्ण चोरणारे असे महापातकीसुद्धां अंतःकाळीं तुझ्या

पुण्यजळांत देह विसर्जन करूनच सर्व देवांसह पूज्य ( मान्य ) होऊन महादानें व यज्ञ करणाऱ्या पुरुषांपेक्षांही वरच्या लोकीं जाऊन क्रीडा करतात.

---

गंगालहरीसंसर्गप्रभाव.

## ३५ श्लोक.

॥ अलभ्यं सौरभ्यं हरति सततं यः सुमनसाम् ॥
॥ क्षणादेव प्राणानपि विरहशस्त्रक्षतहृदाम् ॥
॥ त्वदीयानां लीलाचलितलहरीणां व्यतिकरात् ॥
॥ पुनीते सोऽपि द्रागहह पवमानस्त्रिभुवनम् ॥ ३५ ॥

३५ वा. टी.

॥ सुगंधा पुष्पांचें हरण नियमें संतत किने ॥
॥ वियोगाच्या शस्त्रेंक्षत हरिति तत्प्राणहर जे ॥
॥ असा वायू तूझा चलितलहरीयोगविभवें ॥
॥ स्वसंचारें माते ! करि भुवन हें शुद्ध अवघें ॥ ३५ ॥

## ३५ संगीत.

( राग गौरी. ता. धुमाळी. " वसंतीं बघुनि मेनकेला " ही चाल )

॥ मारुत परम धन्य होतो ॥
॥ अलभ्य ऐशा पुष्पसुगंधा चोरुनि जो नेतो ॥
॥ अथवा विरहिजनां धरितो ॥
॥ विरहाग्नीनें व्याकुल त्यांचे प्राणहि तो हरितो ॥

॥ असा जरि पातकि म्हणवीतो ॥
॥ तव लहरीसंपर्कें पावन त्रिभुवनही करितो ॥
॥ विस्मय ह्या मनिं उपजवितो ॥
॥ गंगे ! तव हा प्रभावझेंडा जगीं उभारीतो ॥ ३५ ॥

## ३५ भावार्थ.

हे माते ! तुझा वायू पुष्पांतील अप्राप्त सुगंध नेहमीं चोरतो आणि स्त्रीपुत्रादिकांच्या वियोगरूप शस्त्रानें भिन्नहृदय झालेल्या पुरुषांचे प्राणही हरण करितो; असा तुझा वायू, तुझ्या लीलेनें हालणाऱ्या लहरींच्या संपर्कानें तत्काल सर्व त्रिभुवनही पावन करितो; हें केवढें आश्चर्य ! ! !

---

गंगेवर जगन्नाथपंडिताचा दृढ विश्वास.

## ३६ श्लोक.

॥ कियन्तः संत्येके नियतमिह लोकार्थघटकाः ॥
॥ परे पूतात्मानः कति च परलोकप्रणयिनः ॥
॥ सुखं शेते मातस्तव खलु कृपातः पुनरयम् ॥
॥ जगन्नाथः शश्वत्त्वयि निहितलोकद्वयभरः ॥ ३६ ॥

३६ वा. टी.

॥ किती या लोकांच्या स्थितिस सुमती सांग करिती ॥
॥ पवित्रात्मे कोणी सतत परलोकांस जपती ॥

॥ कृपापांगे तूझ्या सुखरुप निजे मी धणिवेरी ॥
॥ समर्पूनी लोकद्वय जननि चिंता तुजवरी ॥ ३६ ॥

## ३६ संगीत.

(रा. भूपाळी. ता. धुमाळी. "दिसती जो जो शैलांचीं तीं शिखरें स्पष्ट मला" ही चाल.)

॥ परोपकारी ऐसे सज्जन या लोकीं असती ॥
॥ अन्य बहुतजन शुद्धाचरणें स्वर्लोका जपती ॥
॥ परि लोकद्वयभर माझा गे आहे तुजवरती ॥
॥ वत्सावरि या मातृप्रेमा सतत धरीं चित्तीं ॥
॥ "कृपामजवरी करिशिल" ऐशा विश्वासें जगतीं ॥
॥ गंगे घेई जगन्नाथ हा निद्रासुखशांती ॥ ३६ ॥

## ३६ भावार्थ.

या जगांत कितिएक लोक परोपकार करणारे आहेत; आणि कितिएक तपादि आचरणानें पवित्र देह होऊन परलोकीं जाणारे आहेत; हा जगन्नाथपंडित तर, हे आई गंगे ! तुझ्यावर इहपरलोकींचा सर्व भार ठेवून तुझ्या कृपेनेंच निरंतर निद्रासुख अनुभवीत आहे.

---

गंगेचें प्रेम पातक्यांना तारण्याविषयीं कमी होत नाहीं.

## ३७ श्लोक.

॥ भवत्या हि व्रात्याधमपतितया खण्डपरिषत् ॥
॥ परित्राणस्नेहः श्लथयितुमशक्यः खलु यथा ॥

---

१ पोटभर, हवातितका.

॥ ममाप्येवं प्रेमा दुरितनिवहेष्वंब जगति ॥
॥ स्वभावोऽयं सर्वैरपि खलु यतो दुष्परिहरः ॥ ३७ ॥

३७ वा. टी.

॥ जगीं जे का व्रात्यादिक अधम देह प्रकटले ॥
॥ तया रक्षावें ही अविट करुणा तूज न टळे ॥
॥ सुटेना तैसेंची दुरितविषयीं प्रेम मज कीं ॥
॥ स्वभावाते कोणी त्यजि जनि अशी गोष्ट लटकी ॥ ३७ ॥

## ३७ संगीत.

(राग लीलांबरी. ता. धुमाळी. "गंगानदि ती सागर सोडुनी कूपा मिळण्या धांवे" ही चाल)

॥ अधमाधम जे पतित असंस्कृत पेशा पापिजनांला ॥
॥ "उद्धाराया प्रेम शिथिल" हें अशक्य जैसें तुजला ॥
॥ "पातकराशीविषयीं प्रेमा म्या सोडावा असला"
॥ माते! तैसें अशक्य मज हें मानि सत्य वचनाला ॥
॥ जन्मापासुनि स्तुत्य निंद्य जो स्वभाव देहीं जडला ॥
॥ जावा कैसा ? वद मज गंगे! सत्वरि या दीनाला ॥३७॥

## ३७ भावार्थ.

संस्काररहित आणि नीच पुरूष जिच्या मध्यें पडून मरण पावले आहेत अशा तुला, त्या पडलेल्या प्रेतावयवांच्या उद्धाराविषयीं स्नेह कमी करण्यास जसें अशक्य आहे, तसेंच पापाचरणाविषयीं माझाही प्रेमा कमी होणें अशक्य आहे; कारण, या जगांत सर्वांनीं स्वतःचा देहस्वभाव टाकणें अशक्य आहे.

---

गंगालहरींचें ताण्डव भक्तांचा ताप दूर करो.

### ३८ श्लोक.

॥ प्रदोषान्तर्नृत्यत्पुरमथनलीलोद्धृतजटा- ॥
॥ -तटाभोगप्रेङ्खल्लहरिभुजसन्तानविधुतिः ॥
॥ बिलक्रोडक्रीडज्जलडमरुटङ्कारसुभग- ॥
॥ -स्तिरोधत्तां तापं त्रिदशतटिनीताण्डवविधिः ॥ ३८ ॥

३८ वा. टी.

॥ जटाशंभूनृत्यें हलु न हलती वीचिहि मधीं ॥
॥ तुझ्या तेची जाणो भुज करिति लास्योचितें[1] विधि ॥
॥ महादोळें वाजे जळ निकर तो तोंचि डमरू ॥
॥ असा तूझा नृत्योत्सव जननि तापा प्रतिहरू ॥ ३८ ॥

### ३८ संगीत.

( रा. कालंगडा ता. दादरा "हा सकल देह रक्तचंदनें विलेपिला." चाल )

॥ हा त्रिविधताप वारो तव दिव्य नृत्य तें ॥
॥ जनचित्ता रमवुनि जें फार सुखवितें ॥ ध्रु० ॥
॥ सायान्हीं त्रिपुरारी ॥ हर्षभरें ताण्डव करि ॥
॥ जटाघात करितां तरी ॥ उदक कांपतें ॥ हा त्रिविध० ॥१॥
॥ चपल अशा तव लहरी ॥ जणू भुजा शंकरशिरिं ॥
॥ करिति कुशल नटापरी ॥ त्रिविधभाव ते ॥ हा त्रिविध० ॥२॥
॥ उदक तुझें तटविवरीं ॥ डमरूपरी शब्द करी ॥
॥ सरस अशा ताण्डवभरिं ॥ चित्त रंजतं ॥ हा त्रिविध० ॥३८॥

---

१ नृत्याला योग्य.

## ३८ भावार्थ.

प्रदोषकाळीं नृत्य करणाऱ्या शंकरानें लीलेनें मस्तकावर अस्ता- त नाचविलेल्या ज्या जटा त्यांचें जें आजुबाजूचा पतनपावर्णे तेणें- र हालणाऱ्या ज्या लहरी तेच जणु काय श्रीगंगेचे हस्त त्यांच्या ण्यानें व कांपविण्यानें युक्त असा आणि परस्पर मिळणाऱ्या लह- ा मध्यभागीं क्रीडा करणारें जें जळ, तोच जणु डमरू, त्याच्या नें सुंदर असा गंगेचा ताण्डवविधि भक्तांचा ताप दूर करो.

---

ी निष्कपट करुणा.

## ३९ श्लोक

। सदैव त्वय्येवार्पितकुशलचिंताभरमिमम् ॥
। यदि त्वं मामम्ब त्यजसि समयेऽस्मिन्सुविषमे ॥
। तदा विश्वासोऽयं त्रिभुवनतलादस्तमयते ॥
। निराधारा चेयं भवति खलु निर्व्याजकरुणा ॥ ३९ ॥

३९ वा. टी.

॥ तुझे ठायीं ठेवी निज कुशलचिंता निशिदिनीं ॥
॥ तया मातें जेव्हां त्यजसि विषमीं विश्वजननी ॥
॥ अनाथस्नेहाळे त्रिजगिं तर्हि विश्वासचि बुडे ॥
॥ निराधारी झालें सहज मग कारुण्य उघडें ॥ ३९ ॥

## ३९ संगीत

(दिंडी. रा. लीलांबरी ता. दादरा.)

॥ " कोण तारिल हा अधम असा प्राणी " ॥
॥ सतत चिंता ही सत्य मी त्यजूनी ॥
॥ सकल कलुषांचा भार तुझ्याडोई ॥
॥ सदा अर्पुनि अजवरी स्वस्थ पाही ॥
॥ त्यजसि आतां जरि कठिन समयिं माते ॥
॥ तारणीं तव विश्वास दृढ जनांते ॥
॥ त्रिभुवनांतुनि मग आजि नष्ट झाला ॥
॥ असें म्हणतां ये डाग तव यशाला ॥ ३९ ॥

## ३९ भावार्थ.

सदोदीत तुझ्यावरच आपल्या कल्याणाच्या चिंतेचा भार अर्पण करणाऱ्या मला या संकटसमयीं हे गंगे ! तूं टाकशील, तर गंगा तारणारी आहे असा जो सर्व लोकांचा दृढ विश्वास आहे तो त्रिभुवनांतून नाहींसा होईल; आणि ही तुझी निष्कपट जी दया तीही निराधार होईल.

---

गंगालहरीचा विजय असो.

## ४० श्लोक.

॥ कपर्दीदुल्लस्य प्रणयमिलदर्धाङ्गयुवतेः ॥
॥ पुरारेः प्रेङ्खन्त्यो मृदुलतरसीमंतसरणौ ॥
॥ भवान्या सापत्न्यस्फुरितनयनं कोमलरुचा ॥
॥ करेणाक्षिप्तास्ते जननि विजयन्तां लहरयः ॥ ४० ॥

४० वा. टी.

॥ अलिंगी जै प्रेमें गिरिशशिरिं जैशी न तशिरे ॥
॥ शिरीं अंबेच्या तें जंव लहरिचें नीर उतरे ॥
॥ तयाते हस्ताब्जें *असुडि +नगभूरक्तनयना ॥
॥ अशी सापत्नीची विदित तव लीला त्रिभुवना ॥ ४० ॥

## ४० संगीत.

( रा. बिभास ता. दादरा " प्रिये पहा, रात्रीचा समय सरुनि " हीचाल)

**॥ असो जगीं, सुरतटिनी लहरींचा, विजय सर्व वर्णिती ॥ध्रु०॥**
**॥ रुद्रजटेंतुनि निघुनि ॥ गिरिजेच्या भाळिं फिरुनि ॥**
**॥ पाहे मग निज सपत्नि ॥ पार्वती सती ॥ १ ॥**
**॥ सापत्न्यें रक्तनयन ॥ करित दूर लहरिचलन ॥**
**॥ तुष्ट सदा अवलोकुन ॥ श्रीउमापती ॥ असो जगीं० ॥ ४० ॥**

## ४० भावार्थ.

हे गंगे ! प्रीतीनें आलिंगून राहणारी स्त्री ज्याच्या वामभागीं आहे; अशा शंकराच्या जटाजूटांतून बाहेर पडून अति मृदुल अशा सीमन्त भागीं संचार करणाऱ्या आणि पार्वतीनें सापत्न्य भावामुळें क्रोधानें चंचल झालेल्या नेत्रांनीं पाहून आपल्या सकुमार हस्तानें आकर्षण केलेल्या अशा ज्या तुझ्या लहरी त्या विजय पावोत.

---

* फेकि. + पार्वती.

## गंगेविषयीं जगन्नाथपंडिताचें स्वाभाविक मातृप्रेम.

### ४१ श्लोक.

॥ प्रपद्यन्ते लोकाः कति न भवतीमत्र भवती- ॥
॥ -मुपाधिस्तत्रायं स्फुरति यदभीष्टं वितरसि ॥
॥ शपे तुभ्यं मातर्मम तु पुनरात्मा सुरधुनि ॥
॥ स्वभावादेव त्वय्यमितमनुरागं विधृतवान् ॥ ४१ ॥

४१ वा. टी.

॥ शरण्ये लोकांला शरण तुज येथेंच करणें ॥
॥ उपाधि व्यासङ्गास्तव पर अभीष्टा *वितरणें ॥
॥ मदात्मा हा माते ! +शपिल; तुज निष्पाप वदतों ॥
॥ स्वभावें तद्रूपीं अतुल अनुरागासि धरितों ॥ ४१ ॥

### ४१ संगीत.

( रा. झिंझोटी ता. धुमाळी. " नीरक्षीरालिंगनरूपीं स्नान तुला तें घालूनी " चाल )

॥ सर्व जनांला पूज्य असशि तूं इष्टकामदे हे जननी ! ॥
॥ कोण बरें तव आश्रय न करी अभीष्ट कांहीं मनिं धरुनी ॥
॥ वांछितफल सकलांना देशी विनवि तुज न गे मी म्हणुनी ॥
॥ स्वाभाविक कीं प्रेम तुजवरीं जडलें अढळचि शुद्धमनीं ॥
॥ ऐशा भावें पुण्यपदांतें ध्यातों निशिदिनिं स्वर्गधुनी ॥
॥ तव चरणाची शपथ वाहतों सत्यमानि या मम वचनीं ॥४१॥

---

* देणें. + शपथ घेईल.

## ४१ भावार्थ.

हे मातुश्री ! या लोकीं पूज्य अशा तुला किती लोक शरण येत नाहींत बरें ? पुष्कळ येतात; याचें कारणः—तूं त्यांना वांछितफळ देतेस; आणि माझा जीवात्मा तर देहस्वभावेंकरूनच तुझे ठायीं अपरिमित प्रेम धारण करीत आहे. हें मी तुझ्याजवळ शपथपूर्वक सांगतों. ( तर तूं हे आई ! माझे मनोरथ लौकर पूर्ण कर. )

---

गंगातीरावरील मृत्तिकेची प्रार्थना.

### ४२ श्लोक.

॥ ललाटे या लोकैरिह खलु सलीलं तिलकिता ॥
॥ तमो हन्तुं धत्ते तरुणतरमार्तण्डतुलनाम् ॥
॥ विलुम्पन्ती सद्यो विधिलिखितदुर्वर्णसरणिम् ॥
॥ त्वदीया सा मृत्स्ना ममहरतु कृत्स्नामपि शुचम् ॥ ४२ ॥

४२ वा. टी.

॥ जिला एके काळीं जन निज कपाळीं तिळकितां ॥
॥ हरे दुर्वर्णाची लिपि जिस विधी सुज्ञ लिहितां ॥
॥ तमाच्या जें नाशाविषयिं धरि मार्तण्ड उपमा ॥
॥ अशी तूझी माती मम परिहरू शोकगरिमा ॥ ४२ ॥

## ४२ संगीत.

( रा. झिंझोटी ता. पंजाबीठेका "जल भरन जात जमुनाके घाटपर" चा. ठुमरीची. )

**॥मम दुरित सर्व ती हरो मृत्तिका, सदैव जी तव तटि असते ॥ध्रु०॥**
**॥ नरनारी जी, लाविति भाळीं, ठेवुनि सोज्ज्वळ भावाते ॥१॥**
**॥ तरुणरवीचें, प्रखर तेज जी, धरुनि जनांचें तम हरिते ॥ २ ॥**
**॥ तिलक जिचा लावितां विधीच्या, अशुभ अक्षरां लोपविते ॥४२॥**

## ४२ भावार्थ.

हे गंगे ! जी मृत्तिका आपल्या मस्तकीं त्रिपुंड्ररूपानें धारण केली असतां पापरूप अंधःकाराचा नाश करण्यास माध्यान्हिक सूर्याची उपमा धारण करते; आणि जी प्राण्यांच्या मस्तकीं ब्रह्मदेवानें लिहिलेल्या ( दारिद्र्य, वैधव्यादि ) दुष्ट अक्षरांचा तत्काळ लोप करून टाकते; ती तुझी मृत्तिका माझ्या सर्व शोकांचा नाश करो.

---

गंगातीरावरील वृक्ष माझे मित्र असोत.

## ४३ श्लोक.

**॥ नरान्मूढांस्तत्तज्जनपदसमासक्तमनसो ॥**
**॥ हसन्तः सोल्लासं विकचकुसुमव्रातमिषतः ॥**
**॥ पुनानाः सौरभ्यैः सततमलिनो नित्यमलिनान् ॥**
**॥ सखायो नः सन्तु त्रिदशतटिनीतीरतरवः ॥ ४३ ॥**

४३ वा. टी.

॥ सुजन्मा पावूनी नरपशु कुदेशांत मरती ॥
॥ तया पुष्पव्याजें हसुनि अगतीतें सुचविती ॥
॥ स्वसौगंधें नित्य भ्रमरकुल मालिन्य हरितें ॥
॥ घडो ऐशा तूझ्या पुलिनतरुचें सख्य अमुतें ॥ ४३ ॥

## ४३ संगीत.

( रा. सोरठ. ता. झंपा " वाटे सर्वथा मुक्त झालों " ही चाल. )

॥ लोकीं तेचि तरु मित्र माझे ॥ ध्रु० ॥
॥ तीर तव सोडुनी मूढ जे राहती ॥
॥ देशवश होउनी काळ जे कंठिती ॥
॥ विकसुनी सुमनगण त्यांस हसती ॥ १ ॥
॥ कुसुमसौगंध हे सकल तरु देउनी ॥
॥ सर्वदा मलिनसें भ्रमरकुल सुखवुनी ॥
॥ करिति पावन तयां नित्य पुलिनीं ॥ ४३ ॥

## ४३ भावार्थ.

हे माते ! तूं जेथें नाहींस अशा देशांत आसक्त होऊन राहणाऱ्या मूर्ख पुरुषांस, आपल्या प्रफुल्ल पुष्पांच्या मिषानें आनंदपूर्वक उपहास करणारे आणि जन्मापासून मळकट ( कृष्णवर्ण ) अशांही भ्रमरांस आपल्या पुष्पांच्या सौगंधानें निरंतर पवित्र करणारे जे गंगातीरींचे वृक्ष ते आमचे मित्र असोत.

---

गंगेच्या केवळ नामस्मरणानें मुक्ति.

## ४४ श्लोक.

॥ यजन्त्येके देवान्कठिनतरसेवांस्तदपरे ॥
॥ वितानव्यासक्ता यमनियमरक्ताः कतिपये ॥
॥ अहं तु त्वन्नामस्मरणकृतकामस्त्रिपथगे ॥
॥ जगज्जालं जाने जननि तृणजालेन सदृशम् ॥ ४४ ॥

४४ वा. टी.

॥ महाकष्टें सेवा करुनि, किति देवांसि यजिती ॥
॥ दुजे यज्ञीं निष्ठा, कितिक मन योगें दमविती ॥
॥ परी मी तों तूझ्या स्मरणपरितोषेंचि फुगुनी ॥
॥ जगातें या लेखी तृणसम अवो ! विश्वजननी ॥ ४४ ॥

## ४४ संगीत.

( रा. भूपाळी. ता. धुमाळी. " घनश्याम सुंदरा श्रीधरा " चाल. )

॥ बहुत लोक इच्छित साधाया अनेक सुर पूजिती ॥ गंगे ॥
॥ अन्य किती सुफलांस्तव दारुण यज्ञयाग करिती ॥
॥ स्वार्थासाठीं कांहीं जन कीं यमनियमां धरिती ॥ गंगे ॥
॥ हटयोगादी विविध साधुनी उग्रतपाचरती ॥
॥ परंतु केवळ नामस्मरणें तूं देशिल मुक्ति ॥ गंगे ॥
॥ या विश्वासें जगज्जाल मी तृणसम गणि चित्तीं ॥४४॥

## ४४ भावार्थ.

हे गंगे ! कितिएक लोक, ज्यांची सेवा अति कठिण अशा देवांचें पूजन करतात. दुसरे कितिएक यज्ञकर्मामध्यें आसक्त होतात.

तसेंच कितिएक यमनियमांदि योगसाधनांमध्यें निमग्न असतात. हे त्रिपथगे जान्हवी ! मी तर तुझ्या नामस्मरणानेंच पूर्णमनोरथ होऊन सर्व जगज्जालांस तृणासारखें मानतों.

---

गंगेवाचून पातक्यांचा हितकर्ता कोणीच नाहीं.

## ४५ श्लोक.

॥ अविश्रान्तं जन्मावधि सुकृतजन्मार्जनकृतां ॥
॥ सतां श्रेयः कर्तुं कति न कृतिनः सन्ति विबुधाः
॥ निरस्तालंबानामकृतसुकृतानां तु भवतीम् ॥
॥ विनामुष्मिँल्लोके न परमवलोके हितकरम् ॥ ४५ ॥

४५ वा. टी.

॥ सुकर्में जे जन्मप्रभृति विधिनें नित्य करिती ॥
॥ तया संरक्षाया कितिक सुर हे दक्ष असती ॥
॥ परंतु जो पापी सहजचि अनाधार कुमती ॥
॥ अशाला ताराया तुजविण दिसेना परगती ॥ ४५ ॥

## ४५ संगीत.

( रा. बरूवा ता. धुमाळी " नृपममता रामावरती " ही चाल. )

॥ सुकृतानें स्वर्गप्राप्ती ॥ मिळवाया वय घालविती ॥ जनबहू ॥
॥ ताराया ऐसे सुमती ॥ स्वर्गीं सुर दक्षचि वसती ॥ सत्य कीं ॥
॥ परिकधीं ॥ पुण्य नेणती ॥ पातकी अती ॥ निराश्रित कुमती ॥
॥ तुजवीण परत्र न सुगती ॥ त्यांसही ॥ ४५ ॥

## ४५ भावार्थ.

हे माते ! सदोदीत पुण्यकर्मानेंच आपले दिवस घालविणाऱ्या साधूंचें कल्याण करण्यास कुशल असे किती देव नाहींत ? ( पुष्कळ आहेत ). परंतु पुण्य न करणाऱ्या निराधार लोकांचे परलोकीं हित करणारे तर तुझ्यावाचून अन्य कोणीच मी पाहत नाहीं.

---

गंगे ! आतां तू आपल्या अंकावर मला निजीव.

## ४६ श्लोक.

॥ पयः पीत्वा मातस्तव सपदि यातः सहचरै- ॥
॥ -र्विमूढैः सरन्तुं क्वचिदपि न विश्रान्तिमगमम् ॥
॥ इदानीमुत्सङ्गे मृदुपवनसंचारशिशिरे ॥
॥ चिरादुन्निद्रं मां सदयहृदये शायय चिरम् ॥४६॥

४६ वा. टी.

॥ पया तूंझ्या माते ! पिउनि शिशुभावें मतिहिना- ॥
॥ सर्वे कीडे गेलों, अधिक घडलें दुःखचि मना ॥
॥ निजोत्संगीं आतां निजवि मज दो स्वस्थ जननि ॥
॥ सुखस्पर्शी तापा हरि पवन जेथें अनुदिनीं ॥ ४६ ॥

## ४६ संगीत.

( रा. जोगी ता. धुमाळी "मजला वरिल सुभद्रा काय ?" ही चाल. )

॥ आलों जननी शरण तुला ॥ निजवी तूं अंकीं ॥ध्रु०॥
॥ प्राशुनि नीर तुझें मी दीन ॥ रमलों मित्रांसह मतिहीन ॥
॥ परि गे ! बहुत पावलों शीण ॥ नच तुजवीण शांति मला ॥

॥ वायू मंद तुझा हा गार ॥ वारो निद्राशीण अपार ॥
॥ आतां अंत न पाहतां फार ॥ देइ आधार दीनाला ॥४६॥

## ४६ भावार्थ.

हे गंगे ! तुझें उदक प्राशन करून लागलाच अति मूर्ख अशा मित्रांसमागमें क्रीडा करावयास अनेक ठिकाणीं गेलेला मी कोठेंहि विश्रान्ति पावलों नाहीं, यास्तव हे सदयहृदये माते ! आतां तूं मंद वाहणाऱ्या वायूच्या संचारानें शीतल अशा आपल्या मांडीवर फार वेळ निद्रा न आलेल्या मला चिरकाल निजीव.

---

गंगे ! तूं माझ्या उद्धाराविषयीं सत्वर कंबर बांध.

## ४७ श्लोक.

॥ बधान द्रागेव द्रढिमरमणीयं परिकरम् ॥
॥ किरीटे बालेन्दुं नियमय पुनः पन्नगगणैः ॥
॥ न कुर्यास्त्वं हेलामितरजनसाधारणतया ॥
॥ जगन्नाथस्यायं सुरधुनि समुद्धारसमयः ॥ ४७ ॥

४७ वा. टी.

॥ कटि बांधी आधीं वरि अवरि वेगें परिकरा ॥
॥ ललाटीं संरक्षी दृढ उरगबंधें शशधरा ।
॥ न कीजे त्वां हेला इतर जनसादृश्य धरुनी ॥
॥ जगन्नाथाचा हा गतिसमय सांभाळि जननी ॥ ४७ ॥

## ४७ संगीत.

( रा. परज ता. आदि " किति कपटि असशि तूं सवती " चाल. )

॥ ती तव कटि दृढ करि माते ॥ ध्रु० ॥
॥ बालचंद्र शिरिं सर्पगणांनीं ॥ मुकुटावरि गे! घेइ कसोनी ॥
॥ जगन्नाथ हा उद्धारूनी ॥ धन्य करी तूं याते ॥ १ ॥
॥ साधारण मज इतर जनांपरि ॥ गणुनि हेलना कधींहि न करी ॥
॥ महापापि मी सांभाळी तरि ॥ मम सद्‌गतिसमयाते ॥ ४७ ॥

## ४७ भावार्थ.

हे गंगे ! जगन्नाथाचा हा उद्धार करण्याचा समय आहे; म्हणून तूं अतिसुंदर अशा आपल्या कटिप्रदेशाचें लवकर बंधन कर; आणि किरीटाच्या ठाईं सर्पांच्या समुदायांनीं बालचंद्राचें घट्ट नियमन ( स्थापन ) कर. एखाद्या साधारण मनुष्याप्रमाणें तूं माझी हेलना करूं नको.

---

गंगेचें स्वरूप—नित्य ध्यान.

## ४८ श्लोक.

॥ शरच्चंद्रश्वेतां शशिशकलशुभ्रालमुकुटाम् ॥
॥ करैः कुम्भांभोजे वरभयनिरासौ च दधतीम् ॥
॥ सुधाधाराकाराभरणवसनां शुभ्रमकर- ॥
॥ -स्थितां त्वां ये ध्यायन्त्युदयति न तेषां परिभवः ॥४८॥

४८ वा. टी.

॥ शरीरीं चंद्राभा विशद शशिशोभा सुमुकुटीं ॥
॥ धरी कुंभा पद्मा वर अभय चारी करपुटीं ॥
॥ पटीं पीयूषाची रुचि रुचिरसंस्थान मकरीं ॥
॥ अशा तूंते ध्याती नरवर न त्या दुर्गति करी ॥ ४८ ॥

## ४८ संगीत.

( रा. बरुवा ता. कहारवाचा ठेका "जरि असे धर्म मम साचा..." चाल. )

॥ **तव सगुण मूर्ति जे ध्याती ॥ त्यां नसे अनादर जगतीं ॥**
॥ **जिचि शरच्चंद्रसम कांती ॥ देतसे सदा सुखशांती ॥**
॥ **शशिमंडलमौक्तिकदीप्ती ॥ शुभ्रालमुकटिं फाके ती ॥**
॥ **करिं धरी अभयदानासि ॥ रुचिरकमळासि ॥ सुधाकलशासि ॥**
॥ **मकरावरती ॥ विलसते सुधावसना ती ॥ ४८ ॥**

## ४८ भावार्थ.

हे देवगंगे ! शरदृतूंतल्या चंद्रासारखी शुभ्रवर्ण, चंद्राची कोर व शुभ्रसर्प ( शुभ्राल ) यांस मुकुटावर धारण करणारी, चार हातांनीं कुंभ, कमळ, वर आणि अभय यांस धारण करणारी, अमृताच्या धारे-प्रमाणें शुभ्र जिचीं वस्त्रें व भूषणें आहेत आणि शुभ्रमहामत्स्यावर (सुसर) विराजित अशा तुझें जे ध्यान करतात त्यांचा अनादर कोठें-ही होत नाहीं.

---

गंगा माझें शरीरसौख्य वाढवो.

## ४९ श्लोक.

॥ दरस्मितसमुल्लसद्वदनकान्तिपूरामृतै- ॥
॥ -र्भवज्वलनभर्जितानिशमूर्जयन्ती नरान् ॥
॥ चिदेकमयचंद्रिकाचयचमत्कृतिं तन्वती ॥
॥ करोतु मम शं तनोः सपदि शंतनोरङ्गना ॥ ४९ ॥

४९ वा. टी.

॥ सुमंद हसितें स्फुरे वदनदीप्ति पीयूषसी ॥
॥ तिनें निववि मानवा भवदवाग्नितप्ता कशी ॥
॥ धरी विशदचित्प्रभामय अपूर्वरूपा तया ॥
॥ करू मम सुखी तनू त्वरित शंतनूची प्रिया ॥ ४९ ॥

## ४९ संगीत.

( राग असावरि. " कंथ बिन रही अकेलि मेरि जान " ही चाल. )

॥ शंतनुची रमणी ॥ सुरधुनी, शंतनुची रमणी ॥
॥ भवनिधिची तरणी ॥ सुरधुनी ॥ ध्रु० ॥
॥ मंगल तनुचें त्वरित करो मम, दुर्गति टाळूनी ॥ सुरधुनी ॥
॥ मंदस्मितरमणीयमुखश्री,-अमृतजिच्याबदनीं ॥ सुरधुनी ॥
॥ पीयूषबळें वाचविते जी, भवतापा हरुनी ॥ सुरधुनी ॥
॥ चिज्ज्योत्स्नेची दावि चमत्कृति, जी विस्तारूनी ॥सुरधुनी॥४९॥

## ४९ भावार्थ.

किंचित् हास्यानें शोभणाऱ्या मुखाच्या कांतिपुंजरूप अमृतांनीं, संसाररूप अग्नीनें दग्ध झालेल्या मनुष्यांना निरंतर शांत करणारी

आणि चैतन्यरूप चंद्रकांतीच्या चमत्काराचा विस्तार करणारी अशी शंतनु राजाची स्त्री जी श्रीगंगा ( सुरधुनी ) ती माझें शरीरसुख सत्वर वाढवो.

---

गंगा माझा संताप दूर करो.

## ५० श्लोक.

॥ मन्त्रैर्मीलितमौषधैर्मुकुलितं त्रस्तं सुराणां गणैः ॥
॥ स्रस्तं सान्द्रसुधारसैर्विदलितं गारुत्मतैर्ग्रावभिः ॥
॥ वीचिक्षालितकालियाहितपदे स्वर्लोककल्लोलिनि ॥
॥ त्वं तापं निरयाधुना मम भवव्यालावलीढात्मनः ॥५०॥

## ५० वा. टी.

॥ मंत्रा मौन पडे महौषधिगती संकोचल्या देव ही ॥
॥ त्रस्त स्रस्त सुधारसाख्यगरुडग्रावा थके भीमही ॥
॥ हे मंदाकिनि कालियास दमितां घूसी पदां त्याचिया ॥
॥ आतां तूं भवनागदंश जननी तापा हरी माझिया ॥ ५० ॥

## ५० संगीत.

( राग भैरवी. ता. दादरा. " सकलदोष मजवरिचा आजि लया गेला " ही चाल )

॥ हरिपदांस क्षालिसी तूं स्वर्गि पूज्य होसी ॥
॥ वारुनि भवनागदंश शांतवी मनासी ॥ ध्रु० ॥
॥ याविषयीं मंत्रांनीं स्वबल गुप्त केलें ॥

॥ औषधीं सुविहितवीर्य सर्व लया गेलें ॥
॥ थकले ते सुरसमूह सुधारस निवाले ॥
॥ गारुत्मतदिव्यमणी फुटुनि नष्ट झाले ॥
॥ दग्धवपू शमवि *अतां काय अंत पाहसी ॥ ५० ॥

## ५० भावार्थ.

आपल्या लहरींनीं श्रीकृष्णाचें चरणकमल क्षालन करणाऱ्या हे देवगंगे ! संसाररूपसर्पानें मला केलेल्या दंशाचें तूं निवारण कर. ज्याविषयीं गायत्र्यादि मंत्रांनीं आपल्या शक्तीचा संकोच अंगिकारिला; औषधांनीं निर्वियत्व स्विकारलें; देवांनीं भय धरिलें; दाट अशा अमृतरसांनीं अधःपात पत्करिला; गरुड ज्यांची देवता आहे अशा (गारुत्मत) विषहारी दिव्यमणिरत्नांनीं सुद्धां ( पाषाणांनीं ) आपलीं शकलें करून घेतलीं.

---

गंगालहरीनटघटीताण्डव.

## ५१ श्लोक.

॥ द्यूते नागेन्द्रकृत्तिप्रमथगणमणिश्रेणिनन्दीन्दुमुख्यम् ॥
॥ सर्वस्वं हारयित्वा स्वमथ पुरभिदि द्राक्पणीकर्तुकामे ॥
॥ साकूतं हैमवत्या मृदुलहसितया वीक्षितायास्तवाम्ब ॥
॥ व्यालोलोल्लासिवल्गल्लहरिनटघटीताण्डवं नः पुनातु ॥ ५१ ॥

* आतां.



५१ वा. टी.

॥ द्यूतीं चर्मा द्विपाच्या प्रमथ, गण, मणी, नंदि, चंद्रादि पारीं ॥
॥ हारी सर्वस्व अंबा मग पणि अपणा घालुं इच्छी पुरारी ॥
॥ ऐशा संधीस तूंतें विहसुनि मिरवी पार्वती गूढ भावें ॥
॥ क्रोधोर्मी नित्य लीला नटविशि तयिं, ते रक्षुं आम्हां प्रभावें ॥५१॥

## ५१ संगीत.

(रा. सिंधुरा. ता. धुमाळी. "शिरीं गंगा धरी चंद्रा मृडानीनाथ शंभो तूं" चा.)

॥ चपललहरी पवनवेगें ॥ मिळुनि अन्योन्य स्वयोगें ॥ २
॥ मधुरसंगीत जणु गाती ॥ नटासम नृत्यही करिती ॥
॥ अलौकिक गांग योग महा ॥ करो आम्हांस पावन हा ॥
॥ उमाशिव एकदा द्यूतीं ॥ विनोदें खेळ रंगविती ॥
॥ भुजगचर्मा शशी माळा ॥ प्रमथगण दिव्य नंदीला ॥
॥ पणीं सर्वस्व लीलेनें ॥ शिवा हरिलें भवानीनें ॥
॥ त्वरें मग सांब शिव भोळा ॥ पणीं लावी स्वदेहाला ॥
॥ उमा तेव्हां जरा हसुनी ॥ म्हणे स्वामी नया स्मरुनी ॥
॥ वसे शिव-उत्तमांगाला ॥ आर्धी लावा पणीं तिजला ॥
॥ कटाक्षें या उमा पाही ॥ सभयलहरी सुलीला ही ॥ ५१ ॥

## ५१ भावार्थ

जेव्हां द्यूत खेळतांना शंकराकडून पार्वतीनें वासुकी, गजचर्म, प्रमथनांवाचे शिवगण, रुद्राक्षमाळा, नंदी, चंद्र इत्यादि ( सर्वस्व ) हिरावून घेतलें तेव्हां महादेवानें एकाएकी आपल्या देहाचाच पण लावावा अशी इच्छा दर्शविली असतां, मंद हास्य करणाऱ्या पार्वतीनें,

ह्या गंगेला आधीं पणामध्यें जिंकून घ्यावी अशा अभिप्रायानें सकौतुक तुजकडे पाहिलें असतां त्यावेळीं तुझ्या चंचळ, उंच उसळणाऱ्या व एकमेकींत मिसळणाऱ्या लहरींचें मस्तकावर घागर घेऊन नृत्य करणाऱ्या नटासारखें झालेलें जें तांडवनृत्य तें आम्हांस पावन करो.

---

गंगा माझ्या अवयवांस शुद्ध करो.

५२ श्लोक.

॥ विभूषितानङ्गरिपूत्तमाङ्गा ॥
॥ सद्यःकृतानेकजनार्तिभङ्गा ॥
॥ मनोहरोत्तुङ्गचलत्तरङ्गा ॥
॥ गङ्गा ममाङ्गान्यमलीकरोतु ॥ ५२ ॥

५२ वा. टी.

॥ करी अलंकार शिवोत्तमांगीं ॥ स्नानें जगाचे अघशैल भंगी ॥
॥ अपूर्व शोभा जिचिया तरंगा ॥ गंगा अशी पूत करू ममांगा ॥५२॥

संगीत. ५२

( रा. भैरवी. ता. पंजाबी ठेका. " काय करूं नशिवाते " ही चाल )

॥ शुद्ध करो मम अंगा ॥ शिवोत्तमांगा भूषवि गंगा ॥ ध्रु० ॥
॥ दर्शनमात्रें आर्ति हरी जी ॥ बहुजनसंकटभंगा ॥
॥ ताराया जी तुंग मनोहर ॥ उसळी चपळ तरंगा ॥शुद्धकरो०॥५२

## ५२ भावार्थ.

आपल्या स्थितीनें शंकराचें मस्तक सुशोभीत करणारी; अनेक जनांचीं दुःखें घालविणारी आणि जिचे अतिसुंदर उंच व चंचल तरंग आहेत अशी गंगा माझ्या सर्व अवयवांस शुद्ध करो.

---

गंगालहरीपठणाची फलश्रुति.

## ५३ श्लोक.

॥ इमां पीयूषलहरीं ॥ जगन्नाथेन निर्मिताम् ॥
॥ यः पठेत्तस्य सर्वत्र ॥ जायन्ते सुखसंपदः ॥ ५३ ॥

५३ वा. टी.

॥ अमृताची लहरि ही ॥ जगन्नाथकवीकृता ॥
॥ जो पढे त्यासि सर्वत्र ॥ होतील जयसंपदा ॥ ५३ ॥

## ५३ संगीत.

( रा. जोगी. ता. झुमाळी. साकी )

॥ पियूषलहरी, पठण करी जो, जगन्नाथकविकृति ही ॥
॥ सौख्य संपदा, सर्वत्र तया, पावे मुक्तीपदही ॥
॥ जन हो ! पठण करा ॥ दुस्तर भवनिधिपार तरा ॥ ५३ ॥

## ५३ भावार्थ.

जगन्नाथपंडितानें केलेल्या ह्या गंगालहरीचें जो पठण करितो त्याला इहपरलोकीं सुखसंपत्ति प्राप्त होतात.

---

गंगेला सं. गंगालहरीकर्त्याची प्रार्थना.

## ५४ संगीत.

(रा. भूप. ता. त्रिवट. "शंकरा, पामर हा नर सादर शरण तुम्हा तारा" ही चा.)

॥ जान्हवी, भवतापें हें तप्त हृदय झडकरि निववी ॥ ध्रु० ॥
॥ दुःखद ही भवमाया निरसुनि ब्रह्मपदातें ओळखवी ॥
॥ पुनरपि जननीं पुनरपि मरणीं ही मम सरणी खुंटवी ॥
॥ ही निशिदिनि चिंताज्वाला ह्या जीवीं ॥पोळवी ॥जान्हवी०॥१॥
॥ जगन्नाथपंडितकविकृत हें काव्य सुरस गंगालहरी ॥
॥ संगीतीं सकलांस्तव रचिलें ठेवुनि त्वत्पदिं भक्ति खरी ॥
॥ ह्या कवनें शुद्धि मनाची कीं व्हावी ॥ हें घडवी ॥ जान्हवी०॥२॥
॥ मार्तंडात्मजरामानें तुज दृढभक्तीनें हे जननी ॥
॥ संगीतांची ही पुष्पांजलि अर्पियली भावें चरणीं ॥
॥ घे, मानुनि, अंतीं सुगती मज द्यावी ॥ हें विनवी ॥ जान्हवी ॥५४॥

---

गंगोदकमहिमा.

## ५५ श्लोक. *

॥ कदाचिन्नागारिः सुरतटिनितीरे समचरन् ॥
॥ समाकृष्य व्यालं सजलमगिलत्कंचनबला- ॥
॥ चतुर्बाहुर्भूत्वा तदुपरि लसत्पीतवसनो ॥
॥ गतो विष्णोर्लोकं जननि तव नीरस्य महिमा ॥ ५५ ॥

---

* हा श्लोक जुन्या हस्तलिखित प्रतीवरून घेतला आहे.

गंगेला उद्देशून कर्त्याचीं स्फुट पद्यें.

## ५६ संगीत.

( रा. भूप. झंपा. " अधम क्षिति पालका असशि भूपा " चा. )

॥ त्वरें धांव तूं धांव गे माय गंगे ॥
॥ दुरितनगनिरसनोद्यततरंगे ॥ ध्रु० ॥
॥ पातकें नाशिसी, क्षितिवरी प्रकटुनी ॥ कृतसकलसाधुवृंदार्तिभंगे ॥
॥ अवनितलशोकसंताप हरि सुरधुनि॥ भूषिता नगरिपुउत्तमांगे॥५६॥

## ५७ संगीत.

( " आंख विना अंधारू रे " ही गुजराथी अनसूया नाटकांतली चाल )

॥ मानसि ध्यावी गंगा ही ॥ सदा जनांनीं ॥ ध्रु० ॥
॥ मनुजा कर विचार कांहीं ॥ अंतरिं बा शोधुनि पाही ॥
॥ संसारीं सुखलव नाहीं नाहीं रे ॥ सदा जनांनीं ॥मानसि०॥१॥
॥ धर्मांचें निधान जी ही ॥ तन मन तूं तिजला वाही ॥
॥ शीतल करि तनुची लाही लाही रे ॥ सदा जनांनीं ॥मानसि॥५७॥

। इति श्री पंडितजगन्नाथविरचितगंगालहरी जामदग्निवत्सगोत्रोत्पन्न
मार्तंडात्मजरामरायविरचितसंगीतपद्यमयभाषाटीकासमेता
संपूर्णतामयासीत् ।

मातुश्रीभागीरथीचरणार्पणमस्तु ।

गंगाष्टकम्

॥ नमस्तेऽस्तु गंगे त्वदंगप्रसंगाद्भुजंगास्तुरंगाः कुरंगाः प्लवंगाः ॥
॥ अनंगारिरंगाः ससंगाः शिवांगा भुजंगाधिपांगीकृतांगा भवंति ॥
॥ नमो जन्हुकन्ये न मन्ये त्वदन्यैर्निसर्गेंदुचिन्हादिभिर्लोकभर्तुः ॥
॥ अतोऽहं नतोऽहं सतो गौरतोये वसिष्ठादिभिर्गीयमानाभिधेये ॥
॥ त्वदामज्जनात्सज्जनो दुर्जनो वा विमानैः समानैः समानैर्हि मानैः
॥ समायाति तस्मिन्पुरारातिलोके पुरद्वारसंरुद्धदिक्पाललोके ॥
॥ स्वरावासदंभोलिदंभोऽपि रंभापरीरंभसंभावनाधीरचेताः ॥
॥ समाकांक्षते त्वत्तटे वृक्षवाटीकुटीरे वसन्नेतुमायुर्दिनानि ॥
॥ त्रिलोकस्य भर्तुर्जटाजूटबंधात्स्वसीमांतभागे मनाक्प्रस्खलंतः ॥
॥ भवान्या रुषा प्रौढसापत्नभावात्करेणाहतास्त्वत्तरंगा जयंति ॥
॥ जलोन्मज्जदैरावतोद्दामकुंभस्फुरत्प्रस्खलत्सांद्रसिंदूररागे ॥
॥ क्वचित्पद्मिनी रेणुभंगे प्रसंगे मनःखेलतां जन्हुकन्यातरंगे ॥ ६
॥ भवत्तीरवानीरवातोत्थधूलीलवस्पर्शतस्तत्क्षणं क्षीणपापः ॥
॥ जनोऽयं जगत्पावने त्वत्प्रसादात्पदे पौरुहूतेऽपि धत्तेऽवहेलाम् ॥
॥ त्रिसंध्यानमल्लेखकोटीरनानाविधानेकरत्नांशुबिंबप्रभाभिः ॥
॥ स्फुरत्पादपीठे हठेनाष्टमूर्तेर्जटाजूटवासे नताः स्मः पदं ते ॥ ८
॥ इदं यः पठेदष्टकं जन्हुपुत्र्यास्त्रिकालं कृतं कालिदासेन रम्यम् ॥
॥ समायास्यतींद्रादिभिर्नीयमानं पदं कैशवं शैशवं नो लभेत्सः ॥ ९

। इति श्री कालिदासकृतं गंगाष्टकस्तोत्रं संपूर्णम् ॥ ९८ ॥

॥ श्री भागीरथ्यर्पणमस्तु ॥

समाप्त.

# अवश्य वाचा.



**१. पंडित जगन्नाथराय** (यवनीपरिणय) **नाटक** किं. १—०—०

या पुस्तकांत प्रसिद्ध केलेल्या पंडितरायांच्या चरित्रांतून "यवनीपरिणय" हा हृदयंगम व चटकदार विषय योजून त्यावर या ऐतिहासिक तीन अंकी गद्यपद्यात्मक नाटकाची उभारणी केली आहे. मोगल दरबारांत ब्राह्मण पंडिताचा जय-जयकार, संस्कृत वाङ्मयाचा उत्कर्ष, हिंदूधर्माविषयीं आदर, हिंदुमुसलमानाचें सामाजिक ऐक्य, हे मुद्दे या नाटकांत अत्यंत महत्वाचे आहेत. जर एखादी नाट्यकलाविशारद नाटक मंडळी हें नाटक रंगभूमीवर आणण्याची इच्छा प्रदर्शित करील तर याची मराठी भाषेंत किंवा हिंदीभाषेंत रंगावृत्ति तयार करून देण्यांत येईल.

**२. भामिनी नाटक.**

"गुण अधिक किंवा धन अधिक" या मुद्यावर या सामाजिक गद्यपद्यात्मक तीन अंकी नाटकाची हस्तलिखित प्रत लिहून तयार झाली आहे. हें नाटक रंगभूमीवर आल्यानंतर छापून प्रसिद्ध करण्याचा विचार आहे. जी ललितकलाप्रवर्तक नाटक मंडळी हें हास्यरसप्रधान उपयुक्त व टिकाउ नाटक बसवून रंगभूमीवर आणण्यास तयार असेल त्यांनीं आमच्याशीं पत्र-व्यवहार करावा.

**३. चंद्रिका—शरच्चंद्रः**—अथवा सुविख्यात विदुषी श्रीमती सौ. चंद्रिकाबाई बी. ए. लेडी सुपरिन्टेन्डेन्ट यांचे भ्रतार मिस्टर शरच्चंद्र एम. ए. यांचें अनावृत पत्रः—हा आमचा

सामाजिक लेख गोष्टीच्या रूपानें छापून प्रसिद्ध झाला आहे. यांत बायकोच्या नांवावर नवरा ओळखला जाणें, फाजील व अप्रयोजक स्त्रीशिक्षणाचा परिणाम, स्त्रीशिक्षणाची खरी दिशा, नवराबायको यांचा अव्यभीचारी व आमरणांतिक निकट शरीरसंबंध; अशा महत्वाच्या मुद्यांचें उत्तम स्पष्टीकरण करण्यांत आलें आहे. ही गोष्ट अत्यंत मनोरंजक व चटकदार सोप्या भाषेंत लिहिली आहे व हास्यरसानेंहि परिपूर्ण आहे.

४. **चंद्रकांताची चटकचांदणीः**—या अत्यंत परिणामकारक सामाजिक लेखांत चटकचांदणी या नांवाच्या नव तारुण्यानें रसरसलेल्या अवयवांच्या अल्लड पोरीनें चंद्रकांत या नांवांच्या मेडिकल कॉलेजांतील एका डाक्तरास दिलखुष् बागेंत एक जुईच्या फुलाचा हार देऊन व आपल्या मोहजालांत गुरफटून भयंकर संकटांत पाडलें, आणि अखेर यांची सुटका कशी झाली, याचें गोष्टीच्या व चटकदार संवादाच्या रूपानें हृदयद्रावक. वर्णन केलें आहे.

सदरील दोन्ही नाटकांत व गोष्टींच्या कथानकांत अनेक प्रकारचे मनोरंजक व हृदयद्रावक प्रसंग असल्यानें ते सर्व सिनेमा फिल्म कंपनीला ग्राह्य होतील अशी खात्री वाटते; म्हणून त्यासंबंधांत कोणत्याहि नामांकित सिनेमा फिल्म कंपनीच्या मालकानें आमच्याशीं पत्रव्यवहार केल्यास चित्रपट तयार करून देण्यांत येईल.

बडोदें-सिटि. उंचीपोळझापा<br>राधाकृष्णगल्ली. ता. १९-४-२८ } रामराव मार्तंड भांबुरकर.

---

# श्री सयाजीग्रंथमालेंतून प्रसिद्ध झालेल्या मराठी ग्रंथांची यादी.

## (१) श्री सयाजीसाहित्यमाला.

| ग्रं. अ. अं. | ग्रंथाचें व कर्त्याचें नांव. | किंमत. |
|---|---|---|
| १ | संस्कृत वाङ्मयाचा इतिहास. (इति. गुच्छ) ले. रा. रा. सी. वा. पेंडसे बी. ए., एम. सी. पी. एफ्. आर. सी. आय्. | २-८-० |
| १० | बालोद्यानपद्धतीचें गृहशिक्षण. (शि. गु.) सचित्र. ले. रा. वा. गो. आपटे बी. ए. | ०-८-० |
| १९ | सुधारणा आणि प्रगति. (प्र. गु.) ले. दा. ना. आपटे. बी. ए. एलएल. बी. | ३-०-० |
| २१ | शिस्त, (प्र. गु.) ले. कर्नल नानासो. शिंदे व मेजर के. एन. सांवत. | १-०-० |
| २३ | दीघनिकाय भा. १ (ध. गु.) ले. रा. रा. चिं. वै. राजवाडे. एम. ए. बी. एस् सी. | १-८-० |
| ३९ | हिंदुस्थानचा लष्करी इतिहास व दोस्तराष्ट्रांच्या फौजा. (प्र. गु.). ले. कर्नल नाना साहेब शिंदे. | २-८-० |
| ४१ | महाराजा शिवाजी. (च. गु.). ले. रा. रा. सी. वा. पेंडसे. बी. ए; एफ. आर. सी. आय्., एम्. सी. पी. | १-६-० |
| ६९ | हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास (इति. गु.) मराठी रियासत. ले. रा. रा. गो. स. सर देसाई. बी. ए., | २-१२-० |
| ६६ | हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास. (म. वि.) १७४०-१७६१ (इति. गु.) ले. रा. रा. गो. स. सर देसाई बी. ए, | ३-०-० |

६८ सदर मध्यविभाग. पानिपत प्रकरण. ( इ. गु. ) २-
लें. रा. रा. गो. स. सर देसाई. बी. ए,

७३ जबाबदार राज्यपद्धति ( प्र. गु. ) ले. स्व. ०-
म. रा. भिडे एम. ए.,

१४ मिरांबाई—( च. गु. ) ले. दा. ना. आपटे ०-
बी. ए. एल्एल्. बी.

१९ इंग्रजी शिष्टाचार—( प्र. गु. ) ले. रा. रा. चिं. वि. ०-
जोशी एम्. ए.

८४ पार्लमेंट—( इति. गु. ) ले. रा. रा. दा. ना. आपटे १-
बी. ए. एल्एल्. बी.

८४-८५ सनईवादन पाठशाला-पुस्तक ३ रें. ०-
०-

(वि. गु.) ले. रा. रा. गणपतराव पिराजी इसकसव १-
स्वतंत्र पुस्तक १-२-३-४ किं. अनुक्रमें. १-

८६ सगुणोपासना व मूर्तिपूजा-स्वतंत्र. ले. शि. म.फडके १-

८७ नागरिकांची कर्तव्यें-(प्र. गु.) ले. रा. रा. कृ. गं. ०-
गोकटे, बी. ए.

८८ सजीव सृष्टीची उत्क्रांति-(वि. गु.) सचित्र. २-
ले. रा. रा. स. ना. दातार एम्. ए. बी. एस् सी.

९० मराठ्यांच्या प्रसिद्ध लढाया-(इ. गु.) ले. कर्नल ३-
नानासाहेब शिंदे.

९१ यांत्रिक प्रदीप, सचित्र, प्रथम भाग-(वि. गु.)
ले. रा. रा. स, वि. आपटे एम् ए. बी. एस् सी.

९४ बडोद्याचें मराठी साहित्य-(प्र. गु.) ले. रा. रा. ०-
ग. रं. दंडवते.

९८ अप्रसिद्ध ऐतिहासिक चरित्रें-(इ. गु) १-
ले. रा. रा वि. स. वाकसकर

११२ तत्वज्ञानांतील कूटप्रश्न-ले. दा. ना. आपटे. बी. ए. एल्एल्. बी. १-०-०
११३ सुबोधकथामाला-ले. रा. रा. दा. गो. चिपळोणकर. ०-१५-०
११४ सुप्रजाजननशास्त्र-ले. रा. रा. ग. ना. मोडक. बी. एजी. ०-१२-०
११९ मुक्या मुलांचें गृहशिक्षण-ले. रा. रा. पां. रा. नंदुरबाकर. ०-१२-०
१२० कादंबरीची गोष्ट-ले. रा. रा. ग. रं. दंडवते. १-१-०
१२३ हिंदुस्थानच्या इतिहासांतील गोष्टी. ले. रा. रा. म. मु. जोशी. बी. ए. एल्एल्. बी. ०-१३-०
१२७ पंडित जगन्नाथराय चरित्र आणि संगीत गंगालहरी-गद्यपद्यात्मक सचित्र ग्रंथ-ले. रा. रा. रामराव मार्तंड भांबुरकर. १-०-०

## (२) श्रीसयाजी बालज्ञानमाला.

४७ छत्रपति संभाजी महाराज-(च. गु.) ले. रा. रा. के. मं. रांगणेकर. बी. ए, ०-६-०
४८ महाराणा प्रताप-(च गु. ले. ए. काटदरे. बी. ए., ०-६-०
६० कोषांचें वर्णन-(वि. गु.) ले. रा. र. ब. फळणीकर. बी. ए. ०-६-०
७१ विल्यम एवर्ट ग्लॅडस्टन-(च. गु.) ले. रा. वि. पां. नेने बी. ए. ०-६-०
७२ संपत्ति व भांडवल-(वि. गु.) ले. रा. भा. त्रिं. काळे. बी. ए. ०-६-०